आधुनिक कादंबरी मंडळ, पुणें.

# रस्सी-खेंच

लेखिका

कु. कुमुदिनी शंकर प्रभावळकर, बी. ए.

रु. ]                [ १९३९

प्रकाशक

वि. ग. ताम्हणकर

आधुनिक कादंबरी मंडळ,

४८४ नारायण पेठ, पुणें २.



मुद्रक

ग. गो. दिवा[illegible]

इंदिरा प्रे[illegible]

१८९।१९ सदाशिव [illegible] २

# अनुक्रमणिका

# अर्पण पत्रिका

माझ्या प्रियवाचकांच्या बुद्धिहृदयामधील असल्या

स्वरूपाची 'रस्सीखेंच' थांबविण्यासाठी

मार्गदर्शनार्थ ही कादंबरी त्यांनाच

सप्रेम अर्पण—

—लेखिका

१

# मातींतील फूल !

पियन सी रोडवरील आप्पासाहेब जहागीरदारांच्या भव्य बंगल्यासमोरील सुंदर सुव्यवस्थित बागेंत प्रकाश उभा होता.

हजारों रुपये खर्चून बनविलेला तो बगीचा—त्याचें वर्णन तरी कसें ावयाचें ? पण प्रकाशला तरी त्या बागेमध्यें दोन वैशिष्ट्यें दिसून येत. हेलें म्हणजे बागेच्या दोन्ही कडांना ताठ उभ्या असणाऱ्या—श्रीमंतांच्या ठर मनोवृत्तीच्या द्योतकच अशा—सुरूच्या झाडांच्या रांगा. व दुसरें शिष्टय म्हणजे प्रतिकूल परिस्थितीच्या पायीं श्रीमंतांच्या होस हो डोलणाऱ्या दरिद्रीजनाप्रमाणें वाऱ्याच्या झुळुकीसरशीं इतस्ततः डुलणारीं ाबाचीं व मोगरीचीं रोपटीं !—

आणि मग प्रकाशाच्या मनांत येई. श्रीमंतांची पर्वा न बाळगितां, आहे ा स्थितींत समाधान मानणाऱ्या कांहीं अपवादात्मक गरिबाप्रमाणें हीं ग्रीझर् फ्लॉवर्स' सुगंधरूपी श्रीमंतीचा पूर्ण अभाव असतांहि आपल्या ाविचित्र रंगबेरंगांवरच खूष असतात—नाहीं ?

प्रकाश कवि नव्हता. उलट काव्याशीं खूप फारकत असणारी व्यव. प्रधान ' लाइन् ' त्यानें घेतली होती. तो इंजिनियर होता. पण तो म होता. गरीब असूनहि त्याच्याकडे माणूसकी, सहृदयता भरपूर होती. त्याचमुळें श्रीमंत आप्पासाहेबांच्या ह्या सुंदर बागेविषयीं त्याला आपुलकी व

रंगीबेरंगी फुलांच्या ताटव्यांच्या कडा कडांनीं लाविलेलें हिरवेगार गव झुपके, बागेतून आडवेतिडवे जाणारे पदपथ आणि मध्यभागीं थुइथुइ नाच कारंजें व त्याच्या उंच उडणाऱ्या तुषारांत मावळत्या सूर्याच्या किरण चमकणारी इंद्रधनुष्याची शोभा !—श्रीमंतांचा तिटकारा असूनहि आ साहेबाच्या श्रीमंतीमुळें निर्माण झालेलें हें कृत्रिम—अकृत्रिम शोभेचें मि प्रकाशला फार नयनमनोहर वाटे.

शिवाय ती संध्याकाळची वेळहि तितकीच रम्यशीतल होती. व त्य पेक्षां त्या बागेंत अल्लडपणें इथूनतिथें धांवणारी, पळणारी सुंदर, चपल अतुल वैभवशाली आप्पासाहेबांची एकुलती एक लाडकी लेक, ह्या स शोभेला अधिक शोभा आणीत होती.

निदान प्रकाशला तरी अगदीं असें वाटत होतें. त्याच्या प्रणयी दृ रश्मीच्या सौंदर्यांत एवढेंसुद्धां व्यंग दिसत नव्हतें.

आणि खरें म्हटलें तर ह्यांत प्रेमामुळें आंधळ्या बनलेल्या प्रकाश दृष्टीला दोष देण्याचें कारण नव्हतें.

रश्मि खरोखरीच अव्यंग सुंदर होती.

आजकालच्या ह्या काटकसरीच्या युगांत इतर धंद्यांप्रमाणें लेखन धंद्यांतहि शब्दांची काटकसर करण्यांत येत असते ! त्यामुळें आजका एखादा कवि रश्मीच्या सौंदर्याचें जर खरें वर्णन करूं लागला तर तो झाल्यास एखादें सुनीत खरडील. पण कालिदासादि कवींच्या काळीं रश्मि जन्मली असती तर तिच्या सौंदर्याचें वर्णन करण्यासाठीं त्यांनीं नि पंचवीस एक सर्गांचें तरी काव्य निर्माण केलें असतें. इतकी सुंदर रश्मि !—

रश्मीचा वर्ण तेजस्वी गौर असून ओंठ नाजूक व तांबडेबुंद होतें. कुरळे होते, कपाळपट्टी सपाट होती. नाक सरळ व प्रमाणशीर हो

बांधा सडसडीत आणि बांधेसूद होता. ह्या सर्वांच्या ओढीला तिची वेष-भूषा नेहमींच फार सुरेख व किंमतवान् असे. मग सोन्याच्या सुबक कोंदणांत बसलेली अशी ही हिरकणी सुरम्य दिसल्यास नवल काय!

अतृप्त नेत्रांनीं रश्मीच्या मोहक मुद्रेकडे पहातां पहातां प्रकाशनें एक मंद निःश्वास सोडला. रश्मीनें निःश्वास तो ऐकला असल्यास त्यावर निदान ती कांहीं बोलली तरी नाहीं. ती आपली बागेंतील पद्पथावरून मध्येंच जलद तर मध्येंच सावकाश चालली होती. केव्हांतरी ती एकादें फूल तोडी, त्याचा वास घेतल्यासारखें करी व तें फेंकून देई.

जात्याच फुलांची फार आवड असलेल्या सहृदय प्रकाशला रश्मीची ही कृति वस्तुतः गैर वाटावयाला हवी होती. पण तें प्रेम!—आंधळें प्रेम!—तें इथें आडवें येई.

रश्मीनें सुंदर, सुंदर फुलें तोडून फेंकून दिलीं तरी त्या फुलांना क्षणमात्र तिच्या नाजुक बोटांचा स्पर्श झाला एवढ्यानेंच त्यांचें सार्थक झालें; रश्मीच्या हातून असें चुरडलें जावयालासुद्धां भाग्य लागतें असें तो सरळ आपल्या मनाला सांगे. आणि त्याच्या त्या वेड्या मनालाहि हा मुद्दा अगदीं बिनतोड वाटे.

आतां त्याच्या समोरच रश्मीनें ३।४ गुलाब व ५।६ मोगरीचीं फुलें अशीं हुंगून चुरमडून टाकलीं. पण तरीहि प्रकाशनें एक लाल गुलाबाची उमलती सुंदर कळी आतां खुडली व तो रश्मीला म्हणाला, " ही किती गोड आहे पहा कळी. घाला कीं ही आपल्या केसांत—"

मागें वळून पहात रश्मी आपल्या नाजुक आवाजांत म्हणाली, " अग-बाई! खरंच हं, कित्ती कित्ती छान आहे तरी ती—प्रकाश, द्या ती इकडे."

प्रकाशनें कळी देण्यासाठीं व रश्मीनें ती घेण्यासाठीं त्यांनीं आपापले हात पुढें केले. पण रश्मीच्या त्या गोऱ्यापान बोटांचा नाजुक स्पर्श होतांच प्रकाशला काय झालें कोण जाणें!—

कळी खालीं जमिनीवर पडली, प्रकाश चुकचुकत खालीं वांकला व त्यानें पट्दिशीं ती उचलून पुनः रश्मीच्या पुढें केली. पण आपल्या नाजुक

ओठांना दुमड पाडीत रश्मी तुच्छतेच्या स्वरांत म्हणाली, " अंहं, मला नको ती आतां. माती लागली आहे तिला. "

माती लागली आहे तिला! हं! ऐश्वर्यशालिनी रश्मी नेहमीं असेंच बोले. जन्मापासून सुंदर व किंमतवान् वस्तूंचा उपभोग घेण्याची संवय असल्यामुळें तदितर वस्तूंचा तिला असा तिटकारा वाटे!

मातीचा स्पर्श झाल्यामुळें तें सुंदर फूल तिला तिरस्करणीय वाटलें.

मातींतील फूल!—हाय!—प्रकाशच्या मनांत आलें, आपणहि त्या फुलासारखेंच नाहीं काय? आपल्यालाहि दारिद्र्याची माती चिकटलेली नाहीं काय?—मग-मग—रश्मी आपलाहि असाच तिरस्कार करील तर?

तिरस्कार करील?—हं!—आजवर कितीदां तरी तिनें आपला प्रच्छन्न, अप्रच्छन्न अपमान केला नाहीं काय?——तिच्या तोलाचे, श्रीमंत मित्र तिच्या आंवतींभोंवतीं असतांनां रश्मीनें आपल्याशीं केलेल्या अपमानकारक वर्तनाच्या स्मृतीनें प्रकाशच्या भव्य कपाळावर २।३ आंठ्या उमटल्या. आपले ओंठ त्यानें गच्च दाबून धरल्यामुळें त्याचा जबडा केवढा रुंद दिसत होता!

जात्याच धिप्पाड, भव्य बांध्याचा प्रकाश अशा त्रासिक मनःस्थितींत तर अधिकच पौरुषयुक्त दिसत होता!——रश्मी जशी नाजुक, जनानी सौंदर्याची आदर्श मूर्ति होती तसा प्रकाश मर्दानी सौंदर्याचा आदर्श नमुना होता!

त्याच्या या धिप्पाड देहबांध्याला शोभेसा त्याचा वर्णहि प्रकृतीच्या सुस्वास्थ्याचा निदर्शक असा लालसर श्यामल होता!

जणूं प्रकाश म्हणजे पुरुष व रश्मी म्हणजे प्रकृति! ही प्रकृतिपुरुषाची जोडी बाह्यतः किती सुंदर जमून दिसत होती! —पण——पण——त्यांच्या परिस्थितींतील जमीन-अस्मानाइतकें अंतर!——व ह्या अंतराची प्रतिक्षणी जाणीव करून देणारें रश्मीचें कुर्रेबाज वर्तन!——

मातींत पडलेल्या त्या फुलाविषयीं आतां रश्मीनें दर्शविलेली घृणा प्रकाशच्या भावनाप्रधान अंतःकरणाला भारी टोंचली. आपल्या तळहातावर बसलेल्या त्या निष्पाप फुलाकडे त्यानें व्याकुळ नजरेनें पाहिलें. रश्मीच

आपण आपल्या हृदयाचें दान दिलें तर ती त्याची एवढीच पर्वा बाळगेल काय अशी शंका त्याच्या मनाला चाटून गेली. अर्धस्फुट निःश्वास सोडीत त्यानें तें 'मातींतील फूल' आपल्या खिशांत ठेविलें. व आपल्याच नादांत पुढें चाललेल्या, व चालतां चालतां मघांप्रमाणेंच फुलें तोडण्याचा व कुस्करण्याचा चाळा करणाऱ्या रश्मीकडे हुरहुरत्या भावनेनें पहात तो आपल्या घरीं निघून गेला.

# २ कौमुदी !

प्रत्येक मनुष्याची मनोवृत्ति भिन्नभिन्न असते हें तत्व आजवर इतक्या वेळां प्रतिपादिलें गेलें आहे कीं, पुनः एकवार त्याचा उल्लेख करणें म्हणजे कितव्यांदां पुनरुच्चार होईल हें सांगणें कांहीं शक्य नाहीं. परंतु कांहीं सत्यें अशीं असतात कीं, त्यांचा पुनरुच्चार करणें अपरिहार्य होतें ! व त्यांपैकींच हें सत्य आहे !

सर्वसाधारण माणसें सहानुभूतीची भुकेलीं असतातच ! कांहींजणांना मात्र दुःखाप्रमाणें सुखाच्या वेळीं सहानुभवित्याची गरज वाटत नसते तर कांहींना ती वेघढीच वाटत असते ! आपल्या अंतःकरणांतील प्रत्येक भावनोद्रेक कुणाकडे तरी प्रकट केल्यावांचून त्यांना रहावतच नाहीं !

प्रकाशचा स्वभाव ह्या वळणाचा होता ! त्याचें वय आतां २७।२८ वर्षांचें असून गेलीं साडे चार वर्षें तो नौकरी करीत होता; तरी सुद्धां आपल्या ह्या स्वावलंबी जीवनांत त्याला गंमत वाटत नव्हती.

लहानपणापासून आपलीं हरेक सुखदुःखें आईच्या कानांत सांगणाऱ्या प्रकाशनें दहा वर्षांपूर्वी आई व पुढें लगेच वडील मृत्यु पावतांच आपली बालमैत्रीण कौमुदी हिला आपल्या हितगुजाची श्रोती बनविली होती !

कौमुदी व प्रकाश बाळपणापासून शेजारीं रहाणारी—जणूं एकत्रच वाढलेलीं. त्यामुळें कौमुदी म्हणजे आपल्या जीवनांतील एक विभाग आहे

असेंच जणूं प्रकाश मानीत होता! हवा, पाणी व अन्न ह्या जीवनाला अत्यावश्यक असणाऱ्या तीन वस्तूंप्रमाणेंच प्रकाशला कौमुदीहि आपल्या जीवनाला अत्यावश्यक आहे असें वाटे. अति परिचयामुळें व खूप दिवसांच्या संवयीमुळें प्रकाशला कौमुदीविषयीं मुळींसुद्धां परकीपणा वाटत नसे. आपल्या अंतःकरणाकडे हरेक सुखदुःख मोकळें करावें तसें प्रकाश कौमुदीकडे आपलें हृदय मोकळें करी. एखाद्या समवयस्क मित्राशीं गप्पा माराव्या तशा मोकळेपणानें तो कौमुदीशीं बोले. कौमुदी स्त्री, त्यांतून तरुण स्त्री असून आपणहि तरुण पुरुष आहों ह्याची त्याला आठवणच रहात नसे.

अर्थातूच, ह्या मोकळेपणाला कौमुदीची सरळ वृत्तीहि तितकीच कारणीभूत होती. कौमुदी स्वभावानें भारी गोड होती व दिसावयालाहि सुरेख होती. बाकी सौंदर्याच्या बाबतींत जरा चोखंदळेंच आवड असणाऱ्या प्रकाशला कौमुदीचें साधेंसुधें रूप सुंदर वाटत नव्हतें. व विशेषतः रश्मीच्या अव्यंग सौंदर्याबरोबर इतरांच्या सौंदर्याची तुलना करण्याची त्याला संवय झाली असल्यामुळें आतांशा कौमुदी त्याला तर अगदींच साधारण वाटे! पण हें वाटल्यावेळींच त्यानें स्वतःशीं एवढें कबूल केलें कीं रश्मीच्या बाह्य सौंदर्यापुढें कौमुदीचें बाह्य सौंदर्य—पार फिकें पडत असलें तरी कौमुदीच्या अंतःसौंदर्यापुढें—तिच्या प्रेमळ हृदयाच्या माधुरीपुढें—रश्मीचें अंतःसौंदर्य तेवढेंच फिकें पडेल! आणि हें अगदीं खरें होतें.

कौमुदी सदा दुसऱ्याचीं दुःखें निवारण करण्यांत, दुसऱ्यांच्या अडचणी दूर करण्यांत गढलेली असे! तिचें स्वतःकडे लक्षहि नसे! जात्याच टपोरे व पाणीदार असलेले तिचे डोळे नेहमीं सहानुभूतीनें भरलेले असत. आणि सौंदर्याचा निःसीम उपासक असणारा प्रकाश रश्मीच्या बारीक व तेजस्वी पण चंचल डोळ्यांपेक्षां कौमुदीच्या डोळ्यांना अधिक सुंदर ठरवी!

रश्मीच्या सौंदर्याप्रमाणें तिचे डोळेहि सूर्यरश्मीसारखे जळजळीत मादक होते; पहाणाऱ्याला ते दिपवून टाकीत. आणि कौमुदीचे डोळे चंद्रप्रकाशा-सारखे सौम्य, तेजस्वी होते. ते पहाणाऱ्याला निववीत—शांतवीत.

कौमुदीच्या ह्या प्रेमळतेमुळें ती लहानपणापासून प्रकाशच्या हितगुजाची

वांटेकरीण होतीच पण आईवडिलांच्या,—विशेषतः आईच्या मृत्यूपासून ती त्याची एकमेव मैत्रीण, हितगुजाचें एकमेव स्थान झाली !

कौमुदीलाहि वृद्ध वडिलांशिवाय आणखी कुणीच नसल्यामुळें खाणावळींत जेवून शेजारीं रहाणाऱ्या प्रकाशचें हवें नको ती मोठ्या आस्थेनें पाही.

हल्लीं ४।५ महिने प्रकाशचें मन रश्मीभोंवतीं घिरट्या घालीत आहे हें कौमुदीला कळलें होतें. परंतु तिकडे तिनें विशेष लक्ष दिलें नाहीं. लहानपणापासून सुंदर वस्तूंची आवड असणाऱ्या व स्वतः चांगलाच देखणा असलेल्या प्रकाशला आजवर ५।६ सुंदर तरुणींबद्दल असें आकर्षण वाटलें होतें व कालांतरानें ओसरलें होतें. व आतां रश्मीच्या बाबतींतहि तसेंच होणार असें ती समजत होती. त्यामुळें त्या रात्रीं आठाच्या सुमाराला घरीं येऊन प्रकाश काळोखांत तसाच झोंपला हें गड्याकडून कळतांच तिला फार आश्चर्य वाटलें. तात्यांना—आपल्या वडिलांना—जेवावयाला वाढल्यावर ती झट्दिशीं प्रकाशच्या खोलीकडे गेली.

खोलीचें दार लोटलेलें होतें. तें उघडून कौमुदी आंत शिरली व आपल्या मृदु, मंजुळ आवाजांत तिनें हांका मारल्या, "प्रकाश, ए प्रकाश, ..."

"उंऽ" आळसल्या स्वरांत प्रकाश उत्तरला. प्रकाश कौमुदीच्या हांकेला प्रत्युत्तर न देतां झोंप लागल्याची बतावणी करावी अशी इच्छा त्याला झाली होती. पण आजवर कधींहि त्यानें कौमुदीकडे असत्याचा अवलंब केला नसल्यामुळें कांहींशा अनिच्छेनेंच त्यानें हुंकार दिला.

भिंतीला असलेला दिव्याचा 'स्विच्' दाबीत कौमुदी हंसून म्हणाली, "कां रे प्रकाश, बरं नाहीं वाटत ? मग अशा अवेळीं कां झोंपलास ? अं ! आणि जेवलास काय ?"

कौमुदीच्या ह्या प्रश्नावलीला प्रकाशनें उत्तरच दिलें नाहीं. आपल्या विस्कटून गेलेल्या कुरळ्या केंसांतून बोटें खुपसत तो तसाच पडून राहिला.

"प्रकाश, जेवलास कीं नाहीं तूं ?" कौमुदीनें पुनः विचारलें.

"अं—जेवण होय ! आज किनई मला भूक नव्हती ग—नि म्हणून मीं गेलों नाहीं खाणावळींत."

निरोगी प्रकृतीच्या मध्यम स्थितींतल्या प्रकाशला कारणावांचून भूक नसण्याचे श्रीमंती दोंचले अद्यापि जडले नव्हते हें कौमुदीला चांगले ठाऊक असल्यामुळें तिनें लगेच म्हटलें, " हं, चल ऊठ जेवावयाला—माझं जेवण व्हायाचं आहे अद्यापि—चल— "

आणि प्रकाश तसाच उठून कौमुदीबरोबर शेजारीं तिच्या बिऱ्हाडीं तर गेलाच. पण आपण भूक नसल्याची सबब पुढें केली होती हें पार विसरून रोजच्या खाणावळींतल्या अन्नाच्या मानानें पंच पक्कानाहूनहि गोड वाटणारें कौमुदीच्या हातचें साधें, सुग्रास जेवण तो पोटभर जेवला. व मग कौमुदी जेवीत असतां तो तिथेंच बसून राहिला.

" जेवावयाला सुरवात करितां करितां कौमुदीनें म्हटलें, " हं, प्रकाश, आतां सांग पाहूं काय तें "

क्षणभर थांबून प्रकाश उत्तरला, " कौमुदी, माझं—माझं—रश्मीवर प्रेम जडलं आहे. "

प्रकाशचे हे शब्द ऐकतांच कौमुदीनें तोंडाजवळ आणलेला घांस तसाच खालीं टाकला. पण प्रकाशचें तिथें लक्ष नव्हतें. तो पुढें म्हणाला, "कौमुदी रश्मि किती सुंदर आहे म्हणून सांगूं. पण—पण— ती आहे लक्षाधीशाची कन्या आणि मीं हा असा दोन अडीचशांवर रखडणारा ! —रश्मीला प्रत्येक वस्तु उत्तम दर्जाचीच हवी असते ! आणि तें ठीकच आहे. तिची योग्यता आहेच तेवढी !—पण बघ, कौमुदी, आज तिच्या बागेंतील एक गुलाबाची सुंदर कळी तोडून मीं देऊं लागलों तिला नि चुकून ती खालीं मातींत पडली व म्हणून रश्मीनें ती स्वीकारण्याचें नाकारलें. कौमुदी, त्या कळीला जशी माती लागली होती तशी मलाहि दारिद्र्याची माती लागली आहे. मग—मग—रश्मि मला नाकारीलच काय ? "

आतांपर्यंत आपल्याच नादांत असलेल्या प्रकाशनें आतां कौमुदीकडे पाहिलें व भरलेलें ताट तसेंच टाकून तिला उठतांना पाहून त्यानें आश्चर्यानें प्रश्न केला, " हें काय कौमुदी, झालं तुझं जेवण ? "

" जाइनाच मुळीं. भूकच नाहीं फारशी— " असें कांहीं तरी पुटपुटत कौमुदी उठलीच आंचवायला.

विस्फारित नेत्रांनीं प्रकाश तिच्याकडे पहातच राहिला.

५।७ मिनिटांनीं कौमुदी आंतून आंचवून आली व नेहमींच्या हंसऱ्या स्वरांत म्हणाली, " हं, सांग आतां पुढें. "

पण एरवीं झाल्या एवढ्या उत्तेजनानें पुढें सांगूं लागणारा प्रकाश आज तसाच गप्प बसून राहिला. दिवसभर घरांत व शिवाय शाळेंत काम करून दमणाऱ्या कौमुदीनें मघां भूक नसल्याचा बहाणा करून भरलें ताट दूर सारल्यावेळीं क्षणभर तिची मुद्रा जी प्रकाशच्या दृष्टीस पडली ती पहातांच त्याला केवढा तरी धक्का बसला.

नेहमीं समाधानी, प्रसन्न दिसणारी कौमुदीची मुद्रा एकच क्षण भारी व्यथित व व्याकुळ बनलेली त्यानें पाहिली. व क्षणार्धांत त्याला वस्तुस्थितीचें आकलन झालें.

कौमुदीचें आपल्यावर प्रेम आहे.

आणि ही जाणीव होतांच प्रकाशच्या प्रेमळ हृदयाला पीळ पडला.

त्याला वाटलें, किती चमत्कारिक परिस्थिती ही ! कौमुदीचें आपल्यावर प्रेम – आपलें रश्मीवर – नि रश्मीचें ? – हं ! – काय सांगावें ? —

इतक्यांत कौमुदीनें बाहेर येऊन त्याला आपली प्रेमकहाणी पुढें सांगण्याबद्दल सूचना केली. त्याबरोबर प्रकाशनें क्षणभर कौमुदीकडे टक लावून पाहिलें. पण कौमुदीनें आतां आपलें हृदय ताब्यांत ठेविलें होतें. अगदीं प्रकाशच्या नजरेला नजर देत तिनें पुनः म्हटलें, " सांग ना प्रकाश, तूं पुढें काय करणार तें. "

एक अस्फुट निःश्वास सोडून प्रकाश उत्तरला, 'काय करणार ? उद्यांच्या उद्यांच काय तो सोक्षमोक्ष करणार. रश्मीला उद्यां स्पष्ट सवाल टाकणार. कौमुदी, ती काय उत्तर देईल ग ? "

" ती जर शहाणी असली, सहृदय असली तर तुझ्या मागणीचा स्वीकार करील. प्रकाश, तिच्याकडे पैशाची श्रीमंती आहे तर तुझ्याकडे बुद्धीची नि मुख्य म्हणजे–हृदयाची श्रीमंती भरपूर आहे ! "

" हुं. म्हणजे एकूण रश्मि माझ्या मागणीचा स्वीकार करील असं वाटतं तर तुला ! पण–पण–कौमुदी, तुझी इच्छा काय आहे ? रश्मीनें

माझ्या मागणीचा स्वीकार करावा असं तुला वाटतं, कीं करूं नये असं वाटतं ? "

प्रकाशवर आपली आज किती वर्षे निःसीम प्रीति आहे हें आपलें गुपित त्यानें ओळखलें असेल ही कौमुदीला कल्पनाहि नसल्यामुळें प्रकाश नेहमीं-प्रमाणें स्वतःच्या प्रेमपाशाचा आपल्याकडे मोकळेपणानें ऊहापोह करीत आहे असेंच तिला वाटलें. व आपल्या सुस्वभावानुसार ती म्हणाली, ' खरं सांगूं प्रकाश, रश्मीचं जर तुझ्यावर खरंखुरं प्रेम असेल, ती आपल्याला सुखी करील अशी जर तुझी पूर्ण खात्री असेल तर तुझ्या मागणीचा तिनें अवश्य स्वीकार करावा असें मला तरी वाटतं. "

अगदीं मनापासूनच बोलली हें कौमुदी. आणि आपल्या सुखाची काळजी वहाणाऱ्या तिच्या ह्या वृत्तीचें प्रकाशला पूर्वीसुद्धां कौतुक वाटलें असतेंच. पण आतां अचानक रीतीनें तिचें गुपित कळून आल्यामुळें तर तिच्या ह्या निःसीम चांगुलपणाचें व प्रेमळतेचें त्याला फारच कौतुक वाटलें. केवळ आपल्या सुखाचीच आस बाळगणारी तिची ही आपल्यावरील निःस्वार्थी प्रीति पाहून प्रेमासाठीं भुकेल्या असणाऱ्या प्रकाशचे डोळे पाण्यानें भरले. व तें कौमुदीला दिसूं नये, तिचें गुपित आपल्याला कळलें आहे हें तिनें त्यावरून ओळखूं नये म्हणून मग एक अक्षरहि पुढें न बोलतां तो लगेच आपल्या खोलींत निघून गेला.

त्या रात्रीं ईश्वराची झोंपतेवेळीं प्रार्थना करण्यासाठीं म्हणून कौमुदी किती तरी वेळ बिछान्यावर बसूनच होती. प्रार्थनेसाठीं तिचें मन एकाग्रच होईना.

" रश्मीवर माझं प्रेम जडलं आहे—" हे प्रकाशचे शब्द पुनः पुनः तिच्या कानांत घुमत. आजवर बऱ्याच वेळां प्रकाशनें प्रणयाचे तडाखे अनुभविले होते. पण त्या त्या वेळीं मीं अमकीतमकीच्या मोहांत अडकलों आहे, पाशांत पडलों आहे " वगैरे मोठ्या अलंकारिक भाषेंत तो वर्णन करीत असे. पण आतां रश्मीवर आपलें प्रेम जडल्याची बातमी त्यानें अगदीं साध्या, सरळ शब्दांत सांगितली. व त्यामुळेंच कौमुदीला धक्का बसला.

आजपर्यंत प्रकाशच्या डोळ्यांना गुंतविणाऱ्या व जिभेला गडबडविणाऱ्या मोहाचा हा नवा मासला नव्हे. ह्यावेळीं प्रकाशच्या हृदयापर्यंत कळ गेली आहे हें कौमुदीनें ओळखलें.

प्रकाशला सुखी ठेवण्याबद्दल तिनें ईश्वराला विनविण्यास सुरुवात केली इतक्यांत तिला चटदिशीं प्रकाशनें आपल्याला विचारलेल्या प्रश्नाची आठवण झाली.

" रश्मीनें माझ्या मागणीचा स्वीकार करावा असं तुला वाटतं, कीं करूं नये असं वाटतं ? " — हं — रश्मीनें प्रकाशच्या मागणीचा स्वीकार केला तर आपला मनोरथ कायमचा भंग पावणार — पण रश्मीशीं विवाह झाल्यानें प्रकाश सुखी होणार असला तर ! — प्रकाशचें सुख अधिक कीं आपलें दुःख अधिक !

प्रकाशचें — अर्थात् प्रकाशचें — व आपल्या हृदयाला हें उत्तर पुनः पुनः ऐकवीत कौमुदीनें ईश्वराला प्रकाशचें सुख पूर्णपणें साधण्याबद्दल मनोभावानें विनविलें.

# ३ मागणी घातली !

आणि मग दुसऱ्या दिवशीं सकाळीं कौमुदीची भेटहि न घेतां प्रकाश रश्मीच्या घरीं गेला.

नौकरानें ताईसाहेबांपर्यंत वर्दी पोंचविल्यावर सुमारें दहा मिनिटांनीं प्रकाशला पहिल्या मजल्यावरील रश्मीच्या खोलींत नेण्यांत आलें.

आज पहिल्यांदाच प्रकाश रश्मीच्या खास खोलींत पाऊल ठेवीत होता.

अत्युत्तम फर्निचरनें सुसज्जित केलेली ती खोली— खोली कसली; मोठा थोरला दिवाणखानाच तो— पाहून प्रकाश थक्क झाला.

त्या खोलीमधील समोरच्या भिंतीशीं ठेविलेलें तीन बिलोरी आरशांचें तें 'ड्रेसिंग टेबल,' उजव्या बाजूच्या भिंतीशीं ठेविलेलें मजेशीर अर्धवर्तुळाकार कपाट, पलीकडे कोनांत अर्धवर्तुळाकार आरसा असलेलें तें 'चेस्ट ऑफ ड्रॉवर्स' आणि तिसऱ्या भिंतीशीं शोभणारी ती 'मॉडर्न' कॉट— अगदीं मोजकेंच फर्निचर होतें.

त्याचप्रमाणें भिंतीच्या फिक्या बदामी रंगाहून किंचित् चढत्या बदामी रंगाचे रेशमी, जाळीदार पडदे दारांना व खिडक्यांना झुलत होते. व त्याहून गडद बदामी रंगाचा उंची 'पर्शियन् कार्पेट्' जमिनीवर आंथरला होता.

खोलींतील तें सुंदर, सुसज्जित फर्निचर व ही एकंदर रंगसंगति मोठी

मनोहर दिसत होती. प्रकाशनें मनांतल्या मनांत रश्मीच्या अभिरुचीला शंभरांपैकीं शंभर मार्क देऊन टाकले.

खोलीच्या बाहेरील बाजूला खूप रुंद असा सज्जा असून तिथें बदामी रंगाच्या मखमलीनें मढविलेले कोंच व खुर्च्या ठेविल्या होत्या व तिथेंच रश्मि आधुनिक नेपथ्यविधानाबद्दलचें एक इंग्रजी मासिक वाचीत बसली होती.

खाणींतून निघालेला हिरा मौल्यवान असला तरी त्याला व्यवस्थित पैलू पाडल्यानेंच तो शोभिवंत दिसत असतो! रश्मि जात्या सुंदर होती खरी, परंतु मोहक पेहेराव व त्याला शोभेसें भोंवतींचें रम्य वातावरण ह्यामुळें पैलू-दार हिरकणीप्रमाणें तिचें तेज डोळ्यांत भरे.

आज २।३ महिने प्रकाश तिला ओळखीत होता. रोज संध्याकाळीं तो तिच्या घरीं येत असे. व त्यावेळीं रश्मि बहुधा बागेंत फिरत असलेली त्याला आढळे. रंगीबेरंगी फुलांच्या ताटव्यांतून एखाद्या स्वच्छंदी फुलपांखरा-सारखी भिरभिरणारी रश्मि त्याला मनोहारिणी वाटेच. पण आज ह्या घरगुती वातावरणामध्यें त्याला ती अतिशयच मोहक वाटली. त्या खोलींतील त्या उंची फर्निचरमधून रश्मीची श्रीमंती चांगलीच डोकावीत असूनहि, आजवर आपल्यांत व तिच्यांत असणारा दूरीभाव आज बराच नष्ट झाला असें प्रका-शला वाटलें व त्याच्या मनाला बराच धीर आला.

" कोण प्रकाश! या ना. " खास पैदा केलेल्या आपल्या नेहमींच्या आलस्यभरित, मृदु मंद आवाजांत रश्मि म्हणाली.

फार वेळ अंधारांत राहिलेला माणूस एकदम उजेडांत आला कीं, त्याचे डोळे जसे दिपतात त्याप्रमाणें रश्मीचें झगझगीत सौंदर्य दृष्टीस पडल्यावेळीं प्रकाशचे डोळे दिपून जात. आणि आज तर एका बड्या सर-दारांच्या घरीं जेवावयास जावयाचें असल्यामुळें रश्मीनें विशेषच थाट केला होता.

वीतभर उंचीची बनारसी जरीधारी लाविलेली मोतिया रंगाची जॉर्जेटची साडी ती नेसली होती. त्या साडीच्या रेशमी वेष्टणामधून रश्मीच्या बांधेसूद

शरीराचें सौंदर्य जणूं ओसंडत होतें. तिच्या गोऱ्यापान वर्णाशीं साहीचा तो मोतिया रंग जणूं स्पर्धा करीत होता.

पन्नास रुपये खर्चून आदल्या दिवशीं 'हेअर ड्रेसर'कडून बनविलेल्या तिच्या कुरळ्या केसांच्या बटी तर प्रकाशला फारच मोहक वाटल्या. अर्थात्‌च आपल्या कुरळ्या केसाप्रमाणें रश्मीचे केंसहि नैसर्गिक कुरळे आहेत असेंच तो समजत होता. रश्मीचें सौंदर्य नव्याण्णव टक्के अस्सल असून त्यांत मोहक केशवेषभूषेचा अवघा एक टक्का मिसळून तें शंभर टक्के रम्य बनतें असेंच त्याला वाटत होतें. केशवेषभूषेंत फार थोडा वेळ घालविणाऱ्या कौमुदीवरू-नच मुळीं स्त्रीजातीची जर पारख तो करीत होता तर त्याला अशी भूल पड-ल्यास नवल काय !

शिवाय रश्मीच्या सौंदर्याच्या मोहांत सध्यां तो इतका अडकला होता कीं, त्याची बुद्धीच मुळीं ठिकाणावर नव्हती. मग अस्सल नक्कलमधील तफावत जाणण्याइतका विचार तरी त्याला कसा सुचणार होता !

आतां रश्मीनें त्याच्याकडे पाहून स्मित करितांच त्याची उरली सुरलेली विचारशक्तीहि वितळून जाऊं लागली.

बाकी रश्मीचें स्मित होतेंच तसें मोहक ! तिची चर्या नेहमीं कुर्रेबाज असूनहि आपलें सौंदर्य वाढविण्याला मदत करणारें स्मित ती आपल्या मुद्रे-वर सतत खेळवीत असे !

रश्मीची शिक्षणांत मुळींच प्रगति नव्हती ह्याचें कारण तिची सामान्य बुद्धिमत्ता हें नव्हे; तर तिला शिक्षणाची मुळींच आवड नव्हती हेंच खरें ! वास्तविक तिची बुद्धि चांगली तेजस्वी होती. कारण आपली इतरांवर कशी छाप बसेल हें बरोबर ओळखून ती वागे. त्याचप्रमाणें प्रमाणशीर नेपथ्य-विधानाच्या मदतीनें व मधुर, नाजुक हंसण्याबोलण्याच्या साहाय्यानें ती आपलें मोहक सौंदर्य मोहकतर व परिणामकारक करी तें काय उच्च बुद्धि-मत्तेच्या अभावीं ?

आतां पुनः प्रकाशकडे पाहून ती किती गोड हंसली. अगदीं जणूं अंतःकरणाच्या आपुलकीनेंच हंसली. तें हास्य पाहून प्रकाशला केवढा धीर आला, किती हुरूप वाटला.

तो पुढें येऊन रश्मीच्या समोरील खुर्चीवर बसतांच रश्मि त्याच इंग्रज्या स्वरांत म्हणाली, "प्रकाश, आज पहिल्यांदाच तुम्हीं माझ्या खोलींत आलां, नाहीं ?"

"खोलींत ? खोली कसली ही ? महालच आहे कीं हा !"

प्रकाशच्या ह्या उद्गारानें रश्मि खूष झाली व मानेला बारीकसा झटका देऊन व हनुवटी किंचित् पुढें काढून तिनें म्हटलें, "अस्सं ? हा महाल आहे तर एकूण ! वा:, बोलण्यांत बरेच पटाईत आहांत कीं, तुम्हीं. पण मग प्रकाश, हा जर महाल, तर मीं ह्या महालांतील राजकन्या वाटतं !"

"अर्थातूच ! आणि आणि रश्मि" अगदीं सहजीं रश्मीला एकवचनानें संबोधीत प्रकाश म्हणाला, "रश्मि, मीं—मीं एक दरिद्री भिकारी ह्या राजकन्येला मागणी घालावयाला आलों आहे. रश्मि, तुझ्या मानानें मीं दरिद्री खराच, पण माझ्या प्रीतीची अमोल श्रीमंती तुझ्या चरणीं वहायाला मीं आलों आहे. रश्मि, रश्मि. माझ्या ह्या दानाचा तूं स्वीकार करशील काय ?"

प्रकाश अगदीं अंतःकरणापासून बोलत असल्यामुळें त्याची मुद्रा फार भावनाविवश दिसत होती. त्याच्या हृदयांत चाललेली खळबळ त्याच्या चर्येवर यथातथ्य प्रतिबिंबित झाल्यामुळें मूळचा देखणा असणारा त्याचा चेहरा आतां एवढा रसरशीत व उमदा दिसत होता कीं, रश्मि त्याच्याकडे पहातच राहिली.

आपल्या अतुल सौंदर्यामुळें रश्मि अनेक तरुणांची उपास्यदेवता असली तरी ती स्वतःहि सौंदर्योपासिका होती. तिला चित्रकलेचा फार नाद असून आर्टस्कूलमध्यें शिक्षण घेऊन त्या नादाला तिनें शास्त्रीय ज्ञानाची जोड दिली होती. व दुसरें असें कीं, सदां कृत्रिमतेनें वेढलेल्या रश्मीला प्रकाशचा हा अकृत्रिम भावनोद्रेक व तज्जन्य सुंदरता अतिशय नवलपूर्ण व आकर्षक वाटली.

ती मोठ्या कौतुकानें त्याच्याकडे पहातच राहिली. प्रकाशला ही कांहींच कल्पना नसल्यामुळें तो पुनः आर्जवून म्हणाला, "सांग ना रश्मि, माझ्या प्रीतिदानाचा तूं स्वीकार करशील काय ?"

" प्रकाश, ह्यावेळीं तुम्ही किती किती देखणे दिसतां आहां " भिवया उडवीत रश्मि उद्गारली.

तिचा हा उद्गार ऐकून प्रकाश लाजला, खिजला.

सुंदर तरुणी आपल्या सौंदर्याची स्तुति ऐकून लाजते, हंसते. पण सुंदर तरुणाला आपल्या देखणेपणाची स्तुति अशी रुचत नसते !

सौंदर्य हें केव्हांहि स्तुत्य असलें तरी पराक्रम हें पुरुषाचें खरें सौंदर्य असल्यामुळें प्रकाशसारख्या महत्वाकांक्षी, पराक्रमी तरुणाला आपल्या प्रीति-देवतेनें आपल्या पराक्रमाचें कौतुक करावें असेंच वाटत असतें ! तिनें आपल्या हृदयाच्या सौंदर्यावर आकृष्ट व्हावें अशी आस त्याच्या मनाला असते ! आपल्या बाह्य सौंदर्यावर आपल्या प्रेयसीनें मोहित व्हावें अशी इच्छा खऱ्या प्रेमवीराला कधींच होणार नाहीं. उलट आपली हृदयदेवी आपल्या देखण्या रूपावर भाळली आहे ही घटना त्याला लाजिरवाणी वाटेल. त्याला त्यामुळें आनंदाऐवजीं खेदच वाटेल !

प्रकाशला असाच खेद वाटला. क्षणापूर्वीं आनंद, उत्सुकता, प्रेम ह्या भावनांनीं उज्वलित झालेली त्याची चर्या लज्जेनें व खेदानें काळवंडली. त्याच क्षणीं तिथून निघून जावें असें त्याला वाटलें.

पण आशा आणि मोह त्या आशेनें त्याला धरून ठेविलें मोहानें त्याला पायबंद घातला. मात्र एक अस्फुट सुस्कारा सोडून तो खिन्न स्वरांत म्हणाला, " रश्मि, माझ्या रूपाला तूं भुलावंस अशी माझी अपेक्षा नाहीं. माझ्या प्रीतीचा तुला मोह पडावा ह्या आशेनें मी तो प्रश्न केला."

" पण प्रकाश, " रश्मि हंसत हंसत उत्तरली, " तुम्हांला माझ्या रूपा-नेंच नाहीं कां भुलविलेलं ? मग ? "

" मग ? रश्मि, सौंदर्य हा स्त्रीचा पराक्रमच असतो ! ह्या पराक्रमाच्या जोरावरच ती आपल्या प्रियकराचें हृदय काबीज करीत असते. पण-पण— रश्मि, पुरुषाच्या बाबतींत सौंदर्याला अशी किंमत नसते—नसावी अशीच पुरुषाची इच्छा असते. रश्मि, पराक्रम हें पुरुषांचें सौंदर्य असतें. मी कांहीं फार मोठा पराक्रमी नाहीं. परंतु स्वतःच्या मगदुरावर एंजिनिअर होऊन आज मी दरमहा अडीचशें रुपये कमावतो आहे. अर्थात्च तुझ्या श्रीमंतीच्या

मानानें हें कांहींच नव्हे. पण सर्वसाधारण माणसाच्या दृष्टीनें हा थोडाफार पराक्रमच आहे. आणि रश्मि, तुझ्यावरील माझें प्रेम मात्र असाधारण, अमोल आहे. रश्मि--"

पण रश्मीला प्रकाशच्या पराक्रमापेक्षां किंवा प्रेमापेक्षां त्याचें देखणें रूपच सर्वांत अधीक अमोल वाटत होतें. ती एकाग्र नजरेनें त्याच्याकडे पहात होती.

ही नजर सहन न होऊन प्रकाशनें मान खालीं घातली व तो बोलतांना मध्येंच थांबला.

त्याबरोबर रश्मि खुदकन् हंसून म्हणाली, "प्रकाश, कांहीं पुरुष नटवे असतात, अगदीं बायकांसारखे नटतात मुरडतात ते! त्यांच्या रूपाचं कौतुक केलं तर त्याबद्दल त्यांना लाज वाटावी हें योग्य आहे. पण बाई, तुम्हाला कां लाज वाटावी? अं? देवानें तुम्हाला दिलेली ही स्वरूपाची केवढी मोठी देणगी आहे—बरं! नाहीं तुम्हांला आवडत तर त्याबद्दल मी नाहीं आतां बोलणार झालं?—पण म्हटलं, आपल्या प्रश्नाचं उत्तर तरी हवं आहे ना तुम्हांला!"

ह्यावर कांहीं एक न बोलतां प्रकाशनें एक मंद निःश्वास सोडला. त्याबरोबर रश्मि नाजूक नाजूक हंसली.

ती नेहमींच हंसे म्हणा. व तिच्या गोड सौंदर्याबरोबर तिच्या ह्या अखंड, हंसऱ्या वृत्तीनें, फुलपांखरी आनंदी वृत्तीनेंच प्रकाश मोहित झाला होता. पण आज तिची ही हंसरी वृत्ति त्याला कडु वाटली. त्या तिच्या हास्याचें त्याला नेहमींप्रमाणें कौतुक वाटलें नाहीं. त्यामुळें तो तसाच स्वस्थ बसून राहिला.

त्याबरोबर किंचित् पुढें झुकत रश्मीनें म्हटलें, "प्रकाश, प्रेम एका बाजूनेंच उत्पन्न होऊं शकतं काय हो?"

तिच्या ह्या अनपेक्षित प्रश्नानें प्रकाश दचकला. त्याची खिन्न मुद्रा आशातुर बनली. पुनः आशा व मोह ह्यांचा विजय झाला. त्यानें उत्सुक नजरेनें हळूंच रश्मीकडे पाहिलें.

किंचित् थांबून रश्मीनें पुनः म्हटलें, "हें हो काय प्रकाश? माझ्या प्रश्नाचं उत्तर द्या ना. सांगा, प्रेम एका बाजूनेंच उत्पन्न होऊं शकतं कां?"

"अं--नाहीं." जरा घुटमळत प्रकाश उत्तरला.

“ नाहीं ना ? मग झालं तर ! ज्याअर्थी तुमचं माझ्यावर प्रेम जडलं आहे त्याअर्थी माझंहि तुमच्यावर तसंच जडलं आहे हें सिद्ध झालंच कीं—”

वास्तविक रश्मीच्या ह्या प्रेमसिद्धीकरणानें प्रकाशला आनंद व्हावयाला हवा होता. पण रश्मीनें मुळांत गृहीत धरलेला सिद्धांतच त्याला पटला नव्हता. प्रेम एकाच बाजूनें उत्पन्न होऊं शकत नाहीं हेंच त्याला वस्तुतः पटत नव्हतें—कारण हा सिद्धांत जर खरा असता तर जगांत कुणाचाच प्रेम-भंग झाला नसता. व एकाच तरुणीवर अनेक तरुणांचें प्रेम बसल्यावेळीं इतक्या जणांना उलट प्रेमाचा पुरवठा करितां करितां त्या बिचारीला नको जीव—नको प्रेम—असें होऊन गेलें असतें !

—हा सिद्धांत खरा असता तर कुणाचाच प्रेमभंग झाला नसता !—मग कवीच्या काव्याचा विषय अतिशयच मर्यादित झाला असता !

आणि—आणि—कुणाचाच प्रेमभंग झाला नसता—तर—तर कौमुदीच्या आपल्यावरील प्रेमाचं साफल्य झालें असतें !—मग आपलें रश्मीवरील प्रेम—अं—आपलें तर रश्मीवरच प्रेम आहे. प्रेम काय असें अमुकच व्यक्तीवर कर म्हटल्यानें करितां येतें काय ?—आणि आणि किती तरी वेळां प्रेम एकाच व्यक्तीकडून केलं जातं ना ? इच्छित व्यक्तीकडून त्या प्रेमाचा पुरस्कार होत नसतो !—आणि तरीहि रश्मीनें ह्या बाबतींत आपलें मत विचारतांच तिचा कल जाणून आपण उत्तर देऊन टाकलें, कीं एकाच व्यक्तीकडून प्रेम केलं जात नाहीं म्हणून.

आणि त्या उत्तराच्या जोरावर तिनें आपल्यावर तिचें प्रेम असल्याचें सुचविलें.

पण त्यामुळें प्रकाशचें समाधान झालें नाहीं. मूळ सिद्धांत चुकीचा गृहीत धरला असेल तर उत्तर बरोबर कसें येईल ?—मग आतां हें रश्मीचें उत्तर—तिचें आपल्यावर प्रेम असल्याचा हा जाब काय चुकीचा ?—

प्रकाशला कांहींच समजेना. आपलें रश्मीवर जसें उत्कट प्रेम आहे तसें तिचें आपल्यावर असतें तर तें पटविण्यासाठीं अशा अपवादात्मक अर्धसत्याचा आधार तिला घ्यावाच लागला नसता हें प्रकाशला कळत होतें पण वळत नव्हतें !

तो गरजवंत होता व त्याचमुळें त्याची अक्कल असून नसल्यासारखी झाली होती. व त्यामुळें रश्मीनें आपली मागणी पार धुडकावून लाविली नाहीं एवढ्यांतच समाधान मानण्याचें त्यानें ठरविलें. पण तरी त्याच्या हृद-याला खरें समाधान वाटलें नाहीं. व मग रश्मीनें लाडिक, लाडिक स्वरांत त्याला दुसऱ्या दिवशीं संध्याकाळीं अवश्य येण्याबद्दल बजाविलें तरी त्यावर कांहींशा रूक्ष स्वरांतच 'हुं'कार देऊन तो तसाच घरीं परतला.

## ४ होकारापेक्षां नकारच बरा

मनुष्यस्वभावाची ठेवणच अशी मजेशीर आहे कीं, त्याला कोणत्या वेळीं कोणत्या घटनेपासून आनंद होईल किंवा होणार नाहीं हें कांहीं नक्की सांगणें शक्य नाहीं !

रश्मीला मागणी घालीतोंवर, आपली मागणी ती धुडकावून लावील कीं काय अशी भीति प्रकाशला व्याकुळ करीत होती. आणि आतां रश्मीनें ती मागणी धुडकावून तर लाविली नाहींच, पण उलट, आपलें प्रेम त्याच्यावर असल्याचें ध्वनित केलें तरी प्रकाशचें हृदय मधूनमधून व्याकूळ होऊं लागलें. त्याला कांहीं आनंद वाटेना.

रश्मीचें प्रेम आपल्यावर, आपल्या शीलावर, गुणावर, स्वभावावर कांहीं जडलेलें नाहीं. तर स्वतःच्या नाजुक जनानी सौंदर्याला आपलें मर्दानी सौंदर्य खुलून दिसेल असें वाटल्यामुळेंच तिचें आपल्यावर प्रेम बसलें आहे हें प्रकाशला आतां कळून आल्यामुळें त्याला तें अपमानास्पद, लाजिरवाणें वाटूं लागलें !—

—म्हणजे, रश्मीच्या महालाची शोभा वाढविण्यासाठीं सुंदर फर्निचर जसें घेतलें आहे तसें तिच्या सौंदर्याची शोभा वाढविण्यासाठीं तिला सुंदर नवऱ्याची आतां आवश्यकता वाटत आहे तर ! — म्हणजे निर्जीव फर्निचरची जी किंमत तीच आपली ना ? — हं ! रश्मीचा निरोप घेऊन

घरीं येतेवेळीं प्रकाशच्या मनांत हे विचार घोळत होते व शेवटीं तर त्याला असें वाटलें कीं, ह्यापेक्षां रश्मीनें चक्क नकार दिला असता तरी बरें !

बिचारा प्रकाश ! भारी केंविलवाणी स्थिति झाली होती त्याची !—आणि शिवाय साराच तोंड दाबून बुक्क्याचा मार !— त्यानें होऊन रश्मीला मागणी घालून हा प्रसंग जणूं बोलावून आणला होता — मग ह्याचा राग आतां काढणार कुणावर ?— बरं, ह्याबद्दल बोलणार, चालणार तरी कुणाकडे ? —

रश्मीकडे तर शक्यच नव्हतें.

मग काय कौमुदीकडे ?—

अंहं ! तिथेंच तर सारं अडत होतं ना !—बाळपणींच्या वल्गना व तारुण्यांतील कल्पना आजवर प्रकाश कौमुदीच्याच कानांत गुणगुणत आला. पण आतां तो मार्ग त्याला मोकळा राहिला नव्हता, व त्याचमुळें त्याच्या अंतःकरणाचा इतका कोंडमारा होत होता.

त्याच्या हृदयाला रश्मीच्या सौन्दर्याचा मोह पडला होता. पण त्या स्थितीतहि आपल्यामध्यें व रश्मीमध्यें केवढी जबर विषमता, सामाजिक, आर्थिक व मुख्यतः मानासिक विषमता आहे याची जाणीव त्याला होत होती. व त्यामुळें रश्मीची व आपली खरी, दृढ प्रीति जुळणें शक्य नाहीं हें त्याच्या बुद्धीला कळत होतें. पण हृदयाला वळत नव्हतें !

त्याचें हृदय व त्याची बुद्धि ह्या दोन्हीमध्यें कशी 'रस्सीखेंच' सुरू होती !—

रस्सीखेंच !— हरघडीं प्रत्येक व्यक्तीच्या बाबतींत अशी रस्सीखेंच चालू असते !—

प्रत्येक माणसाच्या बुद्धिहृदयामध्यें सामाजिक, धार्मिक, राजकीय व प्रेमविषयक घटनाबाबत अशी रस्सीखेंच होत असतेच ! मनुष्यप्राणी कधीं हृदयाची हांक ' ऐकतो तर कधीं बुद्धीनें शिकविलेली 'कर्तव्याची जाणीव' बाळगतो ! —

रश्मीवर आपलें भावनोत्कट प्रेम आहे ही हृदयाची हांक प्रकाशला ऐकूं येत होती, पण त्याच वेळीं रश्मीचें आपल्यावर तसें उत्कट प्रेम

नाहीं व त्यामुळें तिच्याशीं विवाह केल्यानें आपल्या संसारसुखाचा ताजवा समतोल रहाणार नाहीं अशी जाणीव त्याची बुद्धि त्याला देत होती. मग ऐकावयाचें कुणाचें ! हृदयाचें कीं बुद्धीचें !

हृदयाच्या चंद्रप्रकाशांत मिटल्या डोळ्यांनी चांचपडावयाचें कीं बुद्धीच्या सूर्यप्रकाशांत उघड्या डोळ्यांनीं वावरावयाचें !–

मौज अशी कीं, हृदयाचा व बुद्धीचा समेट केल्यानें, थोडें हृदयाकडे व थोडें बुद्धीकडे लक्ष पुरवावयाचें अशा धोरणानें वागल्यानेंच संसारात खरें सुख लाभत असतें हें मात्र प्रकाशच्या डोक्यांतच आलें नाहीं. येणार कुठून !– विचारावर जिथें विकाराचा जय झाला होता तिथें सारा अविचाराचा गोंधळ व्हावयाचाच !–

व असा गोंधळ झाल्यामुळेंच प्रकाशला कौमुदीच्या सल्ल्याची आवश्यकता विशेषच वाटत होती. पण त्या दिवशीं कौमुदीचें गुपित त्याला चुकून कळून आल्यामुळें ह्यापुढें आपल्या व रश्मीच्या प्रेमगुपिताविषयीं तिच्याकडे कांहींहि बोलावयाचें नाहीं असें आपल्या प्रेमळ स्वभावानुसार त्यानें ठरवून टाकलें होतें. व त्यामुळेंच आतां त्याचा अधिकच कोंडमारा होत होता.

तो दिवस त्यानें कसातरी काढला. त्या रात्रीपर्यंत त्यानें धीर धरला पण त्याच्या हृदयाचा अस्वस्थपणा मग इतका वाढला कीं, 'सबसे जीव प्यारा' ह्या न्यायानें आपल्या प्याऱ्या जीवाच्या समाधानासाठीं कौमुदीला सर्व हकीकत सांगून टाकावयाची. तिचें गुपित आपल्याला जणूं कळलेलेंच नाहीं असें तिला व स्वतःलाहि भासवून तिच्याकडे आपल्या मनोयातना उघड करावयाच्या – अगदीं सकाळीं उठल्याबरोबर तिला सारें सांगावयाचें असें प्रकाशनें त्या रात्रींच नक्की जेव्हां ठरविलें तेव्हां कुठें त्याला साधारण तरी झोंप लागली.

रात्रींच्या अस्वस्थ, अपुऱ्या झोंपेमुळें सकाळीं त्याला जरा उशीराच जाग आली. मग घाईघाईनें प्रातर्विधि व चहापान आटोपून तो रात्रींच्या निश्चयानुसार कौमुदीच्या खोलीकडे जाणार इतक्यांत कुठेंतरी बाहेर जाण्याच्या तयारींत कौमुदीच त्याच्याकडे आली व त्याला स्वतःला बोलावयाला अवसरहि न देतां ती म्हणाली, "प्रकाश, आत्तां सीतागडला निघालें मी–"

" सीतागडला ! आणि तें कशाला !"

" सीतागडच्या राणीसाहेबांची आणि माझी शाळेपासूनची मैत्री आहे हें तुला ठाऊकच आहे. नि काल संध्याकाळीं त्यांचं — माझ्या लाडक्या कमलचं मला पत्र आलं कीं, आपण आजारी आहो. तावडतोब येऊन भेटून जा."

" अस्सं. मग काल नाहीं तें मला कळविलंस ?"

" केव्हां कळविणार ! काल पत्र आलं तेव्हां तूं घरीं नव्हतास. मग जेवण लौकरच आटोपून रजेबद्दल विचारण्यासाठीं घाईघाईनें आमच्या प्रिन्सिपल्‌बाईकडे गेलें मी नि तिथून परतावयाला जवळजवळ नऊ वाजले. मग आल्याबरोबर जरा सामानसुमानाचें पहावयाचें होतें ना.—"

" हं, हं."

" नि प्रकाश, मला असं वाटतं कीं, कमलेला शारीरिक आजार झालेला नसून कसल्या तरी मानसिक त्रासांत ती असावी."

" अस्सं ? हें कशावरून बुवा ताडलंत, डिटेक्टिव्ह महाराज – नव्हे, डिटेक्टिव्ह महाराणी ?" प्रकाशनें हंसून प्रश्न केला.

काय असेल ते असो ! कौमुदी आतां त्याच्या खोलींत येतांच, तिची ती सौम्य, प्रेमळ मुद्रा पहातांच प्रकाशला आपल्या मनोव्यथेचा विसर पडला. कालपासून त्याच्या वृत्तीला आलेला जडपणा क्षणार्धांत मावळला. नेहमींप्रमाणें कौमुदीशीं चेष्टा-विनोद करण्याइतपत तो खुषींत आला. व त्याच्या ह्या शेवटल्या चेष्टोद्गारावर कौमुदीनें जेव्हां कांहींशा रुसक्या भावानें नेहमींप्रमाणें आपल्या रेखीव भिवया आकुंचित केल्या तेव्हां तर प्रकाशला अगदीं मनापासून हंसू आलें.

व तें पाहून लटक्या कोपानें जेव्हां कौमुदीनें म्हटलें कीं, " हें रे काय प्रकाश ? अशी जर तूं चेष्टाच करणार असलास तर मी नाहीं हं तुला कांहीं सांगणार." तेव्हां तर आपल्याला हवें होतें तें मिळालें अशा आवि-र्भावानें प्रकाशनें हंसतहंसत मान डोलविली व मग आपल्या पोरकट स्वभावानुसार बळेंच गंभीर, लांब चेहरा करीत तो म्हणाला, "बरं बुवा अगदीं चेष्टा बंद ! आतां बोला पुढें—"

त्यासरशीं कौमुदीला खुदकन् हंसू आलें. आणि तिचें हें हास्य पाहून मघांपासून विसर पडलेल्या त्या विषयाची — रश्मीची — प्रकाशला चटकन् आठवण आली.

रश्मी सदोदित हंसत असे. आणि कौमुदी प्रसंगविशेषींच हंसे. प्रारंभीं प्रकाशला रश्मीचें हें अखंड हास्य मोहक वाटलें तरी आतां त्यांतील नवी नवलाई नष्ट झाली असल्यामुळें त्यामध्यें त्याला हल्लीं कृत्रिमताच दिसूं लागली होती. विशेषतः काल तर रश्मीच्या त्या सतत हंसऱ्या चर्येचा त्याला कसा कंटाळा आला.

त्यामुळें आतांचें हें कौमुदीचें अकृत्रिम हास्य पाहून प्रकाशच्या मनांत आलें, कौमुदीचें हास्य म्हणजे जणूं आकाशांत कधींमधीं चमकणारी बिजली !— आणि रश्मीचें हास्य म्हणजे हुकमी, बटन दाबून पेटविलेली विजेची बत्ती !

टिचभर मोजक्या कागदावर रंगविलेल्या वनश्रीच्या देखाव्यासारखें रश्मीचें हास्य मनोहर परंतु मोजकें व निर्जीव ! — आणि क्षणोक्षणीं बदलती रंगसंपदा धारण करणाऱ्या रम्य, नैसर्गिक वनश्रीसारखें कौमुदीचें हास्य जिवंत, निर्व्याज व अनिर्बंध !

जरा जास्ती हंसल्यास आपली केशवेशभूषा बिघडेल कीं काय ह्या भीतीनें रश्मीचें हास्य सदा धास्तावल्यासारखें — कधीं मनमोकळें नाहीं ! आणि तेंच कौमुदीचें हास्य ! — डोंगराच्या कपारींमधून नादमधुर खळखळ करीत जाणारा ओढाच जणूं !—

रश्मि व कौमुदी ह्या दोघींच्या हास्यामधील तफावतीची अशी स्वतः— शींच मीमांसा करण्यांत प्रकाश आणखी किती वेळ गुंतला असता कोण जाणे ! पण तेवढ्यांत कौमुदी म्हणाली, "असं पहा प्रकाश, कमल खरो- खरीच जर आजारी असती तर पत्रांतील तिचं हस्ताक्षर चांगल्या, निरोगी सशक्त माणसासारखं ठाकठीक, वळणदार कसं आलं असतं ? नि तरीही पोरगी लिहिते कीं आपण आजारी आहे म्हणून—मग ह्यावरून काय तर्क काढावयाचा ?"

"असेल बुवा तूं म्हणतेस तसंच. पण कौमुदी, एवढ्या बऱ्या राणी-

साहेबांचा तू पोरगी असा उल्लेख करितेस ! हं ग, सालिना पंचवीस लाख उत्पन्न असलेल्या सीतागड संस्थानच्या त्या राणीसाहेब ना ?"

"हं ! —पण बिचारीच्या कपाळीं कसलं तरी सुख आहे काय ? लग्न झाल्यावर अवघ्या दीड वर्षानें तिचे पतिराज वारले. आतां विधवा राणी-साहेब म्हणवून घेण्यांत कसला मोठेपणा ? माझ्यापेक्षां वर्षभरानें लहानच आहे ती. हें तेविसावें वर्ष असणार तिला."

"खरंच ! —किती विचित्र दैवघटना, नाहीं ? —कौमुदी, तिथले राजे-साहेब वारल्याला तीन वर्षं झालीं असतील नाहीं ?"

"हो ! ना. तीन वर्षं होऊन गेलीं. लग्नाच्या वेळीं तिला १८ वें वर्ष नुकतं संपलं होतं. पुढें १९ वें पुरं झालं नि ४।५ महिन्यांनीं राजेसाहेब अपघातानें वारले. बिचारी कमल ! आतां वैधव्यदशेंत तिनें सारं तारुण्य काढावयाचं !"

"कौमुदी, तिला एकादा मुलगा असता तर किती चांगलं झालं असतं नाहीं ?"

"होय तर ! म्हणजे मग राजमाता म्हणून तिचा केवढा बडेजाव झाला असता ! तिची नणंद तिला जी आतां छळीत असते तसं छळण्याची मग काय प्राज्ञा होती ? पण दैवयोगच तसा ना ? —बरं, प्रकाश, जातें मीं आतां. आठाच्या गाडीनें जाणार मीं."

"आणि परत कधीं येशील ?"

"तें आतांच कसं सांगूं ? आठ दिवसांची किरकोळ रजा मीं घेतली आहे तशीच गरज लागली तर पुढें हक्काची रजा घेईन आणखी."

"अरे बापरे ! इतके दिवस ग कशाला ? आपल्याला बुवा इथें अगदीं कंटाळा येईल."

प्रकाश हें अगदीं मनापासून बोलला. पण तें ऐकून कौमुदीच्या मनांत आलें, कीं, त्याला विचारावें, "रश्मि इथें असतांना तुला कंटाळा येईल ?—"

पण प्रकाशनें हे शब्द इतके मनापासून उच्चारले होते कीं त्याची टर उडवावी हें कौमुदीला प्रशस्त वाटलें नाहीं. व मुख्य असें कीं, प्रकाशसारख्या

भावनाप्रवण तरुणाला ती चेष्टा फार बोंचेल हेंहि तिनें ओळखलें व तें अगदीं खरें होतें.

कौमुदीनें जर प्रकाशची आतां अशी अवेळीं चेष्टा केली असती तर त्याला कौमुदीविषयीं वाटणारा आदर व आपुलकी एका क्षणांत मावळली असती ! त्याचा स्वभावच असा विलक्षण भावनाविवश व हळुवार होता !—

आपल्या कांहीं मित्रांची वर्षानुवर्षांची मैत्री एकाद्या उडत्या, खवचट उद्गारापायीं त्यानें अशी तोडून टाकली होती. व आतां कौमुदीची मैत्रीहि त्यानें अशी तोडून टाकली असती.

व मग सुकाणूविना कुठेंतरी भटकणाऱ्या होडक्याप्रमाणें त्याचें जीवन अगदीं अनिश्चित, अनिर्बंध झालें असतें !

पण कौमुदी त्याला पुरा ओळखीत असल्यामुळें तिनें वेळ संभाळून नेली. त्याच्या त्या उद्गारावर तिनें मंदस्मित केलें व टेबलावर ठेविलेली पर्स उचलीत प्रकाशचा पुनः निरोप घेऊन ती निघून गेली.

आणि मग प्रकाशला आठवण झाली कीं, आपल्या मागणीला रश्मीनें बहुतेक होकार दिला आहे; ही बातमी—अं—अं—ही आनंदाची बातमी—कौमुदीला आपण सांगितलीच नाहीं व त्याबद्दल तिचें मत घेतलेंच नाहीं.

पण पुनः त्याच्या मनांत आलें, झालें तें एकपरीनें बरेंच झालें. ह्या आठ दिवसांत रश्मीच्या ह्या होकाराबाबतच्या आपल्या भावनांची नीट पारख होऊं शकेल. हो, तोंवर विवाहाचा वाङ्निश्चयहि होईल नि मगच सारं कौमुदीला कळवितां येईल. बस्स ! प्रकाशनें ठरविलें कीं, कौमुदी सीतागडहून परत आल्यावरच तिला ही आनंदाची बातमी कळवावयाची !

पण ह्या बातमीला ' आनंदा ' ची असें विशेषण मुद्दाम लावूनहि त्या बातमीच्या स्मृतीनें किंवा ती कौमुदीला कळविण्याच्या कल्पनेनें प्रकाशला विशेष आनंद झाला नाहीं.

बरोबरच आहे तें—हृदयाला संपूर्णपणें न आवडलेली व बुद्धीला नीट न पटलेली गोष्ट करणें हें सेकंड हॅन्ड फर्निचर विकत घेण्यासारखें आहे. सेकंड हॅन्ड फर्निचर दुकानांतील विजेच्या झगझगीत दिव्यांच्या प्रकाशांत कसें नवें सुरेख दिसतें. पण घरीं आणल्यावर तें जुनें, डागाळलेलें दिसूं

लागून तें विकत घेतल्याचा आनंद क्षणाक्षणानें ओंसरूं लागतो !

त्याप्रमाणेंच रश्मीशीं विवाह केल्यानें आपण सुखी होऊं कीं न होऊं अशी बुद्धि हृदयामध्यें रस्सीखेंच सुरूं असतांना प्रकाशनें रश्मीला मागणी घातली. व त्या मागणीचा स्वीकार होतांच त्यामधील आनंद व हुरूप लगेच ओंसरूं लागला !

एवढ्याचसाठी ईश्वरानें माणसाला बुद्धि व हृदय ह्या दोन जिवंत चिजा दिल्या आहेत. हृदयाला आवडणारी व बुद्धीला पटणारीं कृत्येंच माणसांनीं करावीं असा ईश्वराचा हेतू असतो ! पण तिथें दुर्लक्ष करून बुद्धिहृदयां-मध्यें लढा लावून माणूस कुठल्यातरी एकाच्याच आहारीं गेला की त्याची स्थिति प्रकाशसारखीच व्हावयाची !

मनुष्यानें फक्त हृदयाचाच आधार घेतला तर बुद्धि त्याला धीर देईनाशी होते व त्यामुळें प्रेमी, कवि किंवा वेडा ह्या समदर्जीय त्रयीमधील प्रेम-वेड्याची मिश्र उपमा त्याला मिळते.

बरं, निव्वळ बुद्धीचीच कांस त्यानें धरली तर हृदयाच्या नांवानें पुरा ठणठणाट झाल्यामुळें तो मुक्त किंवा पशू ठरतो !

आपल्या सुंदर मुखड्यावर भाळलेल्या रश्मीच्या प्रेमाला भुलल्यामुळें प्रकाश सध्यांतरी प्रेमवेडा बनला होता. पण त्यांत मौज अशी होती कीं, तो पुरता प्रेमवेडा बनला नव्हता. तो सर्वस्वी हृदयाच्या आधीन झाला नव्हता. त्याची बुद्धि त्याला मधूनमधून जागा करूं पहात होती. व त्यामुळें पुरा वेडा बनल्यावर प्राप्त होणारा बेजबाबदार आनंदहि त्याला प्राप्त होऊं शकत नव्हता ! तो अर्धवट वेडा बनला होता. व त्याचें हें वेड उतरविणारा मांत्रिक जर त्याला भेटला व आपल्या बुद्धिहृदयांमध्यें होणारी रस्सीखेंच ह्या मांत्रिकाच्या मदतीनें थांबवून त्याऐवजीं जर सुंदर समेट त्यानें घडवून आणला तर ह्या पृथ्वीवरच त्याला स्वर्गप्राप्ति होऊं शकली असती !

पण सध्यां तो मांत्रिक सीतागडला गेला होता. पण खरें म्हणजे प्रकाशसारख्या भावनाप्रवण, उतावीळ तरूणांना आधीं नरकयातनांची चुणूक मिळाल्याखेरीज पृथ्वीवरील स्वर्गाची किंमत वाटत नसते !—आणि प्रका-शच्या बाबतीत ह्या नरकयातनांना आतां कुठें सुरूवात होत होती !

## ५ राणीचें " सुखैश्वर्य "

योग्यवेळीं कौमुदी सीतागडला पोहोंचली. स्टेशनवर राणीसाहेबांचे खाजगी कारभारी मोटर घेऊन आले होते. कौमुदी थेट राणीसाहेबांच्य खाजगी वाड्यांत गेली. कारभाऱ्यांकडे राणीसाहेबांच्या प्रकृतीविषयीं तिनें विशेष चौकशी केली नाही. व तें ठीकच झालें. कारण तिची अटकळ बरोबर होती.

राणीसाहेब आजारी नव्हत्या. म्हणजे त्यांना कोणतीहि शारीरिक व्यथा झालेली नव्हती. पण त्यांची चर्या बरीक अतिशय मलूल दिसत होती.

कौमुदीला पहातांच त्यांच्या मुद्रेवर क्षणमात्र हास्य प्रकटलें. त्यांनीं मोठ्या प्रेमानें कौमुदीच्या खांद्यावर डोकें टेंकीत स्नेहभरानें म्हटलें, " माझी खात्रीच होती तूं ताबडतोब माझ्याकडे धांवून येशील अशी. "

कौमुदीनें हळूंच आजूबाजूला पाहिलें. ह्या दोघींखेरीज त्या महालांत कुणींच नव्हतें व महालाचीं दारेंहि बंद होतीं.

राणीसाहेबांच्या अधिकच जवळ बसत कौमुदी मृदु स्वरांत म्हणाली, " कमल, कमल, काय झालंय् ग ! तुझ्या हृदयाला कसली व्यथा होत आहे ! "

कौमुदीचे हे शब्द ऐकतांच राणीसाहेब—कमला केवळ्यांदा तरी दचकली.

आपल्या हृदयाची धडधड बाहेर कुणाला ऐकूं जाईल असें वाटून की काय तिनें आपले दोन्ही हात हृदयावर गच्च दाबले.

तिचा डावा हात आपल्या हातांत घेत कौमुदी म्हणाली, "कमल, तुझा हात पूर्वी किती गोंडस होता नि तुझे गाल तरी कसे छान फुगीर होते. आतां इतके कसे चपटे झाले? — नि तुझे डोळेसुद्धां किती खोल गेले हे! — कमल, काय झालं? तुझी ती विधवा नणंद नि ती चुलत सासू तुला छळते काय?"

कमला राणीनें एक खोल निःश्वास सोडला.

कौमुदीनें म्हटल्याप्रमाणें ती बारीक व निःस्तेज दिसत होती खरीच. पण तरीहि तिचें सौंदर्य खुलून दिसत होतें.

आपल्या सोळाहि कलांनीं संपूर्ण असणारा पौर्णिमेचा चंद्र सुंदर दिसतोच. परंतु त्याच्या मानानें लहान, बारीक असणारी अष्टमीची चंद्रकोरहि सुंदरच नाहीं कां दिसत?—

तशीच सध्यांची ही कृशता सुद्धां कमलेला शोभूनच दिसत होती. ती कशी नाजूक नि खरीखुरी अबला वाटत होती.

कौमुदीची व तिची आज ८।१० वर्षें दृढ मैत्री होती. वयाच्या अठराव्या वर्षी इंग्रजी सहावीच्या वर्गात नुक्ती गेली नाहीं तोंच, कमला सीतागडच्या संस्थानाधिपतींची पत्नी झाली. परंतु राणीपदाच्या ह्या ऐश्वर्या-मुळें तिला जराहि गर्व चढला नाहीं. तिचा विवाह झाल्यानंतर प्रारंभीं कौमुदीनें तिच्या वैभवाला साजणारा अहो, जाहोचा औपचारिकपणा सुरूं केला. परंतु कमलेला त्यामुळें फार खेद वाटतो हें पहातांच कौमुदी तिच्याशीं पूर्ववत् वागूं लागली.

विवाहाच्या वेळीं कमलेचे पतिराज बेचाळीस वर्षांचे होते. त्यांची प्रथम पत्नी अपत्य न होतां वारल्यामुळें राज्याला वारस हवा म्हणून राजेसाहेबांनीं कुलशीलवान् परंतु गरीब घराण्यांतील सुंदर कमलेला पसंत केली. कमलेची संमति अर्थात्च कुणीं विचारली नाहीं.

जेमतेम दीड वर्ष कमलेला सौभाग्य लाभलें. व त्या अवधींत कमलेचें आपल्या पतिराजावर मुळींच प्रेम जडलें नाहीं. —जडूं शकलें नाहीं! त्या

उभयतांच्या वयांत व वयानुसार मनोरचनेंत पराकाष्ठेची विषमता होती, व ती दूर करण्याचा कमलेच्या पतिराजांनीं कधीं प्रयत्नच केला नाहीं; फार काय, तसा प्रयत्न आपण केला पाहिजे ही कल्पनाहि त्यांच्या मनांत आली नसेल कधीं.

त्यांच्या प्रथम पत्नीची त्यांच्यावर दृढभक्ति होती. पति म्हणजे देव असेंच ती मानीत होती. तेव्हां अर्थात्‌च कमलाहि तसेंच मानणार असें राजेसाहेबांनीं गृहीतच धरलें होतें.

आजकालच्या पद्धतीप्रमाणें लग्न होई तोंवर एखाद्या आनंदी फुल-पांखरासारखी इथें तिथें नाचणारी, समवयस्क मैत्रिणींबरोबर हंसत खेळत शाळेला व फिरावयाला जाणारी आनंदी कमल—तिच्या मनोवृत्ति अगदीं जुन्या जमान्यांत वाढलेल्या आपल्या समवयस्क प्रथम पत्नीच्या कोत्या अल्प संतुष्ट मनोवृत्तीपेक्षां भिन्न असतील ही कल्पनाहि राजेसाहेबांच्या मनाला कधीं शिवली नाहीं. बाकी तशी कल्पना डोक्यांत आली असती तरी त्यांनीं कांहींच पर्वा बाळगली नसतील म्हणा! त्यांच्यासारख्या सालिना पंचवीस लाख उत्पन्न असलेल्या संस्थानाधिपतीनें आपल्या पत्नीची एवढी पर्वा बाळगावयाची?—पत्नी म्हणजे कांहीं व्हॉइसरॉय् किंवा पोलिटिकल् एजंट नव्हे!—

पण त्यांच्या ह्या सहानुभूतिशून्य, रुक्ष वर्तनाचा परिणाम असा झाला कीं, त्यांच्या मृत्यूनें कमलेला कांहीं जिव्हाळ्याचें दुःख झालें नाहीं!—

जनरीतिप्रमाणें पहिलें वर्षभर जरी ती अर्धशः बंदिवासांत राहिली तरी तिच्या उमलत्या तारुण्यावर त्याचा कांहींच विपरीत परिणाम झाला नाहीं. तिनें त्या वर्षे, दोन वर्षांतच तारुण्यांत पदार्पण केलें असल्यामुळें लग्नाच्या वेळीं व नंतरहि सुमारें वर्षभर बारिक, सडसडित दिसणारी तिची तनुलतिका आतां बांधेसूद, गोंडस दिसूं लागली. तिच्या अंग प्रत्यंगांतून तारुण्याची साक्ष प्रकट होऊं लागली. तिचा मूळचा गौरवर्ण आतां आणखीच उज्वल दिसूं लागला.

गेल्या वर्षीं उन्हाळ्याच्या सुटींत कौमुदी तिला भेटावयास आल्यावेळीं तिचें हें रसरसणारें तारुण्य, उमलणारें सौंदर्य व ह्याच्याशीं अगदींच विसंगत

असणारें तिचें अकाल वैधव्य पाहून कौमुदीला भारी दुःख वाटलें आणि तितकेंच भयहि वाटलें !—

कमलेला ईश्वरानें दिलेल्या ह्या सौंदर्य रत्नाला ती काळजीपूर्वक जपेल ना ?—आपल्या तारुण्य पुष्पाचा सुवास ती जागच्याजागींच कोंडून ठेऊं शकेल कां ?—अशी कौमुदीला धास्ती वाटली ?

जेमतेम इंग्रजी पांचवीपर्यंत, म्हणजे अपुरेंच शिक्षण झालेल्या कमलेला इथें कुणाची चांगली संगत सोबत नाहीं, तिची ती दुष्ट नणंद तिला कधीं माहेरीं जाऊं देत नसल्यामुळें तिकडूनहि उपदेशाचे चार शब्द मिळण्याची सोय नाहीं—

रहातां राहिली कौमुदी !—पण आपली मुंबईतील नोकरी संभाळून ती तरी कमलेकडे कितीशी येऊं शकणार ?—कमलेवरील आत्यंतिक प्रेमामुळें त्यावेळीं कौमुदीच्या मनांत असाहि विचार आला होता कीं, मुंबईतील नोकरी सोडून इथेंच कमलेची कंपॅनियन म्हणून नोकरी धरावी, व अशा रीतीनें तिला सतत आपल्या सहवासांत, आपल्या मायेच्या पंखाखालीं ठेवावी, म्हणजे सध्यां तारुण्याच्या घसरणीवरून जातेवेळीं सुसंस्काराच्या व मायेच्या माणसांच्या अभावीं तिच्या हांतून भलताच प्रमाद तरी घडणार नाहीं !

पण आपल्या ह्या विचाराचा कौमुदीनें एकदोनदां उच्चार केला तरी कमलेकडून त्याला कांहींच प्रोत्साहन मिळालें नाहीं. त्यामुळें कौमुदी त्या भानगडींत मग पडलीच नाहीं.

—शिवाय तिला असेंहि वाटलें कीं, संस्थानांतील नोकरी म्हणजे आळवावरील पाणी—कमलेनें स्वतः जरी आपल्याला नोकरीवरून दूर केलें नाहीं तरी तिची ती आकस्ताळ नणंद आहे ना ? तिनें जर एकाएकी आपल्याला नोकरीवरून काढून टाकलें तर आपल्या व आपल्या वृद्ध वडिलांच्या निर्वाहाची काय वाट ? —व म्हणून सेव्यसेवकाचें नातें आलें कीं मैत्री साहजिकच मंदावणार हें ठाऊक असतांहि केवळ कमलेच्या हितासाठीं तिच्याकडे नोकरी पत्करावी हा उदात्त विचार कौमुदीला रद्द करावा लागला होता.

व मग त्यानंतर २।३ महिन्यांनीं आलेल्या कमलेच्या पत्रांत, आपण हल्लीं इंग्लिश व संस्कृत शिकत आहे अशा मजकूर वाचून कौमुदीला जरी थोडें वैषम्य वाटलें तरी कमलेच्या तरूण मनाला तो बरा व्यवसाय मिळाला असें वाटून तिनें समाधान मानून घेतलें.

पण तिला बिचारीला काय माहिती कीं, मनाला गुंतविण्यासाठीं म्हणून योजलेला हा व्यवसाय कमलेच्या हृदयाला गुंतविणार म्हणून !

ह्या उभ्या वर्षांत कौमुदीला कमलेकडे जावयास फावलें नाहीं व कौमुदीनें येऊन भेटावेंच अशी कमलेनेंहि पत्रद्वारें केव्हांहि उत्सुकता प्रकट केली नाहीं ! त्यामुळें पुन्हा एक वर्षानंतर कौमुदी आज प्रत्यक्ष तिला पहात होती. तिच्यामध्यें झालेला हा फरक पाहून कौमुदीला त्याचमुळें इतकें आश्चर्य वाटलें.

तिनें कमलेला म्हटलें, "कमल, तूं आजारी होतीस काय ग ?"

"उंहुं". कमला उत्तरली.

"मग ? काय होतं आहे ? मला नाहीं तूं सांगणार ?"

"हं ! कौमुदी, त्याचसाठीं तर तुला मीं बोलावून घेतलं ग. हे बघ. कौमुदीताई—पण, तुझं जेवणखाण आटोपूं दे. मग तुला सारं सांगतें"

कमलेचें तें म्लान मुखकमल पाहताक्षणींच कौमुदीची तहानभूक मोडली होती. पण तसें सांगणें बरें नव्हे. कमला मग सर्व सांगणारच आहे आपण विशेष उत्कण्ठा आतांच कशाला दाखवा ! कदाचित् त्यामुळें ती बिथरून जावयाची. जात्या मनमोकळ्या वृत्तीची ती नाहींच. नि आतां आपण फार उत्सुकता दर्शविली तर तिची मूळवृत्ति वर डोकं काढावयाची कदाचित् —असा विचार मनांत येऊन कौमुदी मुकाट्यानें कमलेबरोबर जेवणगृहांत गेली.

# ६ मृगजल कीं मधुरजल ?

जेवणें आटोपलीं. दासीनें पुढें केलेल्या पानदानामधून कौमुदीनें एक लवंग तोंडांत टाकली व कमलेच्या मागून ती महालांत आली.

दासी महालाबाहेर जातांच कमलेनें दाराला कडी लाविली व अस्वस्थ मनानें ती तिथेंच येरझाऱ्या घालूं लागली.

क्षणांत ती खिडकीकडे जाई, तर क्षणांत कोंचाकडे वळे. कोंचावर टेकल्यासारखें करी नि फिरून खिडकीकडे जाई.

कौमुदी स्तब्ध राहून तिचा हा चाळा पहात होती. ५।१० मिनिटें अशा अस्वस्थतेंत घालविल्यावर कमल हळूहळू कौमुदीच्या जवळ येऊन बसली.

व कांहींहि प्रस्तावना न करितां ती म्हणाली, "ताई, कौमुदीताई, माझं–माझं प्रेम जडलंय्—"

कमलेचे हे शब्द ऐकतांच कौमुदी स्तंभित झाली.

उमलत्या गुलाबकलिकेचा सुगंध आसमंतात पसरणें किंवा वर्षाऋतूंत पाऊस पडणें ह्या नैसर्गिक घटनाप्रमाणेंच तारुण्यांत प्रेमोद्भव होणें हीहि नैसर्गिक घटनाच आहे हें कौमुदीला ठाऊक होतें !

—परंतु–परंतु कमला विधवा होती ना ?—तिच्या जीवनाचें आतां रुक्ष वाळवंट बनलें होतें ना !— मग त्यामध्यें प्रीतीचें मधुर जल कसें संभवणार ? —मग काय हें मृगजळच असलें पाहिजे तर !—

कमल—विधवा कमल—नि त्यांतून राणी !—' ज्याचें अंगीं मोठेपण तया यातना कठिण ' ह्या तुकारामाच्या अभंगोक्तीनुसार राज्ञीपदाच्या मोठेपणाबरोबर आपला सामाजिक थोर दर्जा यथायोग्य पाळण्याच्या कठिण जबाबदारीच्या यातनाहि कमलला भोगाव्या लागणार !

कमल एकादी सर्वसाधारण तरूणी असती तर ती पुनर्विवाह करूं शकली असती ! वैधव्याच्या वाळवंटांत तिला प्रीतीचें मधुर जल मिळूं शकलें असतें ! पण—पण—राणीचा पुनर्विवाह—

छे: !—दैवानें ज्यावेळीं कमलेच्या मस्तकावर राज्ञीपदाचा अभिषेक केला त्याच वेळीं निसर्गनियमानुसार आयुष्य कंठण्याचा मार्ग तिला बंद झाला !

कमल सुंदर होती, तरूण होती. पण ती विधवा, नि त्यांतूनहि विधवा राणी असल्यामुळें तिनें आपलें सौंदर्यरत्न कुणाच्या नजरेलाहि पडूं देतां नये होतं—आपलें तारुण्यपुष्प तिनें विकासूं देतां नये होतं !—पण असं कसं होणार ?—

निसर्गनियमान्वयें कमलेचें तारुण्यपुष्प विकसित झालें—व त्याबरोबरच तिच्या हृदयांत तारुण्यसुलभ प्रणयवसंत बहरला—पण—पुढें काय ?—

कमलेनें अगदीं निर्व्याज सरलतेनें सांगितलेली ती बातमी ऐकून कौमुदी हतबुद्ध झाली. कमलेला अधिक खुलासा विचारण्याऐवजीं कमला प्रेम-पाशांत अडकली ह्या घटनेभोंवतींच तिचें विचारचक्र फिरूं लागलें !—कमलला प्रीतीच्या मधुर जलाची तहान लागली आहे व तें मधुर जल आपल्याला मिळालें मिळणार, अशा आशेंत ती आहे. पण तें कसें शक्य होईल ? प्रीतीचें मधुर जल तिच्या बाबतींत मृगजलच ठरलें पाहिजे ना ?—नि तें तसें ठरलें तर कमल काय करील ?—तृषेची तीव्रता सहन न होऊन ती ' पाणी पाणी ' करून प्राण सोडील काय ? —

कौमुदीला कांहीं सुचेना, कांहीं कळेना. शेवटीं थोड्या वेळानें भानावर येत तिनें म्हटलें, " कमले. तुझं कुणावर प्रेम जडलंय ? "

लज्जामृदु स्वरांत कमल उत्तरली, " कौमुदीताई, मी इंग्लीश व संस्कृत शिकत आहे असं मी लिहिलं होतं ना तुला एकदां ? "

" होय, मग ? " अधीरपणें कौमुदीनें प्रश्न केला.

" त्या—त्या मास्तरांवर माझं प्रेम जडलंय्—"

" काय ? मास्तरावर ? एका भिकारड्या मास्तरावर तुझ्यासारख्या वैभवशाली तरूणीचं प्रेम जडावं ? "

कौमुदीनें केलेली ही निर्भर्त्सना निश्चल मनानें ऐकून घेऊन कमला उत्तरली, " ताई, मी वैभवशाली तरूणी आहे खरी. पण तुझ्या मतें भिकारी असणाऱ्या मास्तरसाहेबांनीं मला प्रेमाची भिक्षा घातली आहे. मग तरीहि तूं त्यांना भिकारी म्हणशील ? कौमुदीताई, एका ऐश्वर्यसंपन्न राणीला प्रेमाची भिक्षा घालणारा तरूण वस्तुतः तिच्यापेक्षांहि ऐश्वर्यसंपन्नच नाहीं कां ? "

कमलेचे हे अंतःकरणापासून निघालेले बोल ऐकून कौमुदी थक्क झाली.

तिच्या मनांत आलें, अपुरें शिक्षण घेतलेली, साधीभोळी कमल इतकें मार्मिक, इतकें बिनतोड बोलू शकते हा कशाचा प्रभाव ? त्या मास्तरांच्या शिकवणीचा कीं प्रीतीच्या जादुगिरीचा ?—खात्रीनें हा प्रीतीचा प्रभाव !—मग एवढी ही प्रभावशाली प्रीति मृगजलवत् ठरेल ?—छेः हें प्रीतीचें खरें मधुर जलच आहे ! कमलेला त्या तरूणाबद्दल विकारयुक्त प्रणयाकर्षण वाटत नसून शुद्ध, सात्त्विक प्रीतिच वाटत असणार !—

व हा विचार मनांत येतांच कौमुदीला दुःखांत किंचित् सुख वाटलें. इतक्या विशुद्ध प्रीतीची ओळख पटल्यावर कमलेच्या व तिला प्रीतीची अशी ओळख पटविणाऱ्या त्या मास्तरांच्या हातून सहसा अविचार घडणार नाहीं अशी तिची खात्री झाली व त्यामुळें कांहींशा शांत मनानें तिनें म्हटलें, " कमल, त्या मास्तरांचें नांव काय ? जातीनें कोण आहेत ते ? "

" जातीनें आपल्यांतीलच आहेत. चार वर्षांपूर्वी एम्. ए. झाले. त्यांचें नांव माधवराव देशमुख—ताई, तुझ्या प्रकाशचे ते सख्खे मावसभाऊ लागतात नि त्या दोघांची मैत्रीहि खूप आहे. "

कमलेनें चांगलाच गनिमी कावा लढविला. कौमुदीवर कुठल्या बाजूनें हल्ला चढविला असतां आपण तिला जिंकूं शकूं हें कमलेनें बरोबर ओळखलें होतें. माधवराव देशमुख प्रकाशचा मावसभाऊ व प्रिय मित्र असल्याचें

आतां कळतांच त्यांना प्रत्यक्ष न पहातांहि कौमुदीचें त्यांच्याविषयीं फ चांगलें मत बनलें.

पण कमलेनें ' कौमुदीचा प्रकाश ' असा उल्लेख केल्यामुळें तिचें हृदय व्यथित झालें.

प्रकाश कौमुदीचा—आपला—नि मग रश्मी !—प्रकाशचें प्रेम रश्मीवर आहे ना ? निदान त्याला तसें वाटत तर आहे ना ?—

प्रेम आंधळें असतें म्हणतात ! नि ह्या आंधळ्या प्रेमामुळें प्रकाशहि आंधळाच बनला आहे. त्याचे डोळे कधीं उघडतील काय ? नि मग त्याच्यावरील आपलें प्रेम त्याला दिसून येईल ?—मग तसं झालं म्हणजे प्रकाश आपला होईल. होय—होय—आपला—कौमुदीचा प्रकाश ! नि—नि—प्रकाशची कौमुदी !—

खरंच, प्रणयीजनांचें मन कागदाच्या बारीक कपट्यासारखें असतें. वाऱ्याच्या झुळकीबरोबर कागदाचा कपटा जसा इतस्तत: धावतो तसें प्रणयीजनांचें मन आपल्या प्रियव्यक्तीच्या नुसत्या नामोल्लेखासरशीं कुठें-तरी भरकटत जातें ! आतांपर्यंत कमलेच्या प्रेमकहाणींत गुंतलेलें कौमुदीचें मन प्रकाशच्या नांवाच्या ओझरत्या उल्लेखासरशीं स्वतःच्या प्रेमकहाणींत रंगलें, व तसेंच आणखीहि खूप वेळ तें रंगून राहिलें असतें ! पण आपल्या प्रेमकहाणींत तशाच गुंगलेल्या कमलेला कौमुदीची ही अवस्था व तज्जन्य स्तब्धता पसंत न पडून तिचा खांदा धरून हालवीत ती म्हणाली " हें ग काय, कौमुदीताई ? बोल ना कांहीं तरी. बघ, तूं मला रागावलीस तरी पत्करेल पण तुझं हें मौन मला नाहीं सहन होत. बोल ना ग. "

व कौमुदीला बोलण्याचा असा आग्रह करितां करितांच कमलचे सुंदर नेत्र पाण्यानें भरून आले.

व हा चमत्कार पाहून कौमुदीला फारच आश्चर्य वाटलें. कारण कमला अल्पवयी असली तरी अतिशय समंजस आहे, फार धीराची आहे हें कौमुदीला ठाऊक होतें.

गेलीं २।३ वर्षें तिची नणंद तिला नानारीतीनें जाचीत असतांहि कमलेनें एक दिवससुद्धां डोळ्यांतून पाणी काढलें नाहीं हें कौमुदीला

माहीत होतें. एवढंच नव्हे तर लग्नानंतर माहेरच्या मायेच्या माणसांशीं ताटा-तूट झाल्यावेळीं, फार काय, पतिनिधनाच्या प्रसंगींसुद्धां कमला जरा देखील रडली नाहीं हें कौमुदीनें स्वतः पाहिलें होतें. येतां जातां, अकारण सकारण रडणाऱ्या बायकांपैकीं तर कमला नव्हतीच पण कठिण प्रसंगींसुद्धां तिला रडूं येत नाहीं. तिचें मन जात्या जरा घट्टच आहे हें कौमुदीला स्वानुभवानें ठाऊक असल्यामुळें आतां आपण तिच्यावर रागावलों अहों अशी आपल्या मौनामुळें नुसती शंका येतांच तिचे डोळे पाण्यानें भरावे हें कौमुदीला अजब वाटलें.

तिनें अर्थात्च ओळखलें कीं हा फरक, हा चमत्कार प्रीतीनें घडवून आणला आहे! प्रीतीची—खऱ्या विशुद्ध, विमल प्रीतीची ओळख पटली कीं स्त्रीहृदय असं हळुवार बनतं! तें कारणावांचून हंसतं, कारणावांचून रडतं!

आणि आपल्या प्रीतीचें साफल्य होईल कीं नाहीं, वैधव्याच्या वाळ-वंटात लाभलेलें हें प्रीतीचें मधुर जल आपल्याला प्राशन करितां येईल कीं तें मृगजल ठरेल अशी विवंचना कमलेला अहोरात्र सतावीत असल्यामुळें तर तिचें हृदय हल्लीं अतिशयच हळवें बनलें आहे. व तिचा सारा भरिभार, सारा विश्वास आतां आपल्यावरच असल्याकारणानें आपण तिच्यावर रागावून गप्प बसल्याची शंकाहि तिला सहन झाली नाहीं.

क्षण, दोन क्षणांतच कौमुदीनें स्वतःशीं ही मीमांसा केली व तिची तिलाच ती पुरी पटल्यामुळें कमलविषयीं तिला भारी सहानुभूति वाटली. कमलेला प्रेमानें जवळ ओढीत ती म्हणाली, "चल, वेडा कुठली माझ्या लाडक्या कमलवर मीं रागावेन? नाहीं बरं कमल, मीं रागावलें नाहीं हं. पण बघ, मला भारी काळजी वाटते. कमल, तुला पुनर्विवाह कसा बरं करतां येईल?"

'कां येऊं नये? मी काय माणूस नाहीं? कौमुदीताई, मी राणी असलें म्हणून काय मला हृदय असतां नये? भावना असूंच नयेत? ताई, एक वेळ शरीराला कोंडून ठेवतां येईल पण हृदयाला कसं ग कोंडून ठेवणार? ताई, शरीराला विधवेचा वेष दिला, पोक्त, वयस्क, स्त्रीला शोभेसा

वैराग्याचा आचार तरुण विधवेला जबरदस्तीनें करावयास लाविला म्हणजे तिचें तरुण हृदय आपोआप विरक्त बनेल होय ? ताई, माझं हृदय तरुण आहे, प्रेमाला भुकेलेलं आहे; त्यांत तारुण्यसुलभ भावना स्फुरत आहेत त्या मी कशा उपटून काढूं ? सांग श्रीमंतांना व गरिबाना सारखीच लाभणारी ही तारुण्याची, प्रीतीची नैसर्गिक देणगी मी कशी दूर सारूं ? कौमुदीताई, एकाद्या गरीब तरुणीला, अगदीं भिकारणीलासुद्धां प्रेम करण्याची मुभा असते. मग मलाच ती कां नसावी ? "

हाय !— कमलेच्या ह्या सरळ, सत्य सवालांना प्रेमळ कौमुदी काय उत्तर देणार ! पण कांहीं तरी बोलावयाचें म्हणून ती म्हणाली, " परंतु कमल, तूं सर्वसाधारण स्त्री नाहींस. तूं राणी आहेस. "

" पण हाडामांसाची राणी आहे ना ? एकादी लांकडी बाहुली नाहीं ना ? " कमल आवेगभरानें उद्गारली.

" पण कमल, ह्या संस्थानाचा राज्यशकट सुरळीत चालवण्याची जबाबदारी तुझ्यावर आहे. एक आदर्श स्त्री म्हणून तुझे प्रजाजन तुझ्याकडे पहात आहेत. साऱ्या प्रजेच्या आदराचें भक्तीचें एकमेव स्थान तूं आहेस. त्यांचीं मनें त्यांच्या भावना तूं दुखविणार ?

" आणि माझ्या मनाची, माझ्या भावनांची काय वाट ? परक्या प्रजाजनांच्या भावनांकडे मीं अधिक लक्ष पुरवूं कीं स्वतःच्या भावनांकडे ? कौमुदीताई, परदुःख शीतल असतं बरं ! बघ, स्वतः उपाशी राहून कुणी अन्नदान करीत नाहीं ! शिवाय, ताई, माधवरावांच्या प्रीतीची आस लागलेल्या माझ्या हृदयाचें प्रजेच्या आदरानें नि भक्तीनें काय समाधान होणार ? बरं, माझ्या हातीं खरोखरी कांहीं सत्ता असती तर गोष्ट वेगळी ! सारी सत्ता ताईमहाराजांच्या नि दिवाणसाहेबांच्या हातांत ! माझ्या राणीपणाला विचारतंय कोण ? नि अशी स्थिति असून सुद्धां प्रजेसाठीं म्हणून मी एवढा मोठा त्याग करावा म्हणशील तूं ! हो, बाकी, सारेच उपाय हरले तर प्रजेसाठीं, माझा थोर सामाजिक दर्जा कायम राखण्यासाठीं ह्याहूनहि मोठा त्याग—देहत्याग करीन मीं. सीतागड संस्थानाचा दुर्लौकिक होऊं नये म्हणून हळूहळू मारून टाकणारं एकादं विष पिईन मीं. काय, ताई,

म्हणजे तरी माझ्या राशीपदाचं सार्थक होईल ना!" अगदीं विकृत स्वरांत कमला बोलत होती नि तिचा एकेक शब्द ऐकून कौमुदी थक्क होत होती.

प्रीतीची ओळख पटतांच अबोल, अश कमला एवढी बोलकी, एवढी सुश बनली अं!—

कमलेच्या ह्या प्रश्नोद्गारांना काय उत्तर द्यावें तेंच कौमुदीला कळेना. ह्या बाबतींत थोडा एकांतांत विचार करण्याच्या हेतूनें ती एकटीच उठून बाजूच्या सज्जांत गेली. तिनें तसें उघड सांगितलें नाहीं तरी तिला एकटीला ह्याबद्दल विचार करावयाचा असणार हें कमलेनें बरोबर ओळखलें व ती आंतच बसून राहिली.

## ७ 'गृहिणी....प्रिय शिष्या....'

आतां कमलेची हकीकत ऐकून त्यावर उपाय ठरविण्याच्या हेतूनें कौमुदी बाहेर सज्जांत येऊन उभी राहिली खरी, पण तिला उपाय कांहीं सुचेना.

असल्या बिकट कोड्याचा निकाल कुठें क्षणभरांत का लागतो ? नुसत्या बुद्धीच्या मदतीनें हा निकाल लावावयाचा असता तर गोष्ट वेगळी. पण असल्या—हृदयाला भिडणाऱ्या घटनेचा निकाल लावावयाला हृदयाचीहि मदत घ्यावी लागते—आणि बुद्धि व हृदय ह्याचें मतैक्य घडवून आणावयाचें म्हणजे चांगलाच वेळ लागणार कीं त्याला.

कमला प्रेमपाशांत अडकली हें तिच्या परिस्थितीच्या दृष्टीनें गर्ह्य आहे असें कौमुदीची बुद्धि तिला सुचवी. पण आजवर प्रीतिविना उपासमार झालेल्या कमलेला तें चिरवांछित प्रेम आतां लाभलें आहे ही आठवण आली कीं, कौमुदीच्या हृदयाला कमलेविषयीं सहानुभूति वाटे.

आपला थोर, सामाजिक दर्जा संभाळण्यासाठीं कमलेनें आजन्म वैधव्य-व्रत कसोशीनें पाळलें पाहिजे असें कौमुदीची बुद्धि तिला बजावीत होती. पण पक्व फळांनीं डंवरलेल्या वृक्षाप्रमाणें तारुण्यसुलभ भावनांनीं रसरसलेल्या कमलेच्या हृदयानें आजन्म कुचंबत रहावें ही कल्पना कौमुदीच्या हृदयाला असह्य होत होती !

मिळून, खालीं पडलेल्या पाऱ्याच्या गोळ्या वेंचण्यासाठीं हातांतील पाऱ्याची गोळी त्यांत मिसळून त्या उचलण्याचा प्रयत्न करावयाला जावें तर

खालच्या गोळ्या हातीं येणें दूरच राहून हातांतील गोळीहि दूरदूर पळते तशी स्थिति कौमुदीची झाली.

कमलेच्या बाबतींत अमुक एक विचार नक्की करून तिनें त्या अनुरोधानें पुढें विचार करूं पहावें तर पहिला विचारहि पटेनासा होऊन दूर सारणें भाग पडे.

अशा स्थितींत सुमारें अर्धा तास कौमुदी त्या प्रशस्त सज्जांत फेऱ्या घालीत विचार करीत होती. पण तिला अद्यापि कांहींच नक्की ठरवितां आलें नव्हतें.

इतक्यांत कमला घाईघाईनें तिथें आली. तिची चर्या आतां एवढी उत्सुक, हंसरी, आनंदी दिसत होती कीं, मघां तिच्या मलूल चर्येकडे कौमुदी जशी आश्चर्यानें पहात राहिली तशीच आतांच्या तिच्या चर्येकडेहि पहात राहिली.

पूर्वीं शाळेंत असतांना कमला अशी हंसरी, अशी आनंदी होती. तिची वृत्ति अशीच एकाद्या फुलपांखरासारखी स्वच्छंदी, चंचल असे. पण लग्न झाल्यापासून तिचा हा मुद्राविर्भाव पार मावळला होता. म्हणजे नंतर ती दुःखीकष्टी दिसे असें नव्हे. परंतु पूर्वींचा तो मोकळेपणा, तें अनिर्बंध हास्य लोपलें—नि मघां तर तिची चर्या भारीच म्लान दिसली.

त्यामुळें त्या मुखाविर्भावाशीं संपूर्ण विसंगत असा हंसरा, लाजरा, अधिरा आविर्भाव आतां कमलेच्या मुखावर दिसतांच कौमुदी चकित झाली. त्याच-प्रमाणें मघां तिला कमला कशी फिकुटल्यासारखी व रोडहि भासली. नि आतां तिची तनुलतिका जरी पूर्वींसारखी गोंडस, रसरशीत दिसली नाहीं तरी मघांपेक्षां खूपच सतेज दिसली.

मग काय ? मनाची छाया देहावर इतकी पडते तर ? मन प्रसन्न असलें म्हणजे देह प्रसन्न दिसतो नि मन विषण्ण झाल्यावेळीं देहहि विषण्ण दिसतो एकूण ?—आतां अनुभवानेंच पटलेल्या ह्या घटनेची कौमुदीला मोठी मौज वाटली.

पण लगेच तिच्या मनांत आलें, कमलेची मुखचर्या आतां इतकी प्रसन्न होण्याचें कारण काय ?

आणि ह्या प्रश्न मनांत येतांच कौमुदीला त्याचें उत्तरहि सांपडलें—कमलेला प्रीतीची दीक्षा देणारे गुरुमहाराज—माधवराव—आले असणार !

होय, कौमुदीचा हा तर्क अगदीं खरा होता.

लाजऱ्या, हंसऱ्या स्वरांत कमल म्हणाली, " कौमुदी, कौमुदीताई, आंत ये ग. माधवराव आले आहेत तुला भेटावयाला. चल, चल ना आंत. "

किती घाई झाली होती कमलला. आपल्या प्रिय मैत्रिणीची आपल्या प्रियकराशीं ओळख करून द्यावयाला किती उत्सुक झाली होती ती—तिच्या ह्या उत्सुकतेचा विरस करणें कौमुदीला बरें वाटलें नाहीं. अधिकउणें न बोलतां ती कमलेच्या मागून आंतील दालनांत गेली.

तिथें टेबलाच्या बाजूला प्रकाशच्या वयाचा एक तरुण खालीं मान घालून उभा होता.

ह्या दोघी मैत्रिणींच्या पायाची चाहूल लागतांच त्या तरुणानें — माधवरावानें — मान वर केली —

क्षण, अर्धा क्षण त्याची व कमलेची दृष्टादृष्ट झाली. आणि त्या दोघांच्या मुद्रेवर गाढ परंतु अधिऱ्या प्रीतीची जी एक मधुर छटा सरकन् झळकून गेली ती पहाण्यांत कौमुदीचें अंतःकरण तल्लीन झालें.

सहृदय माणसें इतरांच्या दुःखानें दुःखित होतात त्याप्रमाणें इतरांच्या आनंदानेंहि आनंदित होतात ! — परस्परदर्शनानें माधवराव व कमला ह्यांचे चेहरे फुललेले पाहून कौमुदीचें हृदयहि प्रफुल्लित झालें. पण लगेच सद्यःस्थितीच्या जाणीवेनें ती भयभीत झाली. तिनें एक सुस्कारा सोडला.

प्रीतीच्या कठोर दिव्यांतून जाणाऱ्या प्रेमीजनांचीं अंतःकरणें व ज्ञानेंद्रियें फारच हळुवार व तीव्र होत असणार. कारण आतां कौमुदीनें अगदीं हळु सोडलेला सुस्कारा कमलेनेंहि ऐकला व माधवरावानेंहि ऐकला.

कमलेनें भयत्रस्त होऊन आपल्या हृदयावर दोन्ही हात दाबले. माधवरावाची चर्याहि अशीच भयभीत व व्यथित बनली. व मग " ही कौमुदी हं " अशा कांहींशा शब्दांनीं कमल कौमुदीशीं त्याची ओळख करून देत असतांच जरा पुढें होत आवेगभरानें तो कौमुदीला म्हणाला, " कौमुदीबाई, तुम्ही रागावलांत आमच्यावर ?"

ह्या एकाच, साध्या सरळ वाक्यानें माधवरावानें कौमुदीच्या बुद्धिहृदया मध्यें त्यांच्या प्रेमगुपिताबाबत चाललेली रस्सीखेंच हृदयाच्या बतीनें जिंकविली ! माधवरावाचें कमलेवर किती दृढ प्रेम आहे ह्याची ह्या एका वाक्यानेंच कौमुदीला खात्री पटली.

"तुम्ही रागावलांत आमच्यावर ?"– असा नम्र सवाल त्यानें केला. कौमुदी कमलेवर रागावली आहे काय म्हणून नाहीं त्यानें विचारलें. आतां कमल व आपण अगदीं एक असल्याची तिच्या हरेक सुखदुःखाची जबाबदारी व भार आतां आपल्यावर असल्याची – त्यानें ही किती सहजतेनें ग्वाहि दिली !–

माधवराव प्रकाशचा मावसभाऊ व मित्र आहे हें कळतांच कौमुदीचा त्याच्याविषयीं अनुकूल ग्रह झालाच होता. पण तो तसा झाला नसता तरी त्याच्या ह्या वाक्यानें तिचें हृदय खास जिंकलें असतें – आणि हें बोलतांना त्याची मुद्रासुद्धां किती आर्जवी दिसत होती.

जणूं कांहीं त्याच्या व कमलच्या हातून घडलेल्या एकाद्या गुन्ह्याचा तो कौमुदीकडे जाबच देत होता !–

गुन्हा ! कमलच्या व माधवरावाच्या हातून हा गुन्हा घडला काय ? खरंच गुन्हां घडला. पण किती नाजूक, किती निष्पाप गुन्हा ! पण – पण न्यायनिष्ठुर समाजाला तो तसा वाटेल काय ? – मग ? – मग पुढें काय ?

माधवरावाच्या तेजस्वी, उमद्या, सभ्य चर्येकडे कौमुदीनें क्षणभर न्याहाळून पाहिलें. अहा ! कुणाहि तरुणीचें मन आकर्षून घेण्यासारखा माधवरावाचा चेहरा मोहक तर होताच पण त्या चेहऱ्यावर जी सात्विकता दिसत होती, त्याच्या २७-२८ वर्षांच्या वयाशीं विसंगत दिसणारा जो पोरकट भाव दिसत होता व कमलेविषयींचें जें उत्कट, निरागस प्रेम विलसत होतें, तें प्रेम, तो पोरकट भाव व ती सात्विकता कौमुदीच्या हृदयाला भिडली !

माधवराव व कमल हीं जणूं दोन खोडकर मुलं असून त्यांच्या खोडकरपणाचें शासन करण्याचा अधिकार आपल्याकडे आहे असेंच कौमुदीला

क्षणभर वाटलें. मग ह्या उभयतांना शासन करणार आपण! हो, हो, परस्परांचे परस्परांना प्रेमपूर्वक हृदयार्पण करण्याचें शासन देणार त्यांना आपण—

पण – पण – कमल राणी होती ना! राणी आहे ना – राणी-पदाच्या जबाबदाऱ्या तिच्यावर आहेत ना! हं!— काय करावयाचं?— नि काय बोलावयाचें?—

परंतु कांहीं तरी बोलावें म्हणून कौमुदीनें मृदु स्वरांत म्हटलें, "हें पहा माधवराव, ह्या बाबतींत पुष्कळच विचार करावयाला हवा. कमल राणी आहे, कुणी सर्वसाधारण तरुणी नव्हे हें ध्यानांत ठेऊनच काय तें ठरविलं पाहिजे.

"कौमुदीताई, कमल तुम्हांला अगदीं वडील बहिणीसारखी मानते. तिचा तुमच्यावर संपूर्ण विश्वास आहे. तुम्ही जे कराल ते तिच्या हिताचेंच कराल अशी तिची खात्री आहे. व माझीहि पण तशीच खात्री आहे. अन् प्रकाशवरहि पण माझा तसाच अढळ विश्वास आहे. तेव्हां ह्या बाबतींत तुम्ही त्याचाहि विचार घ्या. तुम्ही दोघे जें ठरवाल तें आम्ही मान्य करूं. काय, असंच ना?" शेवटला प्रश्न माधवरावानें कमलेला केला. त्यासरशी कमलेच्या गालावर लज्जेचे गुलाब फुलले जणूं!— आपल्याकडे कौमुदीचें लक्ष नाहीं असें वाटून तिनें माधवरावाकडे हळूंच प्रेमाचा कटाक्ष टाकला. पण कमलेपेक्षां कौमुदी १॥-२ वर्षांनीं वडील असली तरी ती स्वतःहि सध्यां प्रीतीचा मार्ग चोखाळीत असल्यामुळें त्या मार्गांतील साऱ्या पाऊलवाटा व आडवळणें तिला ठाऊक होतीं.

कमलेनें व माधवरावानें केलेली ही नेत्रपल्लवी तिनें पाहिली व त्याचा अर्थहि तिनें ओळखला. एवढेंच नव्हे तर जिथें खरी प्रीति असते तिथेंच अशी लाजरी, चोरटी डोळ्यांची भाषा सुरू असते हें ठाऊक असल्यामुळें त्या उभयतांना एकमेकांबद्दल निव्वळ शारीरिक आकर्षण किंवा विकारजन्य आवड वाटत नसून त्यांच्या हृदयांनां परस्परांची ओढ वाटत आहे हें कौमुदीला कळून आलें व त्यासरशीं तिला भीति वाटली!

प्रिय व्यक्ति नजरेसमोर असे तोंवर त्यांच्याविषयीं आकर्षण वाटावयाचें

व ती व्यक्ति कांहीं कारणानें दुरावली तर लगेच दुसरी प्रिय व्यक्ति शोधा-वयाची अशा तऱ्हेचे आजकाल खूप सवंग झालेलें मोसमी प्रेम हें नाहीं हें कौमुदीला कळलें. आजकाल कवित्व ओढवून येणारें निस्सीम प्रीतीचे हें चित्र पाहून तिच्या प्रेमळ, रसिक हृदयाला आल्हाद झाला तरी तितकाच खेदहि झाला. ह्यापेक्षां कमला व माधवरावही निव्वळ मोहाकृष्ट बनली असतीं तरी तें एकपरीनें बरें झालें असतें असें तिला वाटलें.कारण मग त्यांच्या प्रेमाचें साफल्य न झालें तरी त्यामुळें त्यांना तितकेसें दुःख झालें नसतें. पण त्यांच्या ह्या गाढ प्रीतीचें साफल्य जर होऊं शकलें नाहीं तर हीं दोघें आजन्म दुःखी होतील! कदाचित् त्या दुःखाच्या भरांत तीं दोघें आत्महत्त्याहि करतील असें कौमुदीला भय वाटलें!

शिक्षक व शिष्या ह्या नात्यानें ओळखीची सुरूवात होऊन आतां माधवराव–कमलेची परस्पर प्रीति इतकी दृढ झाली ना?—

कौमुदीला चटकन् रघुवंशातील अजविलापाची आठवण आली. त्यामध्यें अजराजानें इंदुमतीचें 'गृहिणी सचिवः सखी मिथः प्रियशिष्या ललिते कलाविधौ' असें वर्णन केलेलें कालिदासानें दाखविलें आहे. आपली ती प्रिय पत्नी आपली फक्त गृहिणीच नसून आपली सल्लागार, आपली मैत्रीण आपली प्रिय शिष्या इत्यादि अनेक भूमिका ती प्रसंगानुसार पार पाडीत होती असें अजराजानें अजविलापात वर्णिलें आहे व त्यावरून अजराजाच्या इंदुमतीवरील दृढ प्रीतीची वाचकांना साक्ष पटते!

माधवरावाची कमलेवरील प्रीतीहि अशीच नाहीं काय? आधीं अज-राजाची गृहिणी बनून मग इंदुमती त्याची प्रियशिष्या बनली. आणि आधीं प्रियशिष्या असलेल्या कमलेला माधवराव आतां गृहिणी बनवूं इच्छित होता, एवढाच फरक!

कालिदासासारख्या कविश्रेष्ठानें अज–इंदुमतीची प्रीति सुंदर काव्य-रूपानें अजरामर बनविली आणि माधवकमलेची प्रीति निसर्गाचें हें सुंदर काव्य आपण जन्मतांच मारून टाकणार कां?

परंतु कमलेचें राशीपद! 'ज्याचें अंगीं मोठेपण तया यातना कठिण' असें म्हटलेलेंच आहे ना. आपल्या राशीपदाचा मोठेपणा अभंग ठेविण्या-

साठीं कमलेला हृदयभंगाच्या यातना सोसणें भाग आहे !—पण हें योग्य आहे काय ? ज्या राशीपदाचा कमलेनें कधीं हव्यास धरला नव्हता, ज्या राशीपदामुळें तिला आजवर घडीभराचेंहि सुख लाभलें नाहीं त्या राशीपदासाठीं तिनें एवढा त्याग करावा अशी अपेक्षा बाळगणें न्याय्य होईल काय ?

माधवरावाच्या दर्शनानें आतां फुललेल्या कमलेच्या मुखाकडे कौमुदीनें पाहिलें व तिच्या मनांत आलें, ही प्रफुल्लित मुद्रा, ह्या मुद्रेला फुलविणारें कमलेचें प्रेमपुलकित हृदय व त्या हृदयांत प्रेमोद्भव करणारें तिचें नवसहारित तारुण्य ह्या सर्वांचा चुथडा करावयाचा हा कुठला न्याय ?—पण न्यायान्यायाची निवड करणार कोण ? समाज?—सीतागडची प्रजा ?—कमलेची नणंद ?—

ह्या साऱ्या विचारांचा चित्रपट डोळ्यापुढून सरकत असल्यामुळें कौमुदी अगदीं गप्प राहिलेली होती. व तें पाहून माधवराव कंपित स्वरांत म्हणाला " कौमुदीताई, तुम्हीं कांहींच कां बोलत नाहीं ? "

" काय बोलूं मी ? माधवराव, कोळ्याचें जाळें केवढ्या नाजूक तंतूंनीं बनविलेलें असतें तरी तेंसुद्धां आपल्याला एका सपाट्यांत तोडतां येत नाहीं. मग आपल्या भोंवतींचें नात्यागोत्याचें जाळें, कर्तव्याकर्तव्याचे पाश इतक्या सहजीं कसे बरं तोडतां येतील ? अं ? तें हलकेंच युक्तियुक्तीनें सोडविले पाहिजेत. कमलबरोबर साऱ्या साधकबाधक गोष्टींचा विचार केला पाहिजे. नंतर मीं मुंबईला जाऊन प्रकाशचेंहि मत घेईन व मग काय तें करूं या आपण. "

कौमुदीच्या ह्या भाषणांत वस्तुतः आशानिदर्शक असें कांहीं नसलें तरी शेवटल्या वाक्यांत तिनें जी आपुलकी दर्शविली तेवढ्यानेंच माधवराव आनंदला.' बुडत्याला काडीचा आधार ' ह्या न्यायानें प्रणयसागरांत पोहतांपोहतां बुडणार कीं काय, असें भय वाटल्यावेळीं प्रणयीजनांना सूक्ष्म आशेची काडीहि मजबूत आधारासारखी वाटते !

माधवराव किंचित् हंसत हांसत म्हणाला, " ठीक आहे. मीं आतां रजा घेतों तर. माझी गरज भासली तर माझ्या घराचा ठिकाणा कमलेला

ठाऊक आहेच. बरं, येऊं मी आतां ?" व मग कमलेनें कौमुदिशीं ओळख करून दिल्यावेळीं भावनातिरेकाच्या भरांत विसरून राहिलेला नमस्काराचा शिष्टाचार माधवरावानें आतां पार पाडला. व कौमुदीनेंहि हंसून त्याला प्रतिनमस्कार केला. पण माधवराव खोलीबाहेर जातांच कौमुदीच्या चर्येवरील हास्य पार मावळलें. तिची मुद्रा गंभीर, विचारी बनली व गंभीर स्वरांतच ती कमलेला म्हणाली, "हं, कमलाताई, आतां बैस अशी इथं. नि बघ, मीं तुला जे आतां प्रश्न विचारीन त्याची नीट, सावकाश उत्तरे दे. मुख्य प्रश्न असा कीं, राज्यावर कोण बसणार ?"

"तोच तर मोठा प्रश्न आहे. माझ्या त्या चुलत, चुलत सासूबाई आहेत ना, त्यांच्या मनात असं आहे कीं, आपल्या मधल्या मुलाला माझ्या मांडीवर दत्तक द्यावं. नि माझ्या सख्या नणंदेला वाटतं कीं, आपला मुलगा दत्तक द्यावा. अशी झाली आहे ह्या बाबतींत दुफळी !"

"असं ? मग सध्यां राज्यकारभार कोण पहातं ?"

"दिवाणसाहेब नि थोडयाबहूत ताईमहाराज."

"नि तूं ग ?"

"मीं ?" आपल्या रेखीव भिंवया उंचावीत कमला उत्तरली, "अग, मीं निव्वळ नांवाची राणी. मला मत नाहीं नि सत्ताहि नाहीं. मुलगा दत्तक घेण्याचा हक्क माझ्या हातीं आहे एवढ्याचसाठीं माझं कांहीं तरी महत्त्व आहे. दुसरं कांऽहीं नाहीं. आपापल्या मुलाच्या हितासाठीं हल्लीं ताईमहाराज नि आमच्या चुलतसासूबाई ह्या दोघींहि मला झेलत असतात अगदीं ! पण एकदां कुठला तरी एक वारस दत्तक घेऊन टाकला कीं, मला कुणीं कुत्रंसुद्धां विचारणार नाहीं. नि तशा स्थितींतहि मी प्रजेसाठीं, राज्याचा आब राखण्यासाठीं, समाजाच्या मतासाठीं, जुन्या, सोंवळ्या माणसांच्या मनाला धक्का लागू नये ह्यासाठीं जन्मभर इथें खितपत रहावं-काय ? सांग कौमुदी, सांग. पण त्याचवेळीं हेंहि ध्यानांत ठेव कीं, सांगणं सोपं असतं परंतु करणं भारी कठीण असतं !"

"पण कमल, सांगणं तरी कुठें ग सोपं असतं ? मला तर सांगणं-

मुद्धां भारी कठीण वाटतंय कीं. बघ, माझं मत तूं विचारते आहेस पण तें कुठें मला चट्दिशीं सांगतां येतंय् ?"

कमलेच्या भावनांना पडलेला ताण जरा कमी व्हावा म्हणून कौमुदीनें मुद्दाम विनोद केला. पण विनोद ऊबदार लोंकरीच्या कपड्यासारखा असतो. ऊबदार लोंकरीचे कपडे जसे हिंवाळ्यांतच रुचतात त्याप्रमाणें विनोदहि मनःस्थिति आनंदित असतांनाच रुचतो !—

त्यामुळें बिचाऱ्या कमलेला कौमुदीचा हा विनोद रुचला नाहीं. तिनें नुसतें औपचारिक स्मितसुद्धां केलें नाहीं.

त्यासरशीं प्रेमभरानें तिला जवळ ओढीत मृदु स्वरांत कौमुदी म्हणाली, "कमल, इतकी नाराज होऊं नकोस. अग, सत्पात्रीं दान करावं म्हणतात त्याप्रमाणें स्वार्थत्यागहि सत्पात्रींच करावयाचा असतो! नांवाच्या राणीपणासाठीं तूं जन्मभर वैराग्याचं वाण घ्यावंस असं मी कसं बरं म्हणेन ? पण बघ, अशा गोष्टी फार विचारानें कराव्या लागतात. अगदीं दूरदृष्टि ठेवावी लागते. उद्यांच मीं मुंबईला परत जाते नि ह्या बाबतींत प्रकाशचेंहि मत घेते. प्रकाश जेवढा पोरकट तेवढाच विचारीहि आहे. तेव्हां सर्वांच्या विचारान्वयें आपण काय तें ठरवूं. पण कमल, त्यापूर्वी तूं स्वतः होऊन कांहीं करूं नकोस हं."

"कौमुदी, हीच कां माझी परीक्षा केलीस तूं ? अग, तसं जर आम्हांला करावयाचं असतं तर ह्यापूर्वींच नसतों कां कुठंतरी गोव्या-बिव्याला पळून गेलों ? कौमुदी, माझ्या कर्तव्याची जाणीव मला बाळगावयाची आहेच परंतु सर्वस्वीं कर्तव्याच्या आहारीं जावयाचं नाहीं. कौमुदी-ताई, स्वार्थ साधूनच परमार्थ साधावयाचा असतो. स्वार्थ बुडवून कांहीं कुणीं परार्थ साधीत नाहीं. आजवर मी सर्वस्वीं बुद्धीच्या तंत्रानें चालत आलें पण आतां तसलं तें बुद्धिप्रधान, रुक्ष जिणं नको झालंय मला. परिस्थितीनें मला लंगडी बनविली असल्यामुळें बुद्धि व हृदय ह्या दोन कुबड्यांच्या आधारानें माझा पुढला मार्ग मी काढणार आहे. पण त्यासाठीं मला तुझी मदत हवी आहे. ताई, किती दिवसांत आपला निर्णय कळविशील तूं ?"

" पंधरा दिवसांत. " कमलेनें आपल्या खांद्यावर ठेविलेला हात गळ्या-भोंवतीं ओढून घेत कौमुदी चट्‌दिशीं उत्तरली.

कमला कौमुदीपेक्षां सुमारें दीड वर्षानें लहान असली तरी आजवर त्या दोघी समवयस्क मैत्रिणीसारख्याच वागत आल्या. पण आज सकाळीं सीतागडला आल्यापासून कमलेनें कौमुदीला 'ताई' असें मधूनमधून संबोधितांच कौमुदीला फार आनंद वाटला. तिला सख्खें भावंड मुळींच नव्हतें. व चुलत भावंडें तिच्यापेक्षां वयानें थोर असल्यामुळें ती कुणाचीच 'ताई' नव्हती. फार झालें तर 'कौमुदीताई' होती. पण 'ताई' ह्या नांवांतील गंमत 'कौमुदीताई'मध्यें नाहीं. त्यामुळें आज कमलेनें तिला आपली 'ताई' करितांच कौमुदीला आपल्या कमलविषयीं विशेषच आपुलकी वाटूं लागली !

कौमुदी जात्याच स्वावलंबी वृत्तीची होती. त्यामुळें परावलंबी कमलेनें तिच्यावर आपला भार टाकतांच व 'ताई' अशी तिला हांक मारून आपलें परावलंबित्व दर्शित करितांच कौमुदीनें स्वयंस्फूर्तीनें तिचा भार आपल्यावर घेतला व मग दुसऱ्या दिवशीं कमलचा निरोप घेऊन सीतागडहून निघते-वेळीं आपल्या लाडक्या, निराधार, दुबळ्या कमलच्या स्त्रीजीवनाचें सार्थक व्हावें म्हणून शक्य तों झटावयाचें असा तिनें निश्चय केला.

# ८ दिव्याखालचा अंधार

कमला कौमुदीसारखी स्वावलंबी नव्हती ह्यांत कांहीं विशेष आश्चर्य नव्हतें. पण गेलीं २।४ वर्षे स्वतःच्या पायांवर उभा असणारा प्रकाश कौमुदी इतका स्वावलंबी नव्हता ही मात्र आश्चर्यकारक घटना होती खरी. आजवर दरेक बाबतींत प्रकाश कौमुदीचा सल्ला घेत असे. परंतु गंमत अशी कीं, स्वतःच्या बाबतींत तो कौमुदीच्या बुद्धीवर बऱ्याच वेळां जरी विसंबत असे तरी इतरांच्या बाबतींत तो आपली बुद्धि चांगलीच चालवी व त्यामुळें माधव—कमलेचा प्रश्न त्याच्याकडे सादर करावयाला कौमुदी उत्सुक झाली होती हें सयुक्तिकच होतें.

घरीं आल्याबरोबर घाईघाईनें चहापाणी उरकून कौमुदी प्रकाशकडे गेली व माधव कमलेला पडलेला परिस्थितीचा पेंच तिनें प्रकाशच्या पुढें दाखल केला. व त्या कोड्यांत प्रकाश लगेच गुंग झाला.

बाकी प्रकाश अगोदरच एका विचारानें त्यामध्यें गुंगला होता एक वेगळीच 'अन्दरकी बात' होती.

कौमुदीच्या ह्या ७।८ दिवसांच्या गैरहजेरींत रश्मीचा व आपला वाङ्निश्चय पक्का करून टाकावयाचा व मग कौमुदी परत येतांच तिला ही बातमी कळवावयाची असें प्रकाशनें ठरविलें होतें; पण ७।८ दिवसां-ऐवजीं कौमुदी दोन दिवसांतच परत आली. पण म्हणून प्रकाशला

रश्मीकडे आपला इच्छित विषय काढावयाला तेवढ्यांत जमले नाहीं, असे मात्र नव्हे.

कौमुदी सीतागडला गेल्या दिवशींच प्रकाश संध्याकाळीं रश्मीकडे गेला व त्यानें वाङ्निश्चय पक्का करण्याबद्दल रश्मीच्या वडिलांकडे बोलून त्यांची संमति घेण्याविषयीं प्रश्नहि काढला होता.

रश्मीच्या काळ्याभोर, मादक नेत्रांकडे टक लावून पहात त्यानें म्हटलें होतें, "रश्मी आपल्या ह्या प्रेमाला आतां तुझ्या वडिलांच्या संमतीचा पाठिंबा कधीं घ्यावयाचा? आपला वाङ्निश्चय जाहीर कधीं करावयाचा?"

"जाहीर करावयाचा! प्रकाश आपलं प्रेम म्हणजे एक सुंदर काव्य आहे. त्या काव्यांत वाङ्निश्चयासारख्या गद्य घटनेची भेसळ इतक्यांतच कशाला करावयाची? आपली जोडी! अहाहा! प्रकाश, दुष्यंत व शकुंतला ह्यांचे कालिदासानें 'तुल्यगुण वधूवर' अशा शब्दांत वर्णन केलें होतें. आज तो ह्यात असतां तर 'तुल्यरूप वधूवर' अशा शब्दांत त्यानें आपलें वर्णन खात्रीनें केलें असतें—नाहीं?"

रश्मीचे हे प्रलाप ऐकून प्रकाश अगदीं गार झाला होता. म्हणजे कालिदासासारख्या पहिल्या दर्जाच्या नाटककाराच्या शाकुन्तल नाटकांतील एका सुंदर श्लोकाचा उल्लेख करण्याइतपत रश्मीनें संस्कृत भाषेचा अभ्यास केला आहे ह्याबद्दल वाटलेल्या आश्चर्यानें तो गार झाला नव्हता हं! कारण, संस्कृत भाषेतील सुंदर म्हणजे रश्मीच्या मतें केवळ शृंगाररसप्रधान नाटकें व काव्य वाचतां यावी म्हणून एका संस्कृत पंडिताकडे रश्मी मुद्दाम संस्कृतभाषा शिकली हें तिनें प्रकाशला केव्हांच सांगून टाकलें होतें. व तें प्रथम ऐकतांना प्रकाशला जशी एकप्रकारची घृणा व तिरस्कार वाटला तसाच आतांहि जरी वाटला तरी त्याहिपेक्षां, तिनें केलेला रूपाचा उल्लेख प्रकाशला फार त्रासदायक वाटला. त्याचमुळें तो लाजला व खिजला. व मग त्याचमुळें त्यानें रश्मीकडे गेल्या दोन दिवसांत पुनः वाङ्निश्चयाबद्दल गोष्टहि काढली नाहीं.

व म्हणूनच कौमुदी सीतागडहून परत आली तरी त्यानें तिला त्याविषयीं कांहीं कळविलें तर नाहींच व तो एवढ्यांत कळविणारहि नव्हता. आपल्या

मनांतील हें गुपीत, अघून मधून आपल्या हृदयाला सुपणारें हें दुख तिच्या-पासून लपवून कसें ठेवितां येईल ह्याच विवंचनेंत तो होता. व त्याचवेळीं माधव-कमलेच्या प्रेमाचें हें कठीण उदाहरण सोडविण्यासाठीं कौमुदीनें त्याची मदत मागितली व त्यानेंहि ती अगदीं खुल्या उत्साहानें दिली !

उद्योगी माणसालाच कार्यव्यग्रता प्रिय असते असें नाहीं. आपल्याला नकोशी वाटणारी एकादी गोष्ट विसरूं पहाणाऱ्या माणसालाहि कार्यव्यग्रता तितकीच प्रिय वाटूं लागते ! एकसमयावच्छेदेंकरून त्याच्या मनाला सुखविणाऱ्या व दुखविणाऱ्या रश्मीला कौमुदीच्या सानिध्यांत विसरून जावें असेंच त्याला हल्लीं वाटत असे. त्यामुळें माधव-कमलेच्या प्रेम पुष्पाला अकाली लागूं पहाणारी कीड न मारता दूर कशी सारावी ह्याबद्दल कौमुदी-बरोबर विचारविनिमय करण्यांत तो चटदिशीं गुंग झाला.

कौमुदीप्रमाणें प्रकाशलाहि कमल व माधवराव ह्यांच्याविषयीं नितांत सहानुभूति वाटली. माधवराव हा त्याचा मावसभाऊ होता. व कमला कौमुदीची त्याच्या प्रिय मैत्रिणीची लाडकी मैत्रिण होती. त्यामुळें माधव-रावासारख्या सुयोग्य तरुणाच्या प्रीतीचा तिला लाभ झाला असतां, प्रीतीचें हें सुमधुर पंचपक्वान्न तिच्यापुढें दैवानें वाढून आणलें असतां, तें बळेंच दूर सारून तिनें जन्मभर प्रीतिला भुकेलें रहावें हें कौमुदीप्रमाणें प्रकाशलाहि अयोग्य, अनैसर्गिक वाटलें. आणि तें तसें वाटावयाचेंच म्हणा ! प्रकाश व कौमुदी ह्यांची मैत्रीच इतकी दृढ व अकृत्रिम होती कीं, आजवर कधींहि त्यांचा कोणत्याहि बाबतींत मतभेद झाला नव्हता !

हो, नाहीं म्हणावयाला, प्रकाशला वाटणारें रश्मीचें आकर्षण हा एक अपवाद होता ! पण हा अपवाद प्रकाशला तरी कुठें योग्य वाटत होता ! रश्मीबद्दलचें हें आकर्षण त्याच्या बुद्धीला तरी कुठें पटत होतें ? रश्मीच्या अव्यंग सौंदर्याच्या मोहांत गुंतल्यामुळें त्याच्या हृदयाला धुंदपणा व बुद्धीला सुन्नता आली होती हेंच खरें !

खूप ताप चढलेल्या रोग्याला बुद्धिभ्रम नाहीं कां होत ? त्याप्रमाणें प्रणयज्वरानें हैराण झाल्यामुळें प्रकाशच्या बुद्धीला भ्रम झाला होता जणूं ! रश्मीमधील दोष त्याच्या बुद्धीला दिसत असूनहि तिच्या सौंदर्यानें वेडाव-

लेलें त्याचें हृदय तिकडे दुर्लक्ष करण्याचें सुचवीत होतें व त्याची बुद्धीहि त्याप्रमाणें करीत होती.

कमला व माधवराव ह्यांच्यापुढें असलेल्या प्रश्नाचा तो समतोल बुद्धीनें विचार करूं शकत होता. पण रश्मीविषयीं आपल्या हृदयाला वाटणाऱ्या आकर्षणाला प्रीति म्हणणें योग्य आहे काय असा विचार करावयाला तो तयार नव्हता!

दिव्या खालील अंधार हा! दुसरें काय? दिवा, विजेचा दिवा नव्हे हं, पूर्वीच्या पद्धतीचा स्टँडचा दिवा बाजूच्या इतर वस्तूंवर उजेड पाडूं शकतो पण प्रत्यक्ष आपल्या खालीं तो प्रकाश त्याला पोंचवितां येत नसतो! त्याप्रमाणें प्रकाशच्या बुद्धीला माधव-कमलेचें विशुद्ध प्रेम ओळखूं आलें पण आपल्याला रश्मीविषयीं वाटणारें आकर्षण तसें विशुद्ध नाहीं हें त्याला कळूं शकलें नाहीं!

प्रेम, नव्हे—प्रेमाकर्षण नुसतें आंधळेंच नसून बहिरें, मुकें व मतिमंदहि असतें! नाहीं तर, रश्मीशीं कोणत्याहि बाबतींत साम्य नसतांहि तिच्याशीं विवाह केल्यानें आपण सुखी होऊं असा मोह प्रकाशला कसा पडला असता? पण ह्या मोहांतहि प्रकाशला मधूनमधून हुरहूर वाटे. रश्मीवरील त्याचें प्रेम पुरतें आंधळें, बहिरें वगैरे नसल्यामुळें तिच्यावर आपलें प्रेम आहे असें वाटत असूनहि त्यापासून त्याला समाधान होऊं शकत नव्हतें! नाहीं तर आपल्या मधूर प्रीतीचा आपल्या प्रेयसीनें स्वीकार केल्यानंतर कांहीं दिवस तरी त्याच मोहक स्वप्नांत गुंगत राहून बाह्य जगाला विसरून जाण्याचा मोह प्रणयीजनांना केवढा होत असतो!

पण बिचारा प्रकाश! रश्मीनें त्याच्या प्रेमाचा स्वीकार केला असूनहि त्या आनंदांत बाह्य जगाला विसरण्याऐवजीं बाह्य जगांत अधिकच मिसळून कांहीं वेळ तरी त्या आनंदाचाच विसर पडावा असाच मोह त्याला होत होता.

आपल्या कृतीला बुद्धिहृदयाच्या ऐक्याचा पाठिंबा नसला, आपल्या त्या कृतीबाबत बुद्धिहृदयामध्यें अशी रस्सीखेंच सुरूं असली म्हणजे अंतः-

करणाऱ्या समाधानाला माणूस असा पारखाच होणार ? व मग इतर कुठून तरी तें समाधान मिळविण्याचा प्रयत्न तो करूं लागतो.

आतां ह्याच प्रयत्नापायीं कौमुदीबरोबर माधव-कमलेच्या प्रीतीची गुंतागुंत सोडविण्यांत प्रकाश इतका गुंगला एवढेंच नव्हे तर त्या दिवशीं संध्याकाळीं ऑफिसांतून आल्यावर तो नेहमींप्रमाणें रश्मीच्या भेटीलाहि गेला नाहीं.

त्याला ती आठवणच झाली नाहीं असें नव्हे. पण हल्लीं रश्मीच्या बोलण्या करण्यांत, त्याला नावीन्य वाटेनासें झालें होतें. स्वतःच्या सौंदर्याचें वर्णन व तदनुषंगानें प्रकाशच्या देखणेपणाचें कौतुक ह्या त्याच त्या प्रकाराचा प्रकाशला आतांशीं वीट येऊं लागला होता. बाकी, त्याची वृत्ति एवढी प्रामाणिक होती कीं, त्यानें हें कधींहि कबूल केलें नसतें !

त्यामुळें त्या दिवशीं ऑफिसांतून आल्यानंतर कौमुदीशीं बोलण्यांत गढल्या कारणानेंच आपल्याला रश्मीकडे जाण्याचा विसर पडला अशीच त्यानें आपल्या मनाची फसवणूक केली. कारण वस्तुस्थिति अशी होती कीं, साडेसहा वाजत आले रश्मीकडे जाण्याची वेळ झाली हें त्याच्या लक्षांत येतांच ती वेळ चुकविण्यासाठीं त्यानें कौमुदीबरोबर चाललेल्य संभाषणांत मुद्दामच एक नवा प्रश्न घुपडला होता.

बराच वेळ मनांत घोळणाऱ्या त्या प्रश्नाचा आतां उच्चार करीत तो म्हणाला होता. "हो खरंच, कौमुदी, सीतागड संस्थानांत वारस दत्तक घेण्याबद्दल काय भानगड आहे ?"

"भानगड म्हणजे अशी कीं, कमलची विधवा नणंद तिथेंच असते म्हणून सांगितलं ना मी तुला ! तर त्या नणंदेच्या मनांत आपला मुलगा कमलनें दत्तक घ्यावा असं आहे. नि कमलेच्या चुलत, चुलत सासूबाईच्या मनांतून आपला मुलगा दत्तक घ्यावयाचा आहे. कमलच्या सख्या नणंदेचा मुलगा म्हणजे नात्यानें अगदीं जवळचा ! पण वेगळ्या गोत्रांतला ना ? नि तो दूरचा चुलत चुलत सासूचा मुलगा, त्याच गोत्रांतला ! अशी आहे सारी भानगड ! पण दिवाणसाहेबांचा कल आहे ह्या गोत्रांतल्या मुलाकडे नि प्रजाजनांचें बहुमत मात्र राजेसाहेबांच्या भाच्याकडे आहे ! आतां

म्हणे हें प्रकरण व्हॉइसरायपर्यंत गेलं असून व्हॉइसराय स्वत: येऊन काय तो निर्णय देणार ! प्रकाश, तुझं काय मत आहे रे ? वास्तविक राज्याचा वारसा कुणाला मिळावा ? ”

“ अर्थात् कमलताईच्या नणंदेच्या मुलाला. कमलताईच्या नणंदेच्या वाडवडिलांचं तें राज्य ! मग त्यावर तिचा कांहींच हक्क असूं नये का ! केवळ बापाच्या गोत्रांतला म्हणून एक कुठला तरी उपटसुंभ मुलगा राज्यावर बसवावयाचा! जुन्या गोत्रापेक्षा रक्ताचा संबंध अधिक निकटचा नाहीं काय ! अं ? कौमुदी, तुला काय वाटतं ? ”

“ अगदीं तुझ्यासारखंच मत आहे माझं प्रकाश ! बाकी, दत्तकाबाबत असा वाद निघाल्यामुळें कमलेचं जरा फावलं आहे सध्यां. आपला मुलगाच राज्याचा वारस होणार अशी खात्री असल्यामुळें कमलची ती नणंदबाई तिला आजवर भारी छळत असे. पण आतां दिवाणसाहेबांनीं चुलत घराण्यांतील हा वारस पुढें करितांच ती हल्लीं कमलच्या पुढें पुढें करूं लागली आहे. शिवाय तीच ती चुलत सासूहि हल्लीं तिच्यापुढें अगदीं गोंडा घोळत असते. मिळून सध्यां कमलच्या नशिबींचे हाल जरा कमी झाले आहेत.”

“ खरंच पण, कमल, दिवाणसाहेबांचा कल तरी त्या चुलत घराण्यांतील वारसाकडे कसा ग ? वास्तविक पूर्वीच्या राजेसाहेबांपासून हा दिवाण तिथें आहे. मग त्या राजेसाहेबांच्या मुलीच्या मुलाबद्दल त्याला कांहींच आस्था वाटूं नये ? ” प्रकाशनें कांहींशा आश्चर्यानें प्रश्न केला.

त्यावर कौमुदी खिन्नस्वरांत उद्गारली, “ पण रूढीला नि जुन्याला चिकटून बसतो आहे ना तो ! कमल माधवरावाकडे इंग्लिश शिकूं लागली हें कुठं त्याला पसंत पडलें ? पण हल्लीं वर्षभर कमळची नणंद व चुलत सासू ह्या दोघीं व पर्यायानें त्यांचे दोन्ही गट कमलच्या कलानें वागायला झटताहेत हें पहातांच नाइलाजास्तव म्हातारा त्या बाबतींत गप्प बसला, एवढंच !

“ असं ! मग आतां ह्याला उपाय ? ”

“ उपाय ? तूं सुचव एखादा. त्याचसाठीं तर मीं तुला हें सारं पुराण सांगितलं. ”

" तें खरं ग. पण ह्यावर थोडा विचार नको कां करावयाला ! उपाय कोणत्या बाजूनें योजावयाचा ती दिशा तर आधीं सांपडूं दे."

" हंऽ, दिशा काय अशी आपोआप आढळते ! शोधा म्हणजे सांपडेल म्हटलं." कौमुदीच्या ह्या उत्तरावर प्रकाश हंसून म्हणाला, " ठीक आहे. या क्षणापासून शोधाशोध करावयाला लागूं या. पण काय ग कौमुदी, मी नोकरी सुद्धां सोडून देऊं कां ? हो, म्हणजे, शोधाशोध करावयाला तितका अधिक वेळ मिळेल ! अं ?"

" इश्श ! प्रकाश, ही रे काय चेष्टा ! म्हणे नोकरी सोडूं कां ? म्हणजे कुणाच्या म्हशी नि कुणाला उठाबशी, ह्यांतलाच प्रकार ! अशा पुढें आलेला कोणताहि अवघड प्रश्न सोडविण्यासाठीं जर नोकरी सोडावयाची म्हटली तर तो प्रश्न सोडविण्यापूर्वी दुसरी नोकरी कुठें शोधावी हा प्रश्नच आधीं हातीं घ्यावा लागेल कीं !"

कौमुदीच्या ह्या प्रतिचेष्टेनें प्रकाश खूष झाला. गेल्या दोन दिवसांत तो आतां पहिल्यांदाच अगदीं मनमोकळं हंसला. व मग हंसत हंसतच म्हणाला, " ठीक आहे तर. नाहीं सोडीत नोकरी. बघूं या. कदाचित् आमचा साहेबच हा प्रश्न सोडवायला मदत करील. काय नेम सांगावा !"

अर्थातच प्रकाशनें ही निव्वळ चेष्टा केली व कौमुदीनेंहि प्रकाशच्या ह्या शब्दांची चेष्टेच्या नांवाखालींच बोळवण केली. पण कधीं कधीं ज्याप्रमाणें कल्पनेपेक्षां सत्यच अधिक अजब ठरतें त्याप्रमाणें कधीं कधीं थट्टेनें उच्चारलेले शब्दच खरे ठरतात !

# ९ मैत्री लज्जा आणि प्रीति ?

आणि आतां तसेंच झालें ! दुसऱ्या दिवशीं संध्याकाळीं ऑफिसांतून आल्यावर प्रकाश मोठ्या गडबडीनें कौमुदीच्या बिऱ्हाडीं गेला. कौमुदी स्वयंपाकघरांत चहा करीत होती तिथवर थेट जाऊन तो तिला म्हणाला, "कौमुदी, इकडे ये, इकडे ये आधीं; तुला एक गम्मत सांगायची आहे."

प्रकाशची ती हंसरी, उल्हासित मुद्रा पाहून कौमुदीच्या हृदयाला कसा जडपणा आला. तिला वाटलं, रश्मीबरोबर आपला विवाह ठरला हीच गंमत प्रकाश आतां सांगणार.

व एक मंद निःश्वास तिच्या मुखावाटें बाहेर पडला. पण आपल्या हृदयांतील खळबळ बाहेर न दर्शवितां मान बाजूला वळवीत ती म्हणाली, "अं एवढा चहा गाळून येते हं तुम्ही गंमत ऐकावयाला.

"असं ग काय करतेस कौमुदी ! तुला ही मजा सांगण्यासाठीं ऑफिसांतून मुद्दाम इतक्या घाईनें आलों नि तूंऽ, राहूं दे ग तो चहा. अग, तुझ्या कमलाताईला पडलेला परिस्थितीचा पेंच सोडविण्याची दिशा मला सांपडली. '

"खरं ? " प्रकाशचे हे शब्द ऐकून कौमुदी कांहींशा विश्वस्त मनानें

उद्गारली व चटकन् उठून प्रकाशच्या जवळ उंबरठ्यावर उभी रहात तिनें म्हटलें, " मग, सांग बघूं ती दिशा."

" बघ, कौमुदी, ही दिशा शोधण्यासाठीं काल नौकरी सोडण्याबद्दल मीं थट्टेनें बोललों नि मग मींच होऊन म्हटलं कीं, नौकरी नाहीं सोडावयाची—कदाचित् आमचा साहेबच ह्यावर उपाय सुचवील म्हणून, होय ना ? मग तेंच खरं ठरलं ! ह्या दत्तकाच्या प्रकरणाबाबत व्हॉइसराय सीतागडला जाणार आहे व त्यासाठीं तिथें एक नवीन धर्तीचा बंगलेवजा राजवाडा बांधावयाचा आहे. त्या कामासाठीं आमच्या फर्मनें टेंडर पाठविलें होतें व तेंच पास झालें असून त्या कामावर देखरेख करण्यासाठीं साहेब मला तिथें पाठविणार."

" नि मग ! "

" मग काय ? पहिल्यांदा तिथल्या त्या म्हातारबुवांची आणि दिवाणाची मर्जी मी संपादन करणार. म्हणजे त्यामुळें कमलाताईची भेट घेणं व प्रसंगविशेषीं त्यांच्याशीं विचार विनिमय करणं सोपं जाईल मला. आणि कौमुदी, कमलाताईंना पत्र पाठवून माझी जुजबी ओळख करून दे हं कमलाबाईंना."

" ती नांवानें ओळखते कीं तुला."

" ओळखते ? ती कशी बुवा ? " प्रकाशनें भिवया आकुंचित करीत प्रश्न केला.

त्याचा हा प्रश्न अगदीं साधा व सरळ होता. पण तेवढयानेंच कौमुदी भारी संकोचली. कारण प्रकाशची व तिची मैत्री आहे, एवढेंच नव्हें तर प्रकाश-विषयीं कौमुदीच्या भावना काय आहेत हें कमळला चांगलें ठाऊक होतें व त्याचमुळें तिनें ' कौमुदीचा प्रकाश ' असा उल्लेखहि केला होता. व आतां ही सारी आठवण येऊनच कौमुदी इतकी संकोचली, गडबडली. प्रकाशला कांहीं उत्तर देण्यापूर्वीं प्रकाशजवळ मात्र असला कांहींहि उल्लेख न करण्याबद्दल कमलला पत्रानें बजावावयाचें असें कौमुदीनें आधीं मनांत ठरवून टाकलें. व ह्या विचारांत गुरफटल्यामुळें तिनें प्रकाशच्या प्रश्नाला उत्तर दिलें नाहीं.

तेव्हां प्रकाशनें पुनः म्हटलें, "सांग ना कौमुदी, कमलाताईला माझी ओळख कुठली?"

"आपली मैत्री आहे हें माझ्याकडून कळलं आहे कीं तिला." असें उत्तर देऊन झट्दिशीं तो विषयच बदलीत कौमुदी पुढें म्हणाली, "अगबाई, चहा गाळायचा राहिलाच कीं. खूपच पिकला असेल तो आतां."

आणि खराच जरा अधिकच पिकला होता तो चहा. व तो कडू लागेल म्हणून कौमुदी दुसरा चहा ठेवणार होती. आपल्याला स्टॉंग चहा आवडतो असें प्रकाशनें आग्रहपूर्वक सांगितल्यामुळें तिनें तोच गाळून तयार केला.

स्ट्रॉंग चहाची आवड नसल्यानें कौमुदीला चहा बराच कडवट लागावा कारण वास्तविक तो होताच मुळीं कडू. पण मौज अशी कीं, मघां प्रकाश गंमत सांगणार होता ती रश्मीशीं त्याचा वाङ्निश्चय ठरल्या-बद्दलची असणार ही कौमुदीला आलेली शंका आतां खोटी ठरल्यामुळें ती इतक्या आनंदांत होती कीं, आतांचा कडू चहा तिला अगदीं सुरेख वाटला!

नि चहाची कटुता तिला विसरावयास लाविणारें आणखीहि कारण आतांच घडलें होतें! कमळ प्रकाशला नांवानें ओळखते असें मघां बोलल्यापासून कमलनें 'तुझा प्रकाश' असा उल्लेख केला होता ही आठवणहि कौमुदीला एकसारखी होत होती.

आपला प्रकाश— कौमुदीचा प्रकाश!—नि ह्या गोड शब्दयुग्माच्या आठवणींत रंगल्यामुळेंहि कौमुदीला कडू चहा गोड वाटला!

केवढें हें भावनांचें अतुल सामर्थ्य! माणसाला मनानें रोग जडतात नि मनानेंच ते बरेहि होतात असा मानसशास्त्रज्ञांनीं जो शोध लाविला आहे तो नवा किंवा अपूर्व आहे असें नाहीं कांहीं! जगाच्या प्रारंभापासूनच प्रणयी जनांना ह्या मानसिक सामर्थ्याचा—भावनांच्या ह्या अजब परिणामांचा अनुभव आहे! मात्र त्यांत फरक एवढाच कीं, प्रणयी जनांना स्वतःला ह्याची दादहि नसते!

आपण सीतागडला पोंचल्या वेळीं फिकट, निस्तेज दिसणारी कमला

माधवरावांच्या दर्शनानें लगेच प्रफुल्लित दिसूं लागली. हा मनाचा खेळ कौमुदीच्या लक्षांत आला पण एरवीं अतिशय कडू वाटला असता असा स्ट्रॉंग चहा आपल्या उल्हसित मनोवृत्तीमुळें आपल्याला तसा वाटला नाहीं हें कांहीं तिच्या लक्षांत आलें नाहीं.

तो कडू चहा आवडीनें पीत पीत ती प्रकाशला म्हणाली, "मग! तुला सितागडला जावं लागेल तर!"

कौमदीची मुद्रा एकाएकीं एवढी उल्हसित दिसण्याचें कारण शोधण्यांत प्रकाश गढला होता. आतां तिचा हा प्रश्न ऐकतांचं भानावर येत तो म्हणाला, "अं– सीतागडला होय! ह्या आठवड्यांतच गेलं पाहिजे कीं मला. तीन महिन्यांत तिथलं काम पुरं झालं पाहिजेना."

"मग! तितके दिवस तिथें रहाणार तूं!

"छेः! प्रारंभीं १०।१५ दिवस राहून कामाला नीट सुरुवात करून देणार नि मग मी परत येणार. नंतर आठवड्यांतून एकदां किंवा दोनदां जावं लागेल." क्षणभर थांबून प्रकाश पुढें म्हणाला, "कौमुदी, मला एक शोध लागलाय् आतां."

"शोध! नि तो कसला बाई!

"मैत्री हा शब्द स्त्रीलिंगी कां असतो तें कळून आलंय् मला आज."

"म्हणजे?"

"म्हणजे असं कीं, पुरुषापुरुषांच्या मैत्रीपेक्षां स्त्रियास्त्रियांची मैत्री अधिक दृढ असते व म्हणूनच व्याकरणकारांनीं मैत्री स्त्रीलिंगी ठरविली आहे! कौमुदी, आतां मी इथें आलों त्यावेळीं तुझी मुद्रा जरा त्रासिक दिसत होती. शाळेत दिवसभर डोकेफोड केल्यानें अगदीं त्रासली होतीस तूं! पण मग तुझ्या लाडक्या मैत्रिणीला पडलेला पेंच सोडविण्याची दिशा सांपडली नि त्यानंतर हळूहळू मार्गहि सांपडेल असं मीं तुला कळवितांच तुझी चर्या किती फुलली! कमलाताईच्या व तुझ्या दृढ मैत्रीचा हा पुरावाच नव्हे काय?"

प्रकाश हें बोलत असतां कौमुदीची मुद्रा आणखीच प्रफुल्लित झाली नि तेवढीच लज्जितही झाली!–व तें पाहून प्रकाश स्तिमित झाला! 'मैत्री'

ह्या शब्दाचें स्त्रीलिंग अगदीं सार्थ आहे हें आपण किती कौशल्यानें सिद्ध केलें ह्या आनंदांत होती रश्मी !—कौमुदीच्या मुद्रेवरील आनंदाचें त्याला मघां आकलन झालें. पण ही आतांची लज्जा—हा लाजरा भाव—ह्याचा काय अर्थ ? त्याला कांहीं कळेना !

वेडा प्रकाश ! कांहीं दिवसांपूर्वी कौमुदीच्या चर्येवरील निसटता व्यथित भाव पाहून तिच्या गुपिताची आपल्यावर तिचें प्रेम आहे ह्या गुपिताची अंधुक कल्पना त्याला आली होती. पण पुढें रश्मीविषयींच्या आकर्षणांत तो अधिकाधिकच गुरफटत चालल्यामुळें व कौमुदीहि त्याच्याशीं पूर्वी-सारख्याच मोकळेपणानें वागूं लागल्यामुळें त्या गुपिताचा त्याला जवळ जवळ विसरच पडला होता.

त्यामुळेंच आतां कौमुदीच्या चर्येवरील लाजऱ्या स्मिताचा अर्थ त्याला कळेना. तरुणीतरुणींच्या मैत्रींत लज्जा कशी घुसते हें त्याला समजेना. कौमुदीच्या त्या गुपिताचा इथें संबंध असेल अशी कल्पनाही त्याच्या डोक्यांत आली नाहीं ! तरुणीतरुणींच्या मैत्रींत जरी लज्जेला खरें स्थान नसलें तरी तरुणतरुणींच्या मैत्रींत लज्जेला अग्रस्थान असतें; तरुण-तरुणींच्या मैत्रीचें प्रीतींत पर्यवसान होण्यासाठीं लज्जेची मध्यस्थी आवश्यक असते हें त्याच्या ध्यानांतच आलें नाहीं !

कारण त्याची प्रीति, त्याच्या मतें, जिथें गुंतली होती तिथें म्हणजे रश्मीच्या बाबतींत तरी लज्जेची असली गोड, नाजुक मध्यस्थी त्याच्या अनुभवाला आली नव्हती ! त्याच्या व रश्मीच्या भेटीमध्यें किंवा संभा-षणाच्या वेळीं रश्मीच्याऐवजीं तोच लाजत असे, त्याचीच स्थिति लज्जास्पद होत असे ! पण तरुणीला शोभणारी व शोभविणारी लज्जा अहं, रश्मीच्या बाबतींत प्रकाशला ती कधींच आढळून न आल्यामुळें एरवीं दोघांत तिसरें सहन न करणाऱ्या प्रेमी जनानांहि प्रिय वाटणाऱ्या या लज्जेची प्रकाशला तितकीशी ओळख नव्हती !

व प्रकाश हुषार इंजिनियर होता, आपल्या मतें उच्च व्याकरणकार होता तरी त्याला मानसशास्त्र गम्य नव्हतें !

खरंच सर्व माणसांनीं, निदान सर्व तरुण माणसांनीं तर मानसशास्त्राचें

नीट ज्ञान करून घेतलें तर सर्व जणांना एकमेकांच्या हृदयाची व हृदयस्थ भावनांची माहिती होऊन बरेचसे गैरसमज टळतील !

पण विशुद्ध प्रीतीचा खेळ खेळतांना अत्यावश्यक असणारा हृदयाचा लपंडाव प्रेमी तरुणतरुणींना मग कसा खेळतां येईल ?

आपल्या प्रिय व्यक्तीची नजर चुकवून त्याच्या हृदयसागरांत खोल दडलेल्या, पण प्रियमुखचंद्राच्या उदयासरशीं वरती उसळणाऱ्या भावना शोधून काढण्याचा आनंद प्रणयीजनांना मग कसा लाभेल ?

व लहानसान गैरसमजावरून रुसवे फुगवे व लटकीं भांडणें करण्याच्या व नंतर सभेट घडविण्याच्या मधुर आनंदाला प्रेमीजन अशानें मुकतील ना ?

तेव्हां प्रणयीजनांपैकीं बहुधा सारेजण गहन मानवशास्त्रांत अज्ञ असतात हेंच उत्तम !—नाहीं तर अनुभवामुळें अधिकच मधुर वाटणाऱ्या प्रीतीची माधुरी नष्ट होऊन त्या माधुरीच्या जादूमुळें कधीं कधीं नंदनवन बनणारी ही पृथ्वी कायमचीच सहारा वाळवंट होऊन बसावयाची !

हो, आणि कवींनीं व कादंबरीकारांनीं लेखनाला प्रीति विषय घेतलाच नसता !—वगैरे अनेक अनर्थ कोसळले असते !

तेव्हां आहे हें ठीक आहे !

नाविन्याची आवड असणाऱ्या प्रेमी तरुणजनांना आपल्या प्रिय व्यक्तीचें हृदय अज्ञात असतें ह्यांतच प्रीतीची मौज सांठलेली आहे !

व म्हणूनच, रश्मीचें हृदय प्रकाशला पूर्ण ज्ञात असल्यामुळेंच तिच्या-विषयीं आकर्षण वाटलें तरी त्याला प्रीति वाटूं शकत नव्हती !

पण हें त्याला कळत कुठें होतें ? कळणार कसं म्हणा ? हृदय व बुद्धि जर समतोल असलीं तर कळणार हें. आणि प्रकाशची बुद्धि सर्वस्वी त्याच्या हृदयाच्या आहारीं गेली होती !

# १०



त्यानंतर २-४ दिवसांनींच प्रकाश सीवागडला निघून गेला. त्या दिवशी दोन प्रहरीं कौमुदीनें व त्यानें किती तरी गप्पा मारल्या. व गप्पा मारता मारतांच प्रकाश सामानाची बांधाबांधहि करीत होता. बहुतकरून १०-१५ दिवस रहावे लागणार अशी अपेक्षा असूनही साधारण महिन्या-भराला पुरतील एवढें कपडे प्रकाशनें बरोबर घ्यावयासाठीं बाजूला काढले होते. व आपल्या नेहमींच्या अव्यवस्थित वृत्तीला अनुसरून त्यानें मोठ्या थोरल्या सूटकेसमध्यें ते कसें तरी कोंबलें.

पण मग झांकण बंद होईना. तेव्हां कांहीं कपडे प्रकाशनें बाहेर काढले व ते भरण्यासाठीं त्यानें पलंगाच्या खालून दुसरी सूटकेस फरकन् बाहेर ओढली.

तें पाहून कौमुदी हंसत हंसत म्हणाली, "हं, आतां तूं इथें बैस ह्या खुर्चीवर. ती दुसरी सूटकेस लोट परत पलंगाखालीं नि आतां मी तुझे कपडे कसे भरतें तें पहा,"

व बोलल्याप्रमाणें कौमुदीनें प्रकाशचे ते सर्व कपडे त्या एकाच सूटकेस-मध्यें नीट भरून टाकले व मान वळवून प्रकाशकडे पहात ती मिस्किलपणें म्हणाली, " प्रकाश, आणखी कांहीं कपडे घालावयाचे आहेत काय?"

तिच्या ह्या पोरकटपणाची गंमत वाटून प्रकाश चेष्टेनें उत्तरला, " अहं

कपडे नाहीं आणखी घालावयाचे. पण तूं स्वतःच आंत बसत असलीस तर पहा बुवा."

प्रकाश हें अगदीं सहज, निव्वळ चेष्टेनें बोलला. पण त्यासरशीं कौमुदीची नेहमींची प्रशांत, गंभीर मुद्रा चटकन् बदलली. तिचे गाल लाजरे झाले, डोळे चंचल बनले. पण फक्त क्षणभरच! — लगेच तिची चर्या व्यथित, व खिन्न दिसूं लागली. पण ही भावनाही क्षणमात्रच टिकली. सारा दीड, दोन क्षणांचा खेळ!

झटदिशीं आत्मसंयमन करून कौमुदीनें आपली चर्या नेहमींसारखी प्रशांत बनविली. पण तिच्या भावनांचे ते दोन परस्परविरोधी खेळ प्रकाशच्या नजरेंतून सुटले नाहींत!

त्याला झटकन् त्या विवक्षित दिवसाची आठवण झाली. व मग २-३ दिवसापूर्वी आपल्याला कौमुदीच्या बाबतींत मैत्री व लज्जा ह्यांचा मेळ घालतां आला नव्हता हीहि आठवण झाली!

मैत्री व लज्जा ह्यांचा मेळ जमत नसला तरी लज्जा व प्रीति ह्यांचा तो चांगलाच जमतो हें आतां त्याच्या ध्यानांत आले.

त्याला कसें तरीच झालें! कौमुदीची व आपली ही अवघडलेली मनःस्थिती दूर करण्यासाठीं काय करावें, काय बोलावें हेंच त्याला सुचेना—

ठाकठीक भरलेल्या त्या सूटकेसमधील खाकी शर्टांच्या घड्यांची उगीच चाळवाचाळव करीत कौमुदी खाली मान घालून बसली होती.

तिच्या चर्येवर मघांच्या त्या भावनोद्रेकांचा आतां मागमूसहि नव्हता. तिच्या चेहऱ्याकडे व तिनें सुव्यवस्थित भरलेल्या त्या कपड्यांकडे पहात असतां प्रकाशच्या मनांत आले, "खरंच, ही कौमुदी मोठीच अजब चीज आहे! तिनें ह्या सूटकेसमध्यें आतां कपडे जसे सुव्यवस्थित भरले तशा आपल्या भावनाही ती हृदयांत व्यवस्थित दडवून ठेवते, नाहीं? आणि आपण? हं.— आपलं कपडे भरणं जसं अव्यवस्थित तशा आपल्या स्वतःच्या भावनाहि अव्यवस्थित पडलेल्या असतात! रश्मीवरील आपलं प्रेम कुठें आपल्याला छपवून ठेवितां आले? तें कुणाच्या लक्षांत आल्यावाचून राहील?

कौमुदीच्याहि नजरेला तें आलें असेल. नि शिवाय, त्या दिवशी आपण तिला त्याबद्दल स्पष्ट सांगितलंहि मग आतां तिला पुढचं–"

—पण काय असेल तें असो! प्रकाशला आतां कौमुदीसमोर रश्मीचा नामोच्चारहि करवेना. व त्याचमुळें त्या संध्याकाळीं रश्मीच्या वडिलांसमक्ष त्यानें तिचा व आपला वाङ्निश्चय जाहीर केला तरी कौमुदीला त्याबद्दल उघड सांगण्याचें धाडस त्याला होईना–

कौमुदीला कांहीं न सांगतांच तो रात्रीच्या गाडीनें सीतागडला निघून गेला. मात्र तिथून पत्रानें तिला ही बातमी कळवावयाची असें त्याच वेळीं त्यानें ठरविलें.

पण सीतागडला गेल्यानंतर त्याच्याहातून तेवढेंहि होईना. म्हणजे त्यानें कौमुदीला तिथून पत्रच धाडलें नाहीं असें नव्हे. त्यानें पोचल्याच्या दुसऱ्याच दिवशीं तिला पत्र लिहिलें परंतु त्यांत ह्या बातमीचा प्रत्यक्ष असा कांहीं उल्लेख केला नाहीं. व तरीहि थोड्या विचाराअंती चाणाक्ष कौमुदीला आपलें गुपित ओळखूं यावें अशी एक युक्ति त्यानें योजिली.

त्यानें पत्र लिहिलें त्यांत आपल्या प्रवासाबद्दल थोडें लिहून नंतर वाड्याच्या कामाविषयीं चार शब्द खरडले व पुढें लिहिलें,

> " इथें किनई गुलाब फार सुंदर व टपोरे मिळतात. आज मी रश्मीला गुलाबाच्या फुलांचें एक पार्सल पाठविलें असून त्यांतील कांहीं गुलाब तुझ्याकडे पोंचविण्याबद्दल कळविलें आहे त्याप्रमाणें ती करीलच. "

आणि हा मजकूर वाचतांच कौमुदी काय समजावयाचें तें समजली. कारण प्रकाश परिस्थितीनें खूप सधन नसला तरी कौमुदीला फुलांचें वेगळें पार्सल धाडण्याचा खर्च कांहीं त्याला जड वाटला नसता हें तिनें ओळखलें.

मग असें असतांहि प्रकाशनें पार्सल रश्मीच्या नांवेंच कां पाठविलें ? कां ? कारण उघड होतें. तो–प्रकाश–रश्मीचा होता !

प्रकाश रश्मीचा ! रश्मीचा ! कौमुदीचा नव्हे तर !

हाय ! ही खात्री पटतांच कौमुदीचें हृदय भारी कासावीस झालें !

आणि मग संध्याकाळीं रश्मीच्या शिपायानें २०-२५ गुलाब तिच्या-कडे आणून देतांच तर तिच्या दुःखाची जणूं परिसीमा झाली !

कौमुदीला फुलांची विलक्षण आवड ! त्यांतून असले कळीदार सुंदर गुलाब तर तिला फारच आवडत ! पण आज त्या फुलांना हात लावण्याची तिला इच्छा होईना.

ते सुंदर, पांढरे, पिवळे, लाल गुलाब तसेंच पडून राहिले.

लाल गुलाब लाल ! हूं ! 'My love is like a red, red rose' असें म्हणतात ना ! इंग्लिशमध्यें नि म्हणूनच प्रकाशनें आपल्या प्रीतीचें प्रतीक असें हें लाल गुलाब रश्मीला पाठविले असणार !

लाल--लालभडक गुलाब ! कौमुदीच्या मनांत आलें, प्रकाश रश्मीच्या प्रीतीचे प्रतीक असतील हे लाल गुलाबऽपणऽपण त्याहिपेक्षां आज आपल्या हृदयाला झालेल्या जखमेंतून वहाणाऱ्या अंतस्थ लाल रक्ताचेच प्रतीक आहेत हे !

लाल गुलाब -- लाल रक्त !

ही कल्पना मनांत येतांच कौमुदीनें ते लाल गुलाब उचलून आपल्या हृदयाशीं धरले. त्या आवेगभरांत फुलांचे कांटे तिच्या बोटांना रुपले व तीं सुंदर फुलेंहि कुस्करलीं गेलीं.

पण कौमुदीचे तिकडे लक्षच नव्हतें.

शरीराला खोल जखम झाल्यावेळीं जशी अशक्तता येते तशी किंबहुना त्याहूनहि अधिक अशक्तता कौमुदीला आली होती ! नाहीं तरी शरीराच्या रोगापेक्षां मानसिक रोगच माणसाला अधिक दुबळे करितात !

कौमुदी तशीच किती वेळ बसली असती, कोण जाणे ! पण एका-एकीं तिच्या मनांत आले, " प्रकाश—रश्मीचा वाङ्निश्चय खात्रीनें ठरला असणार. मग त्याबद्दल प्रकाशनें स्वतःच आपल्याला कसें कळविलें नाहीं ! त्यामुळें आपल्याला दुःख होईल म्हणून ? म्हणजे आपल्या सुखदुःखाची प्रकाशला एवढी पर्वा वाटते तर—

आणि गंमत अशी कीं, ह्या विचारानें कौमुदीला दुःखांत किती तरी सुख वाटलें !

सारा भावनांचा खेळ—कल्पनेची कसरत-- नि मनाची मौज दुसरं काय ! कारणांवाचून हंसावयाचे !

प्रणयीजन म्हणजे निव्वळ वेडे ! कारणावांचूनच रडावयाचे ! आणि खरंच, प्रत्येक कार्यामागें कारण असलेंच पाहिजे अशी मीमांसा करणाऱ्या पंडितांना ही जरा विचार करण्यासारखीच बाब नाहीं कां ?

त्याचप्रमाणें अमुक एका कारणामुळें अमुकच कार्य घडतें असें हें कार्य कारण मीमांसावादी सांगतात. पण प्रणयीजन ज्या कारणामुळें आतां रडतील त्याच कारणांमुळें नंतर हंसतील - मग ह्याची मीमांसा काय !

नियमाला पुष्टि आणणारे हे अपवाद आहेत ही पळवाटच ते दाखवितील झालं !



रश्मी—स्वप्न

*

# ११ सत्त्व, रज आणि तम

प्रकाशला, सतिागडला गेल्याला आतां एक आठवडा होऊन गेला. त्याच्याकडून तें पत्र व नंतर रश्मीकडून गुलाब आल्यापासून हल्लीं २-४ दिवस कौमुदीच्या मनांत रश्मीला भेटण्याची कल्पना घोळूं लागली.

प्रकाशसारख्या शहाण्यासुर्त्या व श्रीमंतापासून नेहमीं चार पावलें दूरच रहाणाऱ्या तरुणाला इतकें आकर्षून टाकणारी, त्याच्या बुद्धीचा तोल चुकविणारी ही रश्मी आहे तरी कशी हें पहाण्याची कौमुदीला उत्सुकता वाटूं लागली.

पण पुनः तिच्या मनांत आले, उगीच कशाला त्या फंदांत पडा नि मुद्दाम अपमान करुन घ्या. नकोच तें.

असें उलटसुलट विचार हल्लीं कौमुदीच्या मनांत येत.

रश्मीला पहाणाच्या तिच्या इच्छेमध्यें उत्सुकतेबरोबर तिच्या दुखविलेल्या अभिमानाची प्रबलताहि होती.

आजवर प्रकाश तिचा होता. तेव्हां त्या आपल्या प्रकाशला आपल्याकडून हिरावून नेणारी ही रश्मी आहे तरी कशी तें एकदां पहावें असें वाटे तिला.

रश्मी अत्यंत सुंदर आहे असें कौमुदीनें प्रकाशकडून ऐकलें होतेंच. व

आपण तशी सुंदर मुळींच नाहीं हें तिला ठाऊक होतें. पण त्या बरो-बरच प्रकाशची स्त्रीसौन्दर्याची अभिरुची तिला चांगलीच ठाऊक होती.

पण—पण सूर्यरश्मींनें डोळे दिपल्यावर कौमुदीच्या प्रशांत प्रकाशाची काय किंमत वाटणार !

अंतःकरणाचें हृदयाचें सौंदर्य-प्रकाशला आपण भरपूर दिलें असतें पण त्याला जिथें देहाच्या सौंदर्याबद्दलच आसक्ति वाटत आहे तिथे काय इलाज ! आणि असा विचार मनांत आल्यावेळीं कौमुदी भारी खिन्न होई. या गेल्या २।४ दिवसांत हाच विचार तिच्या मनांत एकसारखा सलत होता.

परंतु पुढल्याच आठवड्यांत प्रकाशकडून एक लांबलचक पत्र आलें व त्यांतील मजकुरामध्यें चित्त अधिक वेधल्यामुळें कौमुदीला स्वतःच्या दुःखाचा जरा विसर पडला.

प्रकाशनें चांगलें चार पानाचें पत्र लिहिलें असून त्यांत प्रामुख्यानें कौमुदीला प्रिय वाटणारी म्हणजे कमलेविषयींचीच हकीकत होती. ती खालील प्रमाणें —

...तुझ्या मैत्रीणीला काल भेटलों. किती सुंदर, निष्पाप दिसते ग ती ! — पाहतां क्षणींच तिच्या विषयीं कळवळा वाटतो !— माधव तर मला रोज भेटतो— त्याच्याकडे मी सर्व गोष्टींचा ऊहापोह केला आहे—इथल्या दिवाणसाहेबांची माझ्यावर बहोत मर्जी बसली आहे. कमलाताईनें चुलत घराण्यांतील मुलाला दत्तक घ्यावे अशीच त्यांची इच्छा आहे. गृहस्थ इतका बोलका आहे व जिथें विश्वास बसेल तिथें तो इतका मनमोकळा बोलतो कीं, गेल्या आठ दिवसाच्या परिचयांत त्यानें मला इथल्या राजकारणाची बित्तबातमी कळविली. शिवाय, मोठ्या सुदैवाची गोष्ट म्हणजे, हे दिवाणसाहेब माझ्या वडिलांना चांगलं ओळखीत असत म्हणे !— व ह्याचमुळें स्वारी माझ्याशीं एवढ्या खेळीमेळीनें वागते. —दत्तकाच्या प्रश्नाबाबत त्यांनीं माझं मतसुद्धां विचारलं. व मोठं मुत्सद्दीपणाचं धोरण स्वीका-रून मी त्यांच्यासारखंच मत दिलं. खरं म्हणजे तुझ्याप्रमाणेंच माझी

सहानुभूतीहि कमलाताईच्या नणंदेच्या मुलाकडेच आहे व इथल्या प्रजेचें बहुमतहि तसेंच आहे. आणि ही दैवाची मोठीच कृपा आहे ! कारण दत्तकाच्या ह्या प्रकरणामध्यें जर दोन तट पडले तरच आपलं कार्य साधतां येईल अशी एक युक्ति मला सुचली आहे ! पण ती अंमलांत आणावयास अद्यापि अवकाश आहे. आणखी तीन महिन्यांनीं व्हाइसरॉय इथें येणार. नंतर दत्तका-संबंधीं ते निर्णय देणार व त्या निर्णयाबरहूकूम दत्तविधान पार पडलं कीं लगेच माझी युक्ति अंमलांत आणावयाची !– संस्थानांतील प्रजेला हवा असणारा वारस व्हॉइसरॉय दत्तक घेऊं देणार नाहीं. राजाचं व प्रजेचं मेतकूट कां जमूं देईल तो ? असो –

दिवाणसाहेबांच्या माझ्यावरील मर्जीचा फायदा घेऊन कमला-ताई, मी व माधव खूप गप्पा मारीत बसतो. हो खरं, तुम्ही आवडती कमलाताई सुकल्यासारखी नि बारीक फिकट दिसते असं म्हणत होतीस ना तूं ? आतां एकदां बघच त्यांना.

कौमुदी, जलसिंचनानें निर्जीव पुष्पं टवटवीत होतात त्याचप्रमाणें प्रेमसिंचनानें मुखपुष्पंही टवटवीत होतात ! हल्ली कमलाताई किती सुंदर व सतेज दिसतात ! बाकी त्यांचं सौंदर्य कांहीं वेगळंच आहे ! त्यामध्यें एकप्रकारची दुर्बलता दिसून येते ! प्रतिकूल परिस्थितीनें त्यांच्या सौंदर्यावर कसलें तरी दडपण ठेवलें असल्याचा भास होतो. ! त्यांचे सौंदर्य एरवी अप्रतिम आहे, तें पाहिल्यानें मनाला केवढा तरी आल्हाद होतो पण कशी हुरहुरही लागते ! त्यांच्या वैधव्यसूचक, फटफटीत कपाळाचा तो परिणाम असेल काय ? तसंच असणार ! बाकी, त्यांचें सौंदर्यसुद्धां कांहीं वेगळ्याच तऱ्हेचं आहे, नाहीं ? –

बरं, आतां हें पत्र, नव्हे वर्तमानपत्र पुरं करितो. तूं कशी आहेस ? तुझ्या मैत्रीणीनें व माझ्या मित्रानें तुला नमस्कार सांगि-

तलें आहेत. ८।१० दिवसांत मी मुंबईला येईन म्हणतो. पत्राचें उत्तर पाठीव हं. ति. काकांना नमस्कार.

तुझा

प्रकाश –

पत्र वाचून कौमुदीच्या भारावलेल्या हृदयाला पुष्कळ हलके वाटलें. जणूं प्रकाश स्वतः भेटल्या बोलल्यागत वाटलें तिला.

आपल्या लाडक्या कमलेच्या सुखसूर्याला उगविण्यापूर्वीच खग्रास ग्रहण लागूं पहात होते तें टाळण्याची युक्ति प्रकाशला सुचली आहे हें ऐकून तिला खूप आनंद झाला. पण, चार दिवस उघाडी होतांच आतां पावसाळा संपला असें वाटून श्रावण महिन्यांत सूर्यानें मोठ्या डौलानें जरा तळपूं लागावें तोंच पुनः पुनः आकाशांत अभ्रें जमावीं व मग एकादी सरच कोसळावी–तसें कमलेविषयींच्या बातमीमुळें कौमुदी आनंदित झाली तोंच पत्राच्या शेवटीं प्रकाशनें ' तुझा प्रकाश ' हे तोडून लिहि-लेले शब्द दिसतांच स्वतःच्या परिस्थितीच्या जाणीवेनें तिचे हृदयाकाश जणूं अभ्राच्छादित झालें व त्यांतच पत्रांतील एका पुनरुच्चारित, विशिष्ट वाक्याची भर पडली– मग काय ! नेत्रावाटें पावसाची सर कोसळावयाला काय अवकाश !

" कमलाताईचें सौंदर्य कांहीं वेगळ्याच तऱ्हेचं आहे नाहीं !"– ह्या प्रकाशच्या पत्रांतील वाक्यानें कौमुदीच्या मनाची चांगलीच पकड घेतली. तें वाक्य वाचून कौमुदीच्या मनांत आले. कमलेचं सौंदर्य कांहीं वेगळेच आहे म्हणजे रश्मीच्या सौंदर्याहून तें वेगळें आहे कमी प्रतीचे आहे. असाच ना अर्थ !–

आणि मौज अशी कीं, कौमुदीनें काढलेला हा अर्थ बराच खरा होता. कमलेला पाहिल्यापासून प्रकाशच्या मनांत तिच्या व रश्मीच्या सौंदर्याची तुलना सुरू झाली होती ! प्रकाशला पूर्वीपासूनच रश्मीचें सौंदर्य अप्रतिम वाटे; पण त्या सौंदर्यांत एकप्रकारचा जळजळीतपणा होता ! व आतां कमलेचें सौंदर्य दृष्टीस पडतांच प्रकाशला वाटले, रश्मीचें सौंदर्य म्हणजे

मूर्तिमंत तामसता — आणि कमलेचें सौंदर्य म्हणजे मूर्तिमंत राजसता !— आणि — कौमुदीला कधीं कल्पनाहि आली नसती-पुढें प्रकाशच्या मनांत आलें, ह्या दोघीएवढी सुंदर नसतांही कौमुदी आपली ती शांत, प्रसन्न चर्या व टपोरे सुंदर डोळे एवढ्या थोड्या सौंदर्यसामुग्रीच्या जोरावरहि, कौमुदी म्हणजे मूर्तिमंत सात्विकता !

कौमुदीचे प्रशांत, सत्वशील सौन्दर्य हें एक टोक व रश्मीचें प्रखर उन्मत्त सौंदर्य हें दुसरें टोक !—

कौमुदी सत्वगुणाची मूर्ति व रश्मि म्हणजे तमोगुणाची मूर्ति ! आणि कमला ही त्या दोन्ही गुणाची थोडी थोडी मिळवणी करून बनविलेले रजोगुणाचें प्रतीक ! कमलेचें सौंदर्य प्रखर असूनहि सौम्य !

पण गंमत ही कीं, पत्रांत त्यानें रश्मीच्या तमोगुणप्रधान सौंदर्याचाहि उल्लेख केला नाहीं किंवा कौमुदीच्या सत्त्वप्रधान सौंदर्याचाहि उल्लेख केला नाहीं तर, ह्या दोन्ही सौंदर्यांचा मध्य असणाऱ्या कमलेच्या सौंदर्याचाच मात्र उल्लेख केला. व तरीहि 'अनुल्लेखेन उल्लेखः' ह्या न्यायानें कौमुदीला प्रकाशनें रश्मीचें सौंदर्य सूचित केल्याचें कळून आले. व त्यामुळें तिच्या हृदयाला झालेल्या जखमेवरची खपली निघून त्यांतून जणूं पुनः रक्त ठिपकूं लागले !

रश्मि — रश्मि — रश्मि ! एकूण प्रकाशला रश्मीखेरीज कांहींच दिसत नाहीं तर असें वाटून कौमुदी व्यथित झाली !

बिचारी कौमुदी ! आपण दिसावयाला सुरेख आहों— आपला वर्ण गोरापान नसतांना, आपले नाक चाफेकळीसारखें नसतांना, किंवा 'एक नूर अदमी तो दसनूर कपडा और हजार नूर नखरा' ह्या न्यायानुसार आपल्या ईश्वरदत्त नीटस रूपाची आपण चक्रव्याजानें कधींहि वाढ करीत नसतांहि आपल्या मुद्रेवर विराजणाऱ्या सौम्य प्रसन्नतेत, आपल्या नीट नेटक्या साधेपणांत व आपल्या काळ्याभोर, टपोऱ्या डोळ्यांत सौंदर्य आहे याची तिला जाणीव नव्हती ! आपण कुरूप नाहीं हें तिला ठाऊक होतें; पण रश्मीच्या नाजुक, नखरेल, श्रीमंती सौंदर्याशीं तुलना होऊं शकण्या-इतकें आपलें सौंदर्य मधुर आहे असें मात्र तिच्या मनांतहि आलें नाहीं !

व त्याचमुळें आतां प्रकाशानें पत्रामध्यें रश्मीचें अतुलनीय सौंदर्य ध्वनित केलें आहे असें वाटतांच तिच्या मनांत आले, जिथें फक्त बाह्य व कृत्रिम सौंदर्यावरच प्रकाशाची नजर खिळून रहातें आहे तिथें आपल्या हृदयांतील सौंदर्याची — प्रकाशावरील आपल्या निःसीम प्रीतीची — त्याला काय जाणीव होणार ?—

आणि कौमुदीला असे वाटणें साहजिकच होतें. कारण रश्मीचें सौंदर्य व कमलेचें सौंदर्य असे दैदीप्यमान सौंदर्याचे दोन वेगवेगळे नमुने पाहिल्यामुळें अतिप्रकाशानें होतो तसा त्रास आपल्या डोळ्यांना झाला आहे व त्यामुळे कौमुदीचें शीतल, सौम्य, घरगुती सौंदर्य आपल्याला खरें सुंदर वाटतें आहे हें जर अद्यापि प्रकाशला स्वतःलाच नीटसें समजलें नव्हतें व म्हणूनच तो तें जर उघड लिहूं शकत नव्हता तर कौमुदीला तरी तें कसें समजणार !—

मानव प्राण्यांना वाटतें, आपण केवढे हुषार ! रूळावरून चालणाऱ्या आगगाडीचा आपण शोध लाविला, पाण्यांतून जाणाऱ्या मोठमोठ्या आगबोटी आपण निर्माण केल्या, रूळाशिवाय चालणाऱ्या मोटारी आपण बनविल्या व स्वैराकाशांतून उडणारीं विमानें तयार केलीं पण त्यांच्या अंगीं एवढी हुषारी असूनहि मानवी मनोरचनेचा शोध कांहीं त्यांना लावितां येत नाहीं अं !—

बाकी मनुष्यप्राण्यांना हा शोध लावितां येत नाहीं हें त्यांच्या विद्वत्तेला ईश्वरानें लाविलेले गालबोट आहे; मनुष्यप्राण्यानें आपणाहून वरचढ होऊं नये म्हणून ईश्वरानें दिलेला हा शाप आहे असें जर म्हणावयाचे झाले तर ईश्वरानें हा शाप आशीर्वादवजा दिला आहे असेंच म्हणावे लागेल !

कारण मनुष्यप्राणी स्वभावतःच नावीन्याचा भुकेला आहे. व मानवी मनोरचना जर त्याला उत्तम अवगत झाली तर मग आयुष्यांत नावीन्य उरणार कुठें !

बीजगणितांतील ठराविक आडाख्यांप्रमाणें मानवी मनोरचनेच्या गुंता-गुंतीविषयींचे ठराविक आडाखे रचून माणसें मोकळीं होतील, व सारा निव्वळ हिशेबी, गणिती कारभार होईल !

मानवीजीवन जर असें कायम ठरलेल्या गणितविषयासारखें झालें तर आटोपलेच ! सावंतवाडीच्या लांकडी, रंगीत फळाइतकेंच स्वारस्य मग मानवीजीवनांत आढळेल !—

सदोदित नवनवीन ललितकृति निर्माण करणाऱ्या भाषाविषयासारखें मानवीजीवन नावीन्यपूर्ण व बदलतें असले तरच त्यांत मानवप्राणी रमतील ! नि मानवप्राण्यांना तें असें वाटावें म्हणूनच ईश्वरानें त्याची दुधारी मानवी मनोरचनेच्या ज्ञानापर्यंत मर्यादित केली आहे !

व म्हणूनच क्षणांत दुःख तर क्षणांत सुख, आतां निराशा तर घटका भरानें आशा असें चमत्कृतीपूर्ण हें जीवन बनूं शकतें. नि म्हणूनच कौमुदी-सारखी निरभिमानी, अतिविनयी माणसेंहि दिवस काढतात !

नाहीं तर काय ! त्या जगामध्यें मृत्यूला फक्त एकच घटना कारणीभूत झाली असती. व ती म्हणजे आत्महत्या !

# १२ प्रकाशाची भद्रेश्वर दीक्षिती!

ठरल्याप्रमाणें १५।२० दिवसांनीं प्रकाश सीतागडहून परत आला. त्याचा रश्मीशीं नक्की विवाह ठरला आहे हें कौमुदीला आतां कळलें असल्यामुळें तो आल्यावर त्याच्याकडे आपण पूर्वीप्रमाणें बोलूं, बसूं शकणार नाहीं असें तिला वाटत होते.पण प्रकाश प्रत्यक्ष आल्यावर तिला ह्याच्या अगदीं उलट अनुभव आला.

सकाळीं ८ च्या सुमाराला तो घरीं आल्यामुळें त्यावेळीं कौमुदी घरींच होती. स्वयंपाकघरांत चुलीची आराधना करण्यांत ती गुंतली होती. व नेहमींच्या संवयीप्रमाणें प्रकाश तिला शोधीत सरळ तिथें आला.व त्याची ही नेहमींसारखी ऐसपैस वागणूक पाहून कौमुदीची भीड आपोआप मावळली व तिनें प्रकाशला मोकळेपणानें कमलच्या खुशालीविषयीं प्रश्न केला.

त्यासरशीं खूप हंसत प्रकाश उत्तरला,"तुझ्या कमलची खुशाली विचारतेस काय ! काय सांगूं ! तूं तिला प्रत्यक्ष पाहिल्याशिवाय नाहीं तें कळणार. अग, वयानें ती बावीस वर्षांची आहे ना—पण हल्लीं एकाद्या १६।१७ वर्षांच्या मुलीसारखी ती अल्लड, आनंदी दिसूं लागली आहे. नि हृदयांत उमळणारा हा आनंद जरा ताब्यांत ठेवण्याबद्दल तिला बजावावं लागलं मला. नि तसाच तो माधव."

" पण प्रकाश, कमलला इतका आनंद कशामुळें झाला आहे तें कुठें तूं मला सांगितलंस ?"

" सांगतो ना. पण आधीं चहा हवा बुवा."

" वा: ! म्हणजे गोड बातमी सांगण्याआधींच गोड चहा लाटणार होय तूं ?"

" मग — मग – तसंच म्हटलं तर दोन पेले चहा लागेल मला."

" दोन पेले ? तो कसा बाई ?" हा प्रश्न विचारतेवेळींच त्याच्या उत्तराची कल्पना आल्यामुळें कौमुदीने कंपित स्वरांत विचारलें.व प्रकाशला उत्तर द्यावयाला अवसर न देण्याच्या इच्छेनें ती मुद्दाम विषयाला कलाटणी देत म्हणाली, " नि खरंच प्रकाश,तिथल्या दिवाणसाहेबांची इतकी बहोत मर्जी तूं कशी रे संपादन केलीस ?"

" अग, पक्का संस्थानी नोकर बनलों झालं. संस्थानी नोकराच्या धोरणानुसार दिवाणसाहेबांच्या होस हो करीत होतो सारखं. आजकालचे शिकलेले तरुण उद्धट, अहंमन्य व स्वतंत्रवृत्तीचे असतात असं मत होतं त्यांचं. पण माझ्या असल्या वागण्यानें मीं तें पार बदलून टाकलं. नि त्यामुळें ते माझ्यावर फार खूष होते मग."

" अस्सं होय ? वा: ! अशी हांजी हांजी करण्याची वृत्ति तुझ्यामध्यें असेल असं नव्हतं मला वाटलं."

" हांजी हांजी करण्याची वृत्ति माझ्यामध्यें खरोखर आहे होय ? अग, नाटकांत, सिनेमांत नाहीं कां कोणतीहि भूमिका करावी लागत ? त्यांतलाच भाग हा !" प्रकाश आर्जवून म्हणाला.

व तें पाहून कौमुदी हंसून उत्तरली, " अरे हें काय तूं मला सांगायला हवं ? उगीच चेष्टा केली मीं. पण खरंच प्रकाश, कमलेच्या सुखाची पूर्तता करण्यासाठीं कोणती युक्ति योजणार आहेस तूं ? ती ऐकावयाला मीं फार उत्सुक झालें आहे."

" अं हं, इतक्यांत नाहीं. एवढा चहा पिऊं दे कीं मला आधीं."

आणि चहाबद्दलचा पुनः हा उल्लेख ऐकून कौमुदीचें हृदय पुनः थरारलें. मग प्रकाशनें दुसऱ्या आनंदाच्या बातमीसाठीं चहाच्या दुसऱ्या पेल्याची

मागणी केल्यावेळीं ती आनंदाची बातमी म्हणजे त्याचा व रश्मीचा वाङ्-निश्चय हें कौमुदीनें ओळखलें असल्यामुळें शक्य तोंवर त्या बातमीचा उल्लेख टाळावा असेंच तिला वाटत होतें. पण पुनः पुनः मुद्दाम विषयांतर करणें वाईट दिसेल हेंहि कळत असल्यामुळें ती गप्प बसली.

व मग चहा पिऊन होताच प्रकाशनें जेव्हां सगळ तिच्या मघांच्या प्रश्नाचें उत्तर दिलें तेव्हां तिला केवढें दुःख वाटलें ! हं ! संकटाप्रमाणें संकटाच्या नुसत्या नामोच्चाराचेंहि माणसाला इतकें भय वाटतें ! प्रकाशनें रश्मीबरोबर विवाह ठरविला असणार अशी शंका कौमुदीला आली होतीच, किंबहुना, त्याबद्दल तिची खात्रीच होती. पण तरीसुद्धां त्या घटनेचा उच्चारहि तिला अप्रिय वाटत होता. व त्याचमुळें प्रकाशनें तो उच्चार आतांतरी निदान टाळला हें पहातांच त्याचें भाषण ती मोठ्या उत्सुकतेनें ऐकूं लागली.

प्रकाशहि खूप आवडीनें बोलत होता. "बरं कां कौमुदी," तो म्हणाला, "दिवाणसाहेबाप्रमाणें व्हाइसरॉयचें मतहि चुलत घराण्यांतील दत्तकाच्याच बाजूचें आहे. व प्रजेचें बहुमत ह्याच्या उलट असल्यामुळें, एक दिवस बोलतां बोलतां मी दिवाणसाहेबांना अशी सूचना केली कीं, चुलत घराण्यांतील मुलाला दत्तक घेतल्यानें साहजिकच प्रजा जरा प्रक्षुब्ध होईल व त्यांत कमलाताईंचें मुळींच अंग नसतांहि प्रजेचा त्यांच्यावर आपल्या राणीसाहेबांवर राग होईल. त्याकरितां दत्तविधान आटोपल्याबरोबर राणी-साहेबांना कुठेंतरी तीर्थाटनाला थोडे दिवस पाठवावें. आणि कौमुदी, माझी ही सूचना दिवाणसाहेबांना अगदीं सोळा आणे पटली."

"पण प्रकाश, कमलला तीर्थाटनाला पाठविल्यानें काय फायदा होणार ?

"अग, खऱ्याखुऱ्या तीर्थाटनासाठीं कां त्यांना सीतागडच्या बाहेर काढावयाचें आहे ? बघ, दत्तविधानाच्या सुमारालाच व्हाइसरॉयच्या हस्तें नव्या वाड्याचा उद्‌घाटन समारंभ व्हावयाचा आहे. तेव्हां त्यावेळीं मी तिथें हजर असणारच. व समारंभाची मौज पहावयासाठीं म्हणून कमला-ताईंच्या आमंत्रणानें तूंहि तिथें ये. मग आपण दोघे व माधव मिळून कमलाताईंना तीर्थाटनाला नेऊं. अगदीं सर्वांत पवित्र अशा विवाहक्षेत्रांत

त्यांना नेऊन सोडूं या; बरोबर एक दोघी दासी व नौकर असले तरी त्यांना गुंगारा दणं कांहीं कठिण नाहीं. बस्स ! काय समजलीस ! ही अशी आहे ह्या आधुनिक भद्रेश्वर दीक्षिताची युक्ति ! पूर्वीचा तो भद्रेश्वर लग्न जमवीत असे नि आतांचा हा भद्रेश्वर जमलेलों लग्न निर्विघ्नपणं पार पाडतो. म्हणजे माधव-कमलेच्या विवाहाची पत्रिका जर काढावयाची असती तर नेहमींच्या ठरीव निर्विघ्न कार्यसाफल्याबद्दलच्या मजकुराऐवजीं 'कार्य सिद्धीस नेण्यास प्रकाश उर्फ आधुनिक भद्रेश्वर दीक्षित समर्थ आहे' असा मजकूर छान जुळला असता ! – काय ?"

प्रकाशच्या ह्या विनोदावर तो व कौमुदी खूप हंसली. पण मग हंसें थांबवीत कौमुदी काळजीच्या स्वरांत म्हणाली, "पण ह्या लग्नाची बातमी दिवाणसाहेबांच्या नि सीतागडच्या प्रजेच्या कानांवर गेली तर रे प्रकाश ?"

"उं–अग, अस्मादिकांनीं त्याबद्दलहि सारा विचार केला आहे. कुठल्या तरी भलत्याच गांवांहून दिवाणसाहेबांना कमलाताई अत्यवस्थ आजारी झाल्याच्या व मग हृदयक्रिया बंद पडून एकाएकीं वारल्याच्या तारा ठोकाव्या कीं झालं !"

"हो, आणि हें दिवाणसाहेबांना खरं वाटेल ? त्याबद्दल अधिकउणी चौकशी नाहीं करणार ते ?"

"कौमुदी, दिवाणसाहेब फार धूर्त व उत्तम मुत्सद्दी आहेत. त्यांना हवा असणारा वारस कमलाताईनें दत्तक घेतला कीं त्याचं काम संपलं ! मग त्या दत्तकविधानामुळं प्रजेला अप्रिय झालेल्या राणीची मृत्यूवार्ता ऐकून त्यांना बरंच वाटेल ! ते त्या बाबतींत अधिक खोलांत शिरणार नाहींत. शिवाय राणीसाहेबांच्या अस्थि मीं स्वतः सीतागडला पोंचत्या करीन कीं."

"राणीसाहेबांच्या – कमलच्या अस्थि ?"

"अग, कुणातरी स्त्रीच्या अस्थि झालं ? बाकी कमलाताईच्या अस्थि म्हटलं तरी कुठं चुकलं ! त्या त्यांच्या राणीपदाच्या अस्थिच नव्हेत काय ? म्हणजे एकंदरींत त्यांच्याच नव्हेत कां ! फरक इतकाच कीं, जिवंतपणींच्या त्यांच्या त्या अस्थि ! – खरंच, राजपुत्र असूनहि रासेलस सुखाच्या शोधार्थ कां भटकत होता हें मला आतां बरोबर कळलं, राज्य, वैभव, ऐश्वर्य हे

शब्द दिसावयाला मोहक असले तरी खऱ्या सुखाची आस लागलेल्या माणसांना त्यांचा मोह पडत नसतो, हेंच खरं! कमलाताई राणी आहेत, राज्याचा वारस दत्तक घेतल्यावर त्या राजमाता होतील. पण ह्या दोन्ही पदांपेक्षां त्यांना माधवाचें पत्नीपद अधिक आकर्षक वाटलें! माधव बेटा भाग्यवान् खरा! राणीचा नवरा होणार अं तो! शिवाय, कमलेसारखी सुंदर, सद्गुणी, प्रेमळ राणी! आपल्याला त्याचा हेवा वाटतो बुवा!"

शेवटलें वाक्य प्रकाशनें हंसत हंसत उच्चारलें तरी तो तें निव्वळ थट्टे-दाखल बोलला नाहीं हें कौमुदीनें त्याच्या स्वरांतील अस्पष्ट खिन्नतेवरून ओळखलें.

मग काय? प्रकाशला खरोखरीच माधवरावाचा हेवा वाटतो? नि तो कां? त्याचें रश्मीवर प्रेम आहे ना? तिच्याशीं त्याचा विवाहहि ठरला असणार ना? मग स्वतःचा प्रेमविवाह ठरला असूनहि प्रकाशचें हृदय तृप्त नाहीं? ही हेव्यादाव्याची भावना त्याच्या मनाला कां शिवावी? —

कदाचित् रश्मि कमलहूनहि सुंदर असेल. कमलनें राणीपदाचा त्याग केल्यावर श्रीमंत रश्मीच्या मानानें ती अगदींच दरिद्री ठरेल! पण तरीहि सुंदर, श्रीमंत रश्मीबरोबर प्रकाशचा विवाह ठरला आहे हें कळतांच, तिच्या मानानें कमी सुंदर व कमी श्रीमंत असलेल्या कमलेच्या हृदयांतील अमोल धनदौलतीचा संपूर्ण लाभ मिळविलेल्या माधवरावाला क्षणभर तरी प्रकाशचा —प्रकाशच्या थोर भाग्याचा हेवा वाटेल काय? कधींहि नाहीं! माधव-रावाच्या दृष्टीनें जगांतील सारें सौंदर्य, सारी श्रीमंती, सारे सद्गुण कमलेच्या प्रीतींत सांडलें आहे! —

आणि माधवरावाचीच नव्हे तर जगांतील प्रत्येक प्रियकराची आपल्या प्रणयिनीविषयीं अशीच भावना असते! — मग प्रकाशची भावनाच अशी मुलखावेगळी कशी?

मनासारखं जेवण नुकतंच पोटभर जेवलेल्या माणसाची लगेच अन्नावर वांछा जाईल कां कधीं? — मग—मग काय? प्रकाशला मनासारखं जेवण मिळालेलं नाहीं किंवा पोटभर तरी मिळालेलं नाहीं! —

म्हणजे आपला तर्कच खरा तर? प्रकाशची रश्मीवर विशुद्ध, हा प्रीति

नसून तिच्या सौंदर्याविषयीं त्याला निश्चळ आकर्षण वाटतें आहे! पण प्रकाशच्या मोहाकुल हृदयाला त्याची बुद्धि जोंवर मार्ग दाखवूं शकणार नाहीं तोंवर हें आकर्षण दूर व्हावयाचें कसें? —

कौमुदीच्या मनांत ह्याच विचारानें सारखा थैमान घालूं लागला. त्यामुळें प्रकाशच्या त्या लांबलचक भाषणावर ती कांहींच बोलली नाहीं.

मग प्रकाशच तिला म्हणाला, "असं काय कौमुदी! कां बोलत नाहींस तूं! माझ्या भद्रेश्वर दीक्षितीच्या ह्या नवीन धंद्याबद्दल माझं अभिनंदन नाहीं तें केलंस? तुझ्या लाडक्या कमलचं इच्छित आतां पुरं होणार ह्या कल्पनेनें तुला केवढा तरी आनंद झाला पाहिजे वास्तविक."

"मग! झालाच आहे मला आनंद! किती, किती आनंद झाला आहे पण! बघ प्रकाश, माझं तें कोमल फूल सुकून गेलं असतं, अकालीं गळून पडलं असतं. पण त्याचं तें अकालीं पतन तूं वाचविलंस किंवा वांच-विणार मग मला आनंद झाल्यावांचून कसा राहील?"

"मग तो आनंद कुठें व्यक्त नाहीं तो केलास म्हणतो! मी अं!—बरं कौमुदी, तुला मी आतां एक दुसरी गोड बातमी सांगतों हं —"

"आता? आतां नको प्रकाश. मला शाळा आहे ना आज — उशीर होईल ना? मग — मग — मी आल्यानंतर सांग तूं —" अगदीं बारीक आवाजांत कौमुदी पुटपुटली व तिथून उठलीच ती.

हं! — किती खुळेपणा हा! दुःख, संकट व आजार असें कुठें टाळूं म्हटल्यानें हमखास टाळतां कां येतात? पण कौमुदीला तरी हें समजत कां नव्हतें? परंतु तितकेंच आजचें मरण ती उद्यांवर ढकलूं पहात होती एवढेंच! —

एरवीं अगदीं कार्यतत्पर, वक्तशीर असणाऱ्या माणसानासुद्धां दुःखदायक घटनेच्या बाबतींत चालढकली दिरंगाई करण्याचा मोह पडतोच! मनुष्य स्वभावांतील तें एक नैसर्गिक दौर्बल्य आहे झालं!

# १३ कडु 'गोड' बातमी !

प्रकाश सांगणार होता ती दुसरी गोड बातमी ऐकण्याचें आपण सकाळीं टाळलें तरी संध्याकाळीं आपल्याला ती ऐकावी लागणार अशी कौमुदीची खात्री होती व म्हणून संध्याकाळीं शाळेंतून ती जरा उशीराच घरीं आली.

गड्याकडे चौकशी करितां प्रकाश घरीं नसल्याचें तिला कळलें. त्याबरोबर घाईघाईनें जेवण करून तिनें वडिलांना वाढलें व आपण कसेंबसें चार घांस खाऊन ती झांकापांक उरकूं लागली. आतां आठ वाजले होते व कौमुदीचा विचार असा होता कीं, प्रकाश घरीं येण्याच्या आंत आपल्या खोलींतला दिवा मालवून झोंपण्याची जय्यत तयारी करावयाची.

पण तिची झांकापाक सुरूं असतांच बाहेरच्या दाराची कडी खडखडली. कडी वाजवितांना झालेल्या एका विशिष्ट आवाजावरून कौमुदीनें ओळखलें कीं प्रकाश आला; नि खरोखरच प्रकाश तिथें प्राप्त झाला.

मोरींत हात धुतां धुतां कौमुदीनें हळूंच त्याच्याकडे पाहिलें. पण त्याच्या मुद्रेवरून तिला कांहींच बोध होईना.

त्याची मुद्रा आनंदी तर दिसत नव्हतीच. पण नेहमींचा हंसरेपणाही आज त्याच्या मुखावर नव्हता तर उलट तो कांहींसा गंभीरच दिसत होता.

कौमुदीची व त्याची दृष्टादृष्ट होतांच मात्र त्याच्या चर्येवर स्मितरेखा प्रकटली व तो म्हणाला, " काय कौमुदी, जेवणं आटोपलीं वाटतं ? "

" कां ? जेवणार आहेस तूं ? वाढूं तुला ? "

" अंहं. आज मला जेवणाची इच्छा नाहीं. माझं पोट भरलं आहे. "

प्रकाशच्या ह्या उत्तरावर कौमुदीनें नुसता हुंकार दिला. मागें एकदां प्रकाशनें असाच जेवणावर राग काढल्या वेळीं कौमुदीनें त्याला किती ममतेनें जेऊं घातलें होतें. पण त्यावेळीं प्रकाश तिचा होता. निदान सर्वस्वीं रश्मीच्या आहारीं तो गेलेला नव्हता. पण आज तो सर्वस्वीं रश्मीचा होता.

कौमुदीनें मोठ्यांदा श्वास घेतला. आपण टाळीत होतो ती वेळ आली हें ओळखल्यामुळें कांहीं न बोलतां ती भिंतीला टेंकून उभी राहिली.

पण प्रकाशहि पुढें कांहीं बोलेना.

ही स्तब्धता कौमुदीला अगदीं असह्य झाली. व बाहेरील गॅलरींत तात्या बसले होते तिथें ती निघाली.

त्यासरशीं प्रकाश म्हणाला, " कौमुदी, तूं बोलत कां नाहींस ? "

" काय बोलूं ? "

" अं— अं—माझं—माझं अभिनंदन कर ना. " प्रकाश अडखळत अडखळत उत्तरला. आज बोलतांना आपली जीभ अशी अडखळते कां हें त्याला कळेना. पण आपली ती 'गोड' बातमी कौमुदीला कळवितांना आपण असें चांचरणें म्हणजे रश्मीचा अपमान करणें आहे असें त्याच्या सरळ मनाला वाटलें व त्यामुळें जीवाचा घडा करून तो एका सपाट्यांत बोलला, " कौमुदी, माझं अभिनंदन करणार ना तूं ? "

" अभिनंदन ? तें कशासाठीं ? " वस्तुस्थितीची कल्पना आली असूनहि कौमुदीनें हा प्रश्न केला.

" कशासाठीं म्हणजे ? कौमुदी, रश्मीशीं माझा विवाह ठरला. "

" अस्सं ! कधीं ठरला ? " कौमुदीनें अगदीं शांतपणें प्रश्न केला. व अशा प्रसंगीं, प्रकाशची ती कडु 'गोड' बातमी ऐकूनहि आपला स्वर इतका शांत येऊं शकला ह्याबद्दल तिचें तिलाच आश्चर्य वाटलें.

प्रकाश मात्र सध्यां असलें आश्चर्य किंवा इतर कोणती भावना अनुभ-

विण्याच्या स्थितीत नव्हता. कधीं एकदां कौमुदीला ती बातमी सांगून टाकण्याच्या दिव्यांतून पार होईन असें झाल्यामुळें मधांच्याच निर्जीव आवाजांत तो म्हणाला, "विवाह ठरल्याला झाले १५–२० दिवस. पण तिच्या वडिलांनीं आज वाङ्‌निश्चय जाहीर केला त्यांच्या मित्रमंडळींत."

"हं आणि लग्न कधीं?" मधांच्याच संथ स्वरांत कौमुदीनें विचारलें.

अंतःकरणाला अति ताण पडल्या वेळीं भावना पूर्ण निष्क्रिय बनतात कीं काय कोण जाणे! कौमुदीचें हृदय आंत विव्हळत असून ती प्रकाशशीं बाह्यतः तरी निर्विकारपणें बोलूं शकत होती. एवढेंच नव्हे तर तिनें वर मान करून आतां प्रकाशच्या चेहऱ्याकडे सुद्धां पाहिलें.

पण त्याच्या चेहऱ्यावर संपूर्ण आनंदाऐवजीं गोंधळ व अस्थिर चंचलता दिसून आल्यामुळें कौमुदीला कसें तरीच वाटलें. तिचें प्रकाशवर निरतिशय प्रेम होतें! मातृपितृप्रेम व भावंडांची ममता ह्या दोन्ही नैसर्गिक देणग्यांना तो लहानपणींच पारखा झाल्यामुळें पत्नीप्रेम तरी त्याला भरपूर मिळावें अशी तिची अगदीं अंतःकरणापासून इच्छा होती.

प्रकाशचें आपल्यावर प्रेम नाहीं म्हणून तिला खेद वाटला तरी रश्मीच्या सहवासांत त्यानें पूर्ण सुखी व्हावें असेंच तिला वाटलें व त्यामुळें तरुण प्रेमीजनाच्या चर्येवर उसळणारा उल्हासानंद आतां प्रकाशच्या चर्येवर आढळून न आल्याकारणानें तिच्या प्रेमळ हृदयाला खंत वाटली!

रश्मीबरोबर, लाडावलेल्या गर्भश्रीमंत रश्मीबरोबर प्रकाशनें विवाह ठरविला ही मोठीच चूक झाली असें कौमुदी मानीत असली तरी प्रकाशला जर ती खरोखरीच चुकी वाटत नसेल तर त्याचें हें अज्ञान शेवटपर्यंत कायम रहावें व त्यायोगें त्यानें सुखी व्हावें असेंच ती इच्छित होती.

व म्हणून आतां प्रकाशच्या चर्येवर असा अज्ञानजन्य आनंद विहरतांना न दिसल्यामुळें ती भ्याली.

मनुष्याला आपल्या कृतीबद्दल जर आत्मविश्वास वाटत नसला तर अशा कृतीपासून त्याला कधींच समाधान लाभत नसतें हें कौमुदीला ठाऊक होतें. व रश्मीशीं विवाह ठरविल्यानें प्रकाशला खरोखुर समाधान लाभलेलें दिसत नाहीं हें पाहून प्रकाशनें हा विवाह आत्मविश्वासाच्या अभावींच ठरविला हें

तिनें ओळखलें. हृदयाला बुद्धीचा पाठिंबा न देतां प्रकाशनें ही जबाबदारी स्वीकारली हें तिला कळून चुकलें !—

तारुण्यांत खळखळणाऱ्या हृदयाच्या एका उसळीला बळी पडून त्यानें हा विवाह ठरविला— ह्या विवाहाच्या बाबतींत त्याचें हृदय व त्याची बुद्धि ह्या दोहोंमध्यें अद्यापि रस्सीखेंच सुरू आहे व ह्याचा परिणाम म्हणूनच प्रकाशच्या चर्येवर अशी अस्वस्थता, असा गोंधळ व असें असमाधान दिसत आहे.—

आणि हा विचार मनांत येतांच कौमुदीला पटला. तारुण्यसुलभ उतावीळपणानें मोहांध होऊन प्रकाशनें हा विवाह ठरविला हें तर तिनें पुरें ओळखलें. पण—आतां ह्याचा परिणाम काय होणार !

हं !—हळव्या वृत्तीच्या प्रकाशला ह्यापायीं खास दुःख भोगावें लागणार ह्या कल्पनेनें कौमुदी इतकी व्यथित झाली कीं आपल्या इच्छाशक्तीचा उपयोग करून तरी प्रकाशच्या नशिबीचें हें दुःख टाळावें असें वाटून सहज स्फूर्तीनें प्रकाशच्या जवळ येत ती अगदीं अंतःकरणाच्या तळमळीनें म्हणाली, " प्रकाश, प्रकाश, ह्या विवाहानें तूं पूर्ण सुखी व्हावास अशी मी मनापासून इच्छा करते हं— "

आणि तिचे हे शब्द ऐकतांच प्रकाश केवढ्यानें दचकला. स्तिमित होऊन तो ऐकतच राहिला.

काय ? रश्मीशीं विवाह करून आपण सुखी व्हावें अशी कौमुदी इच्छा करते ?—

मग—मग—त्या दिवशीं आपल्याला शंका आली ती खोटी ?—

छेः !—

मग ?—कौमुदीचे आतांचे शब्द खोटे ?—

अंहं !—तें शक्यच नाहीं !

प्रेमळ, सत्त्वशील कौमुदी, खोटी अंतःकरणाला न पटणारी गोष्ट तोंडावाटे कधींच काढणार नाहीं.

मग ?—

प्रकाशनें कौमुदीच्या चर्येकडे टक लावून पाहिलें.

प्रकाशच्या सुखाविषयीं तिच्या हृदयाला वाटणारी तळमळ तिच्या मुखावर किती स्पष्ट उमटली होती!—

आणि तिचे डोळे! —

हं!— प्रकाशला आतां उलगडा झाला.

कौमुदीच्या त्या सुंदर, तेजस्वी डोळ्यांत प्रकाशविषयीं तिला वाटणारी गाढ प्रीति किती हुबेहूब उमटली होती! नि ह्या गाढ प्रीतीमुळें कौमुदी आपलें शुभ चिंतीत होती!

होय!—स्वतःला दुःख झालें तरी त्या दुःखाची ओझरती झळहि प्रकाशला लागूं नये असें तिला मनापासून वाटत होतें!—

अहा! केवढी ही निःस्वार्थी दिव्य प्रीति!— नाहींतर— नाहींतर रश्मीचें तें नाटकी, उथळ प्रेम! —

त्या क्षणीं प्रकाशच्या मनांत आलें, असेंच धांवत कौमुदीजवळ जावें, लहान मुलासारखें तिच्या मांडीवर डोकें टेंकून झोंपावें नि म्हणावें, "मीं रश्मीबरोबर नाहीं लग्न करीत—तूं अशी व्यथित होऊं नकोस. मीं तुझा आहे नि तूं माझी आहेस."

पण प्रकाशला त्याच्या बुद्धीनें दिलेला हा सुंदर सल्ला त्याच्या प्रणयाकृष्ट पण प्रामाणिक हृदयाला पटला नाहीं.

रश्मीला त्यानें आपला शब्द दिला होता!— तो कसा मोडावयाचा?

हं! तो क्षण निघून गेला.

प्रकाशच्या बुद्धीवर त्याच्या प्रणयांध हृदयानें पुनः एकवार विजय मिळविला. व हा विजय कायम ठेवणें आपलें कर्तव्य आहे अशा प्रामाणिकपणाच्या समजुतीला बळी पडून "बरं, जातों हं मीं" ह्या तुटक शब्दांत कौमुदीचा निरोप घेऊन प्रकाश आपल्या खोलींत झटकला.

# १४ मनःस्थितीची अदलाबदल

प्रकाशच्या त्या कडु ' गोड ' बातमीचा त्याच्या तोंडून प्रत्यक्ष उच्चार होईपर्यंत कौमुदीला भारी अवघड वाटत होतें. ती बातमी कानांवर येण्याचें टाळण्यासाठीं तिनें किती खुळसट प्रयत्न आधीं केले. परंतु प्रकाशनें एकदांची ती सांगून टाकल्यावर कौमुदीला जरी खेद झाला, तिचें हृदय जरी जड झालें, तरी तिची मनःस्थिती कांहीशी हलकी झाली !

प्रकाशच्या प्रेमाची प्राप्ति आपल्याला होणें शक्य नाहीं हें आतां नक्की कळल्यावर तिनें आपलें कर्तव्य ठरवून टाकलें. आपलें सुख आपल्याला दुरावलें तरी प्रकाश पूर्णपणें सुखी व्हावा म्हणून शक्यतों प्रयत्न करावयाचा असें तिनें ठरविलें व ह्या निश्चयामुळें गेले २–४ दिवस तिच्या मनःस्थिती-मध्यें आलेला चोरटेपणा नाहींसा झाला.

परंतु आतां प्रकाशला चोरासारखे वाटूं लागलें ! रश्मीबरोबर विवाह ठरविण्यांत आपलें चुकलें तर नाहीं ना असें त्याच्या मनांत मधूनमधून येऊं लागलें व त्यामुळें तर तो अस्वस्थ झालाच. पण आजवर हरेक गोष्ट तो कौमुदीला सांगत असे, आपल्या प्रत्येक अडीअडचणींचा तो तिच्याशीं ऊहापोह करीत असे नि आतां आपल्या मनांत उद्भवलेल्या ह्या जंगी घोटाळ्याविषयीं कौमुदीकडे चर्चा करण्याची सोय उरली नाहीं हें कळत असल्यामुळें तर तो अतिशयच अस्वस्थ झाला.

मिळून सध्यां कौमुदीच्या व त्याच्या मनःस्थितीची अदलाबदल झाली होती. गेले २।४ दिवस कौमुदीच्या मनःस्थितीमध्यें आलेला खोरटेपणा आतां प्रकाशच्या मनःस्थितींत दिसून येत होता !

कौमुदीकडे तो रश्मीविषयीं तर कांहीं बोलूं शकत नव्हताच पण तिच्याकडे इतर कांहिं बोलणें सुद्धां त्याला भारी अवघड वाटूं लागलें !

तिचें आपल्यावर दृढप्रेम असल्याबद्दल त्याची खात्री झाल्यामुळें रश्मी-बरोबर आपण विवाह ठरविला हा आपल्या हातून तिचा अपराध घडला अशी टोंचणी त्याच्या मनाला लागली होती.

त्यामुळें तिच्याकडे सतत बोलत बसण्याची संवय झालेल्या त्याच्या बोलक्या स्वभावाला तर हें फारच त्रासदायक वाटूं लागलें !

बरं, रश्मीकडे गेल्यानें तिच्याशीं हंसल्या बोलल्यानें आपल्या अंतः-करणावरील हा भार कमी होईल हीहि त्याला आशा नव्हती !

तो रश्मीकडे रोज संध्याकाळीं नियमानें जात असे. पण त्या जाण्या-पासून त्याला खरी आनंद वाटत नव्हता !

प्रियकर व त्याची प्रणयिनी ह्या दोघांमधील प्रेमसंबंध मधुकर व कम-लिनी ह्यांच्यामधील नाजूक बंधनासारखा असलाच तरच त्यांत खरी मौज !

पण प्रकाश व रश्मि ह्यांचा प्रेमसंबंध पतंग व दीपज्वाला ह्यासारखा होता.

कमलिनी आपल्या नाजूक पाश्‍ळ्यामध्यें बलवान मधुकराला बंदिवान करून ठेवूं शकते तशी रश्मी प्रकाशला बंदिवान करूं शकत नव्हती !

दीपज्वालेचें आकर्षण वाटून तिच्यावर झडप घालणाऱ्या पतंगाप्रमाणें प्रकाश रश्मीच्या सौंदर्यानें आकर्षित होऊन तिचा दास बनला होता.

प्रेमाच्या नाजूक धाग्यादोऱ्यांऐवजीं इथें मोहाकर्षणाचे जाड, राठ दोरखंडच दिसून येत होते.

प्रत्येक दिवशीं रश्मीकडे गेल्या वेळीं प्रकाशला समाधान न वाटतां असमाधानच वाटे !

तो गेल्यावेळीं रश्मी नखशिखान्त नटून सजून त्याची वाट पहात तयार असे ! पण ह्या शृंगारसज्जेंतत प्रकाशविषयींच्या प्रेमापेक्षां आपल्या वडिलांच्या श्रीमंतीच्या प्रदर्शनाचीच ओढ अधिक असे.

त्याचप्रमाणें तिच्या भाषणांतहि खूप आढ्यता दिसून येई. कौमुदीला आपल्या वाङ्‌निश्चयाची बातमी कळविल्याच्या दुसऱ्या दिवशीं संध्याकाळीं प्रकाश रश्मीकडे गेला त्यावेळीं तिचें प्रेमाराधन करण्याच्या उत्सुकतेपेक्षां तिच्याकडून आपल्या मनांतील अस्वस्थता दूर व्हावी अशी उत्सुकताच त्याला अधिक वाटत होती !

कारण त्यांचें प्रेमाराधन मोठें मासलेवाईकच असे ! रश्मीच्या खोलींत पोंचल्यावर प्रकाशनें अगदीं संभाळून तिच्या शेजारीं बसावयाचें, तिचा सुंदर पोषाख व कृत्रिम नेपथ्यविधान बिघडणार नाहीं अशी काळजी घेऊन तिचें चुंबन घ्यावयाचें व मग थोड्या अंतरावर बसून हवं अस-ल्यास प्रेमालाप करावयाचे— असलें हें प्रेमाराधन होई त्यांचं !

प्रेमाराधन कसलें—प्रेमाराधनाचें विडंबनच तें ! प्रारंभीं प्रकाशला हें अगदीं असह्य होई ! कारण रश्मीवर त्याची विशुद्ध प्रीति नसली तरी तिच्या सौंदर्यानें तो पुरा मोहाकृष्ट झाला होता. व त्यामुळें अशी ही सुंदर रश्मी आपली आहे ह्या कल्पनेनें त्याला पुष्कळच आनंद वाटे व मग साहजिकच तिच्यावरील आपला हक्क प्रस्थापित करावा असें त्याला वाटे. पण आपली केशवेषभूषा बिघडेल ह्या भयानें रश्मीनें त्याला ती मनाई केली होती. व रश्मीविषयीं प्रकाशची प्रेमभावना तितकी तीव्र नसल्यामुळें त्यालाहि असल्या मर्यादित, शिस्तबाज प्रेमाविष्करणाची संवय झाली !

परंतु कौमुदीच्या मनाला आपण दुखावलें आहे ह्या जाणीवेमुळें खिन्न झालेल्या त्याच्या हृदयाला रश्मीच्या प्रेमाची, तिच्या सहानुभूतीची आज अति आवश्यकता वाटली, व त्यामुळें आज नेहमींप्रमाणें थोड्या अंतरा-वर न बसतां आपलें जरा भारावलेलें मस्तक रश्मीच्या खांद्यावर टेंकण्याच्या हेतूनें प्रकाश जरा कलंडून बसला.

पण त्याच्या मस्तकाचा—ज्या त्याच्या कुरळ्या केंसाचें कौमुदीला मोठें कौतुक वाटे त्या कुरळ्या केंसाचा-ओझरता स्पर्श रश्मीच्या खांद्याला झाला न झाला तोंच ती तटकन् उठून उभी राहिली व आपल्या खांद्यावरील पदरावरून नाजुक रीतीनें आपलीं बोटें फिरवीत ती तीव्र स्वरांत म्हणाली, "हें काय भलतंच प्रकाश ! बाबांनीं मला वाढदिवसानिमित्त दिलेली

दोनशें रुपयांची साडी आहे ही– नि तिच्यावर तुमच्या डोक्याला लाव-लेल्या पोमेडचा तेलकट डाग नसतां काय पडला ? हश्श ! डोकं टेकूनच जर बसायचं होतं तुम्हाला तर तिथलं कुशन् घ्यायचं होतं; तरी बरं, थोडक्यांत निभावलं, नाहीं तर सारी साडीच फुकट जायची !"

हं ! दोनशें रुपयांच्या साडीपुढें प्रेमळ प्रकाशच्या भावना कवडीमोल वाटल्या ना रश्मीला ?—

बिचारा प्रकाश पुरा पुरा थिजला ! त्याला वाटलं, प्रियकरणीच्या खांद्याची सर कधीं कुशन्ला येईल काय ? रश्मीचं कसलं हें आपल्याबरचं प्रेम ? त्याच्या बुद्धीनें त्याला हळूंच प्रश्न केला.

पण त्या प्रश्नाकडे लक्ष पुरवायला त्याचें हृदय रिकामें असेल तर ना ! रश्मीच्या तळपत्या सौंदर्याचें मद्य प्राशन केल्यामुळें तें पुरें झिंगून गेलें होतें. आतां रश्मीनें त्याचा– तिच्यावरील त्याच्या प्रेमाचा—एवढा अव-मान केला तरी त्याच्या हृदयावरील तिच्या सौंदर्याचा अंमल फारसा उतरला नाहीं !

तो इतका प्रेमपागल बनला होता कीं, सुंदर, उंची वस्त्राभरणांनीं नटलेल्या रश्मीच्या खांद्यावर मस्तक टेकण्याचा आपण विचार केला हा आपलाच अविचार होता असेंच त्याच्या हृदयानें उलट त्याच्या बुद्धीला सांगितलें ! हं ! रश्मीच्या सौंदर्यमद्याचा आणखी एक पेला त्यानें झोंकला इतकंच !

व मग नेहमींप्रमाणें दूर अंतरावर सांवरून बसत त्यानें म्हटलें, "रश्मी, आज किती सुंदर दिसते आहेस तूं."

आणि त्याच्या ह्या शहाण्यासारख्या उद्गारानें रश्मी लगेच खुषींत आली. वास्तविक प्रकाशच्या ह्या उद्गारांत भावनेचा ओलावा फारच थोडा होता. पण जिथें प्रत्येक वस्तूंची किंमत तिच्या बाह्यांगावरून ठरली जाते तिथें अर्थापेक्षां निव्वळ शब्दांचें व अंतस्थ भावनांपेक्षां त्याच्या उघड उच्चाराचें महत्वच अधिक वाटणार !

पहिल्यांदा प्रकाशला ही सारी कृत्रिमता कडु वाटे. पण आतां ती त्याच्याहि आंगवळणीं पडली होती !—

त्यामुळें नुकताच रश्मीनें आपला इतका अपमान केला हें साफ विस रून तो मृदु स्वरांत आपल्या प्रेयसीला म्हणाला " रश्मी, कौमुदी ह्या नांवाची माझी एक मैत्रीण आहे तिच्याशीं तुझी ओळख व्हावी अशी माझी फार इच्छा आहे."

"असं ?" केसाच्या कृत्रिम कुरळ्या बटी हळुवार हातानें चाचपीत रश्मी म्हणाली, " कौमुदी नांव तिचं ? नांव तर मोठं सुंदर आहे. पण काय हो प्रकाश, ही कौमुदी सुंदर आहे कां ?"

कौमुदीविषयीं वाटणाऱ्या आस्थेच्या भरांत प्रकाश उत्तरणार होता. " हो, किती तरी सुंदर आहे ती." पण तेवढ्यांत त्याला आठवण झाली, रश्मीच्या ह्या डोळे दिपविणाऱ्या सौंदर्यापुढें कौमुदी सुंदर ठरेल ? व त्याच्या मोहांध हृदयानें ह्यावर चांगलाच नकार दिला. त्यासरशीं प्रकाश उत्तरला, " अंह, तुझ्यापुढें ती नाहीं सुंदर दिसणार."

व मग कौमुदीपुढें आपलें सौंदर्य अस्पर्श रहाणार असें वाटून रश्मी तिची ओळख करावयाला खात्रीनें तयार होईल असें मनांत येऊन प्रकाशला तेवढेंच थोडें समाधान झालें !

पण त्याचें हें उत्तर ऐकतांच मानेला एक नाजूक हिसडा देऊन रश्मीनें दुसरा प्रश्न केला, " मग निदान श्रीमंत तरी आहे कां ती ? "

" श्रीमंत ? अंह, पैशाची श्रीमंती तिच्याकडे मुळींच नाहीं."

" इश्श ! मग तिची मैत्री कशी हो करून घेऊं मी ?"

" म्हणजे ?" रश्मीच्या ह्या प्रश्नाचा अर्थ न कळून प्रकाशनें आश्चर्यानें म्हटलें.

" म्हणजे काय ? अगदीं लहानपणापासून माझ्या बाबांनीं मला ताकीद दिली आहे कीं, फक्त सुंदर किंवा श्रीमंत मुलींबरोबरच माझ्या-सारख्या, श्रीमंत पित्याच्या एकुलत्या एक सुंदर मुलीनें मैत्री करणं शोभतं! नि तुमची ही कौमुदी तर म्हणे, श्रीमंतही नाहीं नि सुंदरहि नाहीं ! मग तिची मैत्री करणं कसं शोभेल मला ?"

रश्मीच्या ह्या उत्तरानें प्रकाशला अतिशय खेद वाटला. आपल्या प्रिय मैत्रिणीची ओळख करून घ्यावयाला रश्मी इतकी नाखूष अं ? कौमुदी

आपल्या योग्यतेची नाहीं असंही रश्मी समजते ना? हं ! कौमुदी गरीब असेल, रश्मीएवढी सुंदर नसेल पण म्हणजे त्यामुळे तिची योग्यता कमी ठरते ? छे: ! सुंदर, श्रीमंत रश्मीच वास्तविक प्रेमळ कौमुदीच्या योग्यतेची नाहीं ! नाहीं ! पण—पण — रश्मी किती सुंदर—नि — नि — तिच्यावर आपलं किती प्रेम !— मग—मग— रश्मीची योग्यता खूप नाहीं कां ? — हो, असंच !— कौमुदीची योग्यता खूप आणि रश्मीची योग्यताहि खूप !— झालं मध्यें एकच क्षण प्रकाशच्या बुद्धीनें आपल्या अस्तित्वाची जाणीव दाखविली. नि पुनः लगेच त्याच्या प्रणयासक्त हृदयानें बुद्धीचा पाडाव केला व तो पुन: रश्मीच्या सौंदर्याचा दास बनला !—

आपल्या बोलण्याचा प्रकाशला क्षणभर राग आला होता हें रश्मीनें चटदिशीं ओळखलें. ती फार हुषार होती. अधिक ताणले असतां तुटतें हें व्यवहारांतील तत्त्व तिला ठाऊक होतें. व त्यामुळें आपल्या कोरीव भिवया नाचवीत व अगदीं ठेवणींतला नाजूक, लाडिक आवाज काढीत ती म्हणाली, " हो पण प्रकाश तिच्याशीं मी ओळख करावी अशी जर तुमची इच्छा असेल तर घेऊन या तिला एक दिवस इथें. नाहीं तर मोटार पाटवून देईन मी. त्यांतून तुम्ही नि ती या इकडे— अं ?"

कौमुदी इथें येईल ? तिला इथें आणावयाची ? हं ! म्हणजे सौम्य, शांत प्रकाश देणाऱ्या शोभिवंत लामण दिव्याला झगझगीत विजेच्या दिव्यांच्या तोरणमाळेसमोर ठेविण्यासारखेंच नाहीं कां ?

दंवबिंदूनीं डंवरलेल्या सुवासिक गुलाबपुष्पाला कृत्रीम सुवासिक कागदी फुलांच्या गुच्छांत टाकण्यासारखें नाहीं काय ?

पण प्रकाशच्या मनाला असें वाटलें तरी तो उघड कांहीं बोलला नाहीं —

समोर दिसणारी ही लावण्यलतिका आपली आहे या एका कल्पनेनेंच तो नुसता धुंद झाला होता !

रश्मी !— सुंदर, नाजुक, मोहक रश्मी ! — नेहमींप्रमाणें आतांहि रश्मी कांहीं तरी बडबड करीत होती. आपल्या वडिलांच्या अफाट

श्रीमंतीचा व आपल्या अव्यंग, अनिंद्य सौंदर्याचाच त्यांत एकसारखा उल्लेख होत होता. तिच्या प्रकाशचें त्यांतील एकाहि शब्दाकडे लक्ष नव्हतें.

फक्त, बोलतांना रश्मीच्या लालबुंद, नाजुक ओठांची होणारी हाल-चाल व तिच्या सुबक बोटांचा होणारा चाळा प्रकाशला दिसत होता. रश्मीचें सौंदर्य! — बस्स! त्या सौंदर्यानें प्रकाशला अगदीं आंधळा बन-विला होता!

पण रश्मीचें हें सौंदर्य नजरेसमोर असताना प्रकाश जरी आंधळा व बेमान होत असला तरी तिथून घरीं आल्यावर तो अगदीं बेचैन होई! रश्मीची हृदयशून्यता त्याच्या प्रेमळ हृदयाला बोंचे!

आपली ही हृदयव्यथा विसरण्याचा तो खूप प्रयत्न करी. पण हृद-याची व्यथा विसरण्याचा एकच उपाय असतो.

व तो म्हणजे बुद्धीचा हृदयावर ताबा ठेवणें! अर्थातच माणसाला आपल्या हृदयावर संपूर्ण ताबा ठेवितां येत असतोच; कारण हृदय हें बोअर गेलेल्या पाण्याच्या नळासारखें असतें.

असला पाण्याचा नळ सबंध उघडला कीं पाणी धोंधों वहातें, नळ थोडा बंद केला कीं, पाणी कमी वाहूं लागतें पण वॉशरच्या अभावीं हा नळ संपूर्णपणें बंद होऊं शकतच नसतो! कितीहि जोरानें तो बंद केला तरी त्यांतून थेंबथेंब पाणी गळतच असतें! व हें थेंबथेंब गळणें बंदच करावयाचें झाल्यास त्या नळामध्यें येणाऱ्या पाण्याचा मुख्य कांळाच बंद करणें भाग पडतें!

त्याप्रमाणें माणसानें आपल्या हृदयावर दाब ठेविण्याचा कितीहि प्रयत्न केला तरी त्याच्या हृदयांत सुखदुःखादि भावना स्फुरत रहाणारच! थेंब थेंब गळणाऱ्या पाण्याप्रमाणें कां होईना, पण त्या आपलें अस्तित्व प्रस्था-पित करीत रहाणारच!

व ह्या भावना त्रासदायक असल्यावेळीं त्यांची ही अखंड गळती—हा सतत अभिषेक नकोसा वाटतो पण बंदहि करितां येत नसतो! तो बंद करावयाचा —अजिबात बंद करावयाचा उपाय एकच — व तो म्हणजे

भावनांना — विचारांना — चालना देणाऱ्या बुद्धीवर व तदनुषंगानें बुद्धीचा हृदयावर ताबा ठेविणें!

पण प्रकाशच्या बाबतींत तें शक्य नव्हतें! दिवसभर कामांत गढल्या-मुळें त्याच्या हृदयांतील विचार जरा दबून असत. पण संध्याकाळीं रश्मी-कडे जाऊन आल्यानंतर ते आतांसारखे दुप्पट जोरानें उसळूं लागत.

कारण प्रकाशनें तें कितीहि नाकबूल केलं तरी रश्मीचें तें मोजकें प्रेम त्याला कांहीं पटत नव्हतें. तहानेलेल्या माणसाला तांब्याभर पाण्याऐवजीं चमचाभर पाणी पिण्याला दिलें तर त्याची तहान भागेल काय?

. तशीच गत प्रकाशची झाली होती. रश्मीच्या ह्या जगावेगळ्या प्रेमानें त्याचा भारी कोंडमारा होत होता. रश्मीच्या समोर असतांना तिच्या सौन्दर्यमद्यानें झिंगल्यामुळें त्याची विचारशक्ति जरी सुन्न होत असे तरी घरीं आल्यानंतर त्या मद्याचा अंमल कमी होई व मग तो नुसता कावून जाई. हे अति त्रासदायक विचार त्याला सतावून सोडत. पण ते विसरणार कसे!

बुद्धीवर ताबा ठेऊन?

आणि तो कसा ठेवावयाचा?—

बुद्धीला हृदयाच्या आहारीं जाऊं देऊन?—

नाहीं! हृदय व बुद्धि समरेषेंत समतोल ठेऊन!

पण ही जादुगिरी करणार कोण?

रश्मी?— शक्यच नाहीं.

मग कौमुदी?— कौमुदी! — हं! तोच तर प्रश्न होता ना!

कौमुदीकडे पूर्वीसारखें बोलावें असें प्रकाशला पुनः पुनः वाटे. व म्हणूनच तिच्यासमोर त्याला आणखीच अवघडल्यागत होई!—

मग तिच्या सहाय्यानें आपल्या वेड्या हृदयावर शहाण्याबुद्धीचा ताबा तो ठेविणार कसा?—

## १५ मातृप्रेम !

पण कौमुदीची योग्यता प्रकाशला उगीच नव्हती एवढी वाटत ! कौमुदी खरोखरीच तितक्या थोर योग्यतेची होती ! प्रकाशपेक्षां ४।५ वर्षांनीं लहान असूनही तिच्या अंगीं फार मोठा पोक्तपणा आलेला होता ! प्रकाशविषयीं तिला निरतिशय प्रेम वाटत होतें. परंतु त्या प्रेमांत पत्नी-प्रेमाइतकाच मातृप्रेमाचाहि अंश होता !

स्त्रियांच्या हृदयांत उपजतच मातृप्रेम असतें. व कांहीं मानसशास्त्रज्ञांचें म्हणणें असें आहे कीं, खऱ्या, आदर्श पत्नीप्रेमांत मातृप्रेमाचें मिश्रण असतें !—

कौमुदीला प्रकाशविषयीं आदर्श पत्नीप्रेम वाटत होतें हें निःसंशय कारण आपल्या लाडक्या बाळाला होणारें दुःख त्याच्या प्रेमळ मातेला न सांगतां जसें कळून येतें त्याप्रमाणें गेले १।२ दिवस प्रकाशची होणारी कुचंबणा कौमुदीला न सांगतां कळून आली.

ह्या दोन दिवसांत प्रकाश आपल्याकडे मुळींच आला नाहीं हें तिनें पाहून ठेविलें. व त्यानंतर दुसऱ्या दिवशीं—रविवार होता तो— दोन प्रहरीं ती स्वतःच प्रकाशच्या खोलीकडे गेली.

'निशिकांताची नवरी' हें नवप्रकाशित नाटक वाचीत प्रकाश कॉटवर पडला होता. उघडें असलेलें दार लोटून कौमुदी आंत येतांच प्रकाशला

किती आनंद झाला. क्षणापूर्वी त्याच्या मुद्रेवर दिसणारी जडता क्षणांत नष्ट झाली व मोठ्या उत्सुकतेनें तो उठून बसला.

पण दुसऱ्याच क्षणीं त्याला वस्तुस्थितीची जाणीव झाली. कौमुदीचें आपणावर प्रेम आहे---पण-पण आपलें प्रेम दुसरीवर आहे ह्या चमत्कारिक गुंतागुंतीची आठवण होऊन त्याची चर्या विकृत झाली.

कौमुदीने हें सारें पाहिलें व त्याचा अर्थहि तिला कळला. पण तिकडे मुद्दाम दुर्लक्ष करून आपल्या नेहमींच्या मनमोकळ्या वृत्तीनें ती म्हणाली, "प्रकाश, कमलेचं पत्र आलंय् आज मला. खरंच, कमलेला तूं सुख-साफल्याचं आश्वासन देऊन तिला जणूं नवा जन्म दिला आहेस हं. किती लांबलचक पत्र लिहिलंय् म्हणतोस. आनंदलेल्या पाखरांचा चिवचिवाटच जणूं! वाच ना हें धर."

नि मग कमलेचें तें आनंदभरित पत्र वाचतांच प्रकाशचें मनोमालिन्य हां हां म्हणतां निवळलें.

कौमुदीची चतुरता तर होच! प्रकाशच्या हृदयाला आलेल्या अस्वस्थतेचा उल्लेखहि न करितां, इकडल्या, तिकडल्या मजेच्या गोष्टी काढून, एकादी प्रेमळ कुशल माता आपल्या मुलाला जसा त्याच्या मनोमालिन्याचा विसर पाडते तसा कौमुदीनें प्रकाशला त्याच्या अस्वस्थ मनःस्थितीचा विसर पाडला!

आज कौमुदीच्या जिभेवर जणूं सरस्वती नाचत होती! एरवीं कधींहि इतकें न बोलणारी कौमुदी आज एकसारखी बोलत होती. कमलेच्या पत्राबद्दल तिनें चांगलें तासभर भाषण सुरू ठेविलें.

सीतागडहून आल्या दिवशीं प्रकाशनें सांगितलेल्या 'युक्ती' बद्दल तिनें आतां पुनः त्याला युक्तीप्रयुक्तीनें प्रश्न विचारून रंगांत आणला व मग प्रकाश स्वतः त्या बाबतींत अगदीं अस्खलित बोलत सुटला.

आपण ती 'युक्ती' कमलेला व माधवाला पहिल्यांदा सांगतांच कमलेची चर्या आधीं कशी भयभीत झाली व नंतर कशी तिवकीच लज्जा-रंजित व आनंदपुलकित झाली ह्याचें वर्णन करीत तो म्हणाला, "कौमुदी त्यावेळीं बघ, कमलाबाईंची मुद्रा अगदीं पहाण्यासारखी होती. गेलीं ४।५

वर्षे अंतःपुरांत डांबून राहिल्यानें त्या भारी भित्र्या बनल्या आहेत व त्यामुळे माझी ती ' युक्ति ' जरा धाडसाची आहे हें त्यांच्या ध्यानांत येतांच त्यांचा चेहरा नुसता पांढरा, फटफटित बनला. व जात्याच काळेभोर असणारे त्यांचे ते मोठाले, लांबट डोळे त्यामुळें अधिकच काळेकुळकुळीत व आणखीच मोठे दिसूं लागले. जणूं चित्रकारानें बाकी सारा चेहरा तसाच पांढरा ठेवून आधीं नुसते डोळेच काळेभोर रंगवावें तसा भास होत होता. बघ- कौमुदी फार दिवस पिंजऱ्यांत कोंडलेल्या मैनेला जर एकाएकीं मोकळ्या आकाशांत उडावयाला सोडलें तर ती जशी घाबरीघुबरी, कासावीस होईल ना !— तशा कमळाताई त्यावेळीं कासावीस नि घाबऱ्याघुबऱ्या दिसत होत्या—नि मग त्याच स्थितींत त्यांनीं हळूच आमच्या माधवरावजींकडे पाहिलें—हर— वाः ! तो पठ्ठया तर अगदीं खुषींत होता. त्याबरोबर हलकें हलकें कमळाताईची चर्या बदलली !— कौमुदी, तुला आठवतं, दोन वर्षांपूर्वी एका नामांकित कलावंताचे भावनाविष्करणाचे प्रयोग पहावयाला गेलों होतों तें—"

" हो, आठवतं तर—किती सुंदर प्रयोग केले होते त्यानें. अंतःकरणांत उद्भवणारी एकेक भावना त्यानें आपल्या चेहऱ्यावर किती यथातथ्य वठविली नाहीं ! मग ! कमलच्याही चेहऱ्यावर तशीच एकेक भावना बदलत होती होय ! " कौमुदीनें म्हटलें.

" हं. अगदीं बरोबर ओळखलंस. कमळाताईच्या चर्येवर आधीं भीतीची भावना पसरली होती. नंतर माधवाच्या चेहऱ्याकडे पाहतां पाहतां ही भीति ओसरून त्या जागीं हळूहळू विश्वास प्रतिबिंबित झाला. नंतर आनंद, प्रीति, लज्जा इत्यादि नाजूक भावनांचा पाठशिवणीचा खेळ सुरूं झाला ! फार फार गंमत वाटली बघ तिची चर्या पहातांना."

" पण—प्रकाश, त्यावेळीं त्या बिचारीच्या हृदयाला केवढा ताण पडत असेल नाहीं ! प्रकाश, त्यावेळीं तिची बुद्धि व हृदय ह्यांमध्यें चालणारी रस्सीखेंचच तिच्या चर्येवर प्रतिबिंबित होत होती—दुसरं काय ! "

कौमुदीचे हे शब्द ऐकून प्रकाशची मुद्रा गंभीर झाली. थोडा वेळ

ह्यावर विचार करीत तो म्हणाला, "कौमुदी, प्रत्येक माणसाच्या बुद्धि-हृदयामध्यें अशी रस्सीखेंच चालते काय ग!"

"होय, प्रकाश."

"मग, अशा रस्सीखेंचीमध्यें हृदयाचा जय होणं योग्य कीं बुद्धीचा?

प्रकाश स्वतःला उद्देशून हा प्रश्न विचारीत आहे हें कौमुदीनें ओळखलें व मृदु स्वरांत ती म्हणाली, "प्रकाश, माणसांच्या शारीरिक वाढीला हवा व उजेड ह्या दोन्हींची सारखीच अवश्यकता असते ना! प्रकाश, मनुष्यप्राणी जर निव्वळ बुद्धीच्याच आहारीं गेला तर तो रुक्ष, तार्किक बनेल नि निव्वळ हृदयाच्याच आहारीं गेला तर अतिभावनाप्रवण, हळुवार बनेल! ह्या दोन्हीं पराकोटी अयोग्य, अव्यवहार्य आहेत! त्यासाठीं, हरेक बाबतींत आपल्या बुद्धि-हृदयांमध्यें चालणारी रस्सीखेंच बंद करून मनुष्य-प्राण्यांनीं आपल्या बुद्धि-हृदयांना परस्पर सहकारी बनविलें पाहिजे व बुद्धीच्या प्रकाशांत हृदयाची पाऊलवाट आपण चोखाळली पाहिजे!"

कौमुदी बोलावयाची थांबली. पण प्रकाशचें डोकें त्याच विषयांत गुंतलें होतें. त्याची मुद्रा अस्वस्थ, त्रासिक झाली.

व तें पाहून जणूं सहजींच विषयांतर करण्याच्या आविर्भावानें कौमुदी म्हणाली, "पूर्वीं कमळ निव्वळ बुद्धीच्या तंत्रानें चालूं पहात होती व त्यासाठीं ती आपल्या हृदयाचा कोंडमारा करणार होती. पण ती आतां माणसांत आली एकदांची. आणि- हो खरं, प्रकाश, तुझ्या या युक्तीबद्दल कमलच्या माहेरच्या मंडळींना कांहीं कळविलं आहे कीं काय?"

"अं-तो जरा प्रश्नच आहे बघ. त्या मंडळींना अर्थातच ही 'युक्ति' पसंत पडणार नाहीं. हो, चांगल्या राणीपदावर पाणी सोडायचं म्हणजे काय? असंच म्हणणार तीं माणसं. तेव्हां त्यांना ह्याबद्दल कांहीं कळवूंच नये असं वाटतं मला. तुझं काय मत कौमुदी?"

"तसंच करावं बाई. नाहीं तरी काय? कमळवर काय मोठं प्रेम आहे त्या माणसाचं? श्रीमंतीला भाळून त्यांनीं तिच्या जन्माची दुर्दशा केली ती केलीच. नि वरती, तिला मुलगा न झाल्याबद्दल तिच्यावरच राग

धरलाय त्यांनीं; कसलीं माणसं तीं ? – कांहीं नको त्यांना कळवायला – उगीच नसतीं विघ्नं मात्र उपस्थित करतील तीं —"

" तेंच म्हणतो मीं – आपणां चौघांच्या बाहेर ह्या 'नाटका'ची वाच्यता होऊं द्यावयाचीच नाहीं."

" खरंच प्रकाश; आतां तूं ' नाटक ' हा शब्द उच्चारलास त्यावरून आठवलं बघ मला. पुढल्या महिन्यांत किनई आमच्या शाळेचा वार्षिक समारंभ होणार आहे. नि त्यावेळीं प्रत्येक इयत्तेनें कांहींतरी स्वतंत्र कार्यक्रम करावयाचें ठरलें आहे. मीं इंग्लिश सहावीची वर्गशिक्षकीण असल्यामुळें त्या मुलीं माझें मत विचारूं लागल्या. पण मला कांहीं सुचेना. एकाद्या नाटका-बिटकांतला प्रवेश करावा काय रे ? तूं सूचव ना कांहीं –" किती कुशल-तेनें कौमुदी संभाषणाची गाडी रूळ बदलून बदलून पुढें ढकलीत होती.

प्रकाशला नाटकें पाहण्याचा व वाचण्याचा विलक्षण शोक आहे हें ठाऊक असल्यामुळें तिनें मुद्दामच हा विषय काढला व तिच्या अपेक्षेप्रमाणें प्रकाश लगेच त्यांत रंगला.

कपाळाला आंठ्या घालून विचार करीत तो म्हणाला, " नाटक होय ! हुं ! आजकाल पूर्वीचीं नाटकं मागें पडलीं आहेत. बरं, नव्या नाटिकां-बद्दल म्हणावं तर त्या सबंधच दोन तासांच्या असतात तिथें त्यांतील एकाद्या प्रवेशाबिवेशाचा प्रश्नच कुठं राहतो ! एकंदर दोन नाहीं तर तीन अंक असणार नि ते सुद्धां इतके परस्परांत गुरफटलेले कीं त्यांतील एकाद, अंक पसंत करणंहि जरा अवघडच. त्यापेक्षां मीं म्हणतों कौमुदी, तुला लेखनाची आवड आहे नि तूं थोडंफार लिहितेसहि; मग तूंच एकादा सुट-सुटीत नाट्यप्रवेश लिहून का काढीत नाहींस ? "

" हो बाई छान कल्पना आहे ही. पण कसल्या विषयावर लिहावा रे !"

कौमुदीच्या ह्या प्रश्नाचा प्रकाशनें १।२ मिनिटं विचार केला व मग मोठ्यांदा हंसत म्हटलें, " ओहो, कौमुदी, आपल्या माधव–कमलेच्या प्रेम रहस्यावर लिही कीं एक छोटीशी नाटिका – अं ? छान आहे कीं हा प्लॉट. त्यांत प्रेम आहे, रहस्य आहे, धाडस आहे व शेवटहि गोड आहे. अं ! "

" छेः छेः प्रकाश, भलतंच नको तें. तुझी युक्ति सफळ होण्यापूर्वी तिची अशी वाच्यता नको अधिक. मला भारी भीति वाटते बघ."

" एः, त्यांत कसली ग भीति ? नाटक हें संसाराचंच ना चित्र असतं ? मग ? पात्रांची परिस्थिति नि नांवगांव अगदीं बेमालुम बदलावं म्हणजे झालं – "

" पण – अंहं,, नकोच तें – प्रकाश, दुसरा एकादा प्लॉट सूचव तूं."

" वाः वाः ! असे प्लॉट्स् जणूं वाटेवरच पडलेले असतात कीं नाहीं ? आणि काय ग कौमुदी, असे फुकट मिळतात वाटतं नाटकाचे प्लॉट ?" प्रकाश मुद्दाम चेष्टेनें म्हणाला.

आज किती दिवसांनीं तो कौमुदीबरोबर असा पूर्वीसारखा अघळपघळ हास्यविनोद करीत होता. आणि आज त्याची मनोवृत्ति अशी खुली होण्याचें सारें श्रेय कौमुदीला होतें. प्रकाशच्या ताणलेल्या मनोवृत्तीवर तिनें त्याच्या-वरील आपल्या मातृप्रेममिश्रित प्रीतीचा वर्षाव करून तो आज दूर केला व आतां त्याचा सुपरिणाम म्हणून प्रकाशला असें हंसतां बोलतांना पाहून कौमुदीला केल्या श्रमांचें सार्थक झालेसें वाटलें. —

आणि त्या भरांत तिचे प्रेमळ डोळे पट्दिशीं पाण्यानें भरले. तापानें फणफणाऱ्या आपल्या बाळाला जरा हलकें वाटावें म्हणून माता त्याला गोंजरीत असतां त्यामुळें समाधान वाटून बाळ हंसलें म्हणजे त्याची माता नाहीं का अशीच गहिंवरत ? –

आपले अश्रु प्रकाशच्या नजरेला पडूं नयेत म्हणून कौमुदी उठून खिडकीकडे गेली. पण प्रकाश बोलण्याच्या नादांत असल्यामुळें हें त्याच्या लक्षांतच आलें नाहीं.

तो कृत्रिम गांभीर्यानें कौमुदीला पुनः म्हणाला, " हं, सांग कीं कौमुदी नाटकाचे असे उत्कृष्ट प्लॉट्स् फुकट मिळतात होय ? "

" मग मीं किंमत देऊन घेईन कीं विकत." कौमुदी तशाच गंभीरतेनें उत्तरली.

त्यावर प्रकाशनें खट्याळपणें विचारलें, " असं ? काय देणार आपण किंमत ? "

" अं – अं – किंमत होय ? " आपल्या रेखीव भिंवया आकुंचित करीत व उजव्या हाताची तर्जनी हनुवटीवर टेंकवीत कौमुदी खूप विचार करण्याचा आव आणीत म्हणाली, " किंमत – हो गडे, प्रकाश, मी किनई त्या प्लॉटची नाटिका लिहून ती तुलाच अर्पण करीन म्हणजे झालं !–"

" शाब्बास ! जिते रहो ! कौमुदी, कमाल केलीस बुवा, तुझी लाईन चुकली बघ. विद्यादान करणारी मास्तरीण जी झालीस तूं, त्याऐवजीं मुद्दलाएवढे व्याज आकारणारी मारवाडीण जर झाली असतीस तर छानच किफाइतशीर व्यापार चालविला असतास कीं ! अजब आहे ही तुझी उपकार परत करण्याची रीत ! वाः वाः ! माझंच मला दान देण्याचं केवढं हें तुझं औदार्य ! " मनापासून हंसत प्रकाश म्हणाला.

व त्याचें हें हास्य पाहून स्मित करीत कौमुदीनें म्हटलें, " पण महाराज मुळांत तुमचा प्लॉट कुठें मिळाला आहे मला ? "

" प्लॉटचं काय ग एवढं मोठं ? हां हां म्हणतां काढीन शोधून. हो बुवा, त्या प्लॉटवर रचलेली नाटिका मला अर्पण करण्याचं बढं आमीष तूं दाखविल्यावर त्या मोहाला बळी पडल्यावांचून कसा राहीन मीं ! अं ! बाकी, मीं खरंच शोधून बघतो हं एकादा प्लॉट. एक, दोन दिवसांत सुचेल बहुधा – चालेल ना ? "

व मग कौमुदी आपल्या खोलींत गेल्यावर प्रकाश खरोखरीच प्लॉट–संशोधन कार्याला लागला.

पण त्याला कौमुदीशीं आतां झालेल्या हास्यविनोदाची मधूनमधून एक-सारखी आठवण होई. व कौमुदीबरोबर बोलण्यांत वेळ किती मजेंत जातो असें पुनः पुनः त्याच्या मनांत येई ! –

आणि मग लगेच त्याच्या डोळ्यांसमोर रश्मीची मूर्ति उभी राही —

रश्मि – श्रीमंत, सुंदर, नटवी, नखरेल रश्मि ! – हास्यविनोदाची यत्किंचित् आवड नसणारी, आपल्या आवडी निवडीशीं जराहि साम्य नसलेल्या आवडीं निवडी बाळगणारी व त्या तशा बाळगण्यांतच मोठेपणा मानणारी रश्मि ! —

आणि — आणि हरेक बाबतींत आपोआप आपलें व तिचें मतैक्य होणारी कौमुदी ! —

ह्या त्रासदायक तुलनेच्या विचारांत प्रकाश एरवीं किती वेळ गढला असतां ! पण त्याच्या असल्या त्रासदायक विचारांना वेगळी दिशा लाविण्यासाठीं कौमुदीनें उगीच नव्हती एवढी खटपट केली ! —

कौमुदीसाठीं एखादा प्लॉट शोधून काढण्याची त्याला लगेच आठवण येई व त्या भरांत हे त्रासदायक विचार दूर जात !

ती सबंध संध्याकाळ प्रकाशनें प्लॉटच्या शोधार्थच दवडली. त्या संध्याकाळीं त्याला नेहमींप्रमाणें रश्मीकडे जाण्याचीसुद्धां आठवण आली नाहीं.

व मग एक प्लॉट सांपडतांच तो लहान मुलाच्या उत्साहानें कौमुदीकडे धांवत गेला व ती शाळेंतील मुलींच्या 'होमवर्क'च्या वह्या तपासीत बसली होती तिथें तिच्या समोर टेबलावर चढून बसत तो घाईघाईनें म्हणाला, " कौमुदी, सांपडला प्लॉट ! —

" खरं ! " तपासावयाच्या उरलेल्या वह्या खुशाल दूर सारीत कौमुदीनेंहि तितक्याच घाईनें प्रश्न केला.

" हो तर हल्लीं आपल्या समाजाला अत्यावश्यक असलेला विषयच हातीं घ्यावयाचा आपल्या सध्यांच्या विवाहसंस्थेवर लिहावयाची नाटिका. म्हणजे तरुण पिढीच्या आवडी निवडीकडे संपूर्ण दुर्लक्ष करून जुन्या पिढीनें ठरविलेले आपले विवाह व तरुणांनीं स्वतः ठरविलेलें विवाह ह्या दोन्हींमधील सुवर्णमध्य साधणारे विवाह कसे घडून आले पाहिजेत तें ह्या नाटिकेंत दाखवावयाचें. "

" हं." प्रकाशनें पुढें बोलावें म्हणून कौमुदीनें सोत्सुक हुंकार दिला.

" तेव्हां, ह्या प्लॉटबद्दल माझी कल्पना अशी आहे कीं पतिपत्नीच्या तीन जोड्या चित्रित करावयाच्या. पहिली जोडी ही मीं आतां म्हटल्याप्रमाणें ह्या उभयतांच्या संमतीला महत्त्व न देतां, किंबहुना त्यांच्या असंमतीकडेहि दुर्लक्ष पुरवून जुन्या पिढीनें आपल्या अधिकारांत निवडलेली असते. ह्या पतिपत्नीमध्यें कांहीं बाबतींत पुष्कळ वैषम्य असतें पण मुख्य म्हणजे, आपल्या मताची वडील माणसांनीं पर्वा बाळगली नाहीं ह्या रागानें

उभयतांमधील वैषम्य थोडेंफार दूर व्हावें अशासाठीं तीं दोघं विशेषतः त्यांतील पति प्रयत्नहि करीत नाहीं व आपल्या संसारसुखाचा असा विचका केल्यावद्दल येतां जातां तो पती शब्दांनीं व ती पत्नी आपल्या असंतुष्ट वागणुकीनें वडिल माणसांना सारखा दोष देतात व त्यामुळें ह्या दोन पिढ्यामधील आपुलकी पार नष्ट होते समजलीस ! "

" हो, ही झाली पहिली जोडी -- प्रकाश, ह्या नमुन्याच्या कांहीं जोड्या मीं स्वत: पाहिलेल्या आहेत. केवळ आईवडिलांनीं आपल्या पत्नीची निवड केली म्हणून त्या डॉक्टर लक्ष्मणरावानें नाहीं का जन्मभर पत्नीचं नांव टाकलं -- हं ! बरें पुढें ? "

आपला प्लॉट कौमुदीला बरा वाटला हें कळल्यामुळें प्रकाश मोठ्या उत्साहानें पुढें म्हणाला, " नंतर येणार दुसरी जोडी. आईवडिलांच्या विरोधाला न जुमानतां स्वतः त्या पतिपत्नींनीं ही जोडलेली. पण ही जोडते वेळीं आपल्या वडिल माणसांना त्यांनीं तोडल्यामुळें पुढें आपल्या माणसांच्या आपुलकीचा व सहानुभूतीचा अभाव त्यांना जाणवूं लागतो. व त्यापायीं एकमेकांत त्यांची धुसफूस व चिडचिड सुरूं होते. व आतां त्यांना कळतें कीं वडील माणसांनीं आपल्या विवाहाला विरोध केला होता त्यांत कांहीं तथ्य होतं. मग दाखवावयाची तिसरी जोडी. ह्या जोडीला जुन्या समंजस पिढीनें योग्य तें स्वातंत्र्य दिलें असल्यामुळें परस्पर विचारविनिमय करून ही जोडी निवडली जाते. म्हणजे जुन्या पिढीचा अनुभव व नव्या पिढीची कल्पना ह्या दोन्हींची चांगली सांगड जुळते व त्यामुळें ह्या जोडीला हवें तेव्हां स्वातंत्र्य मिळतें व हवें तेव्हां जुन्या पिढीच्या पंखाखालीं राहून स्वातंत्र्याची जबाबदारी कांहीं काळ टाळतां येते ! तेव्हां आपल्या समाजानें असल्या तऱ्हेचे विवाह अस्तित्वांत आणले पाहिजेत ! काय ? कसा वाटतो हा प्लॉट ? "

" सुरेखच आहे कीं, आणि प्रकाश, तूं म्हणतोस तसाच आदर्श विवाह माझ्या एका मैत्रिणीनें केला आहे. तूं ओळखतोसच कीं तिला, हो, कुंदाताई -- कुंदाताई व प्रभाकरपंत ह्यांच्या जागीं जर दुसरे कुणी थिल्लर प्राणी असते तर आपल्या आईवडिलांच्या मनाची पर्वा न बाळगतां त्यांनीं केव्हांच

विवाह करून टाकला असता नि त्यायोगें आपली किंमतहि कमी केली असती ! पण तसा तूं दाखविलेल्या मधल्या जोडीसारखा यिल्लरपणा ह्यांनीं केला नाहीं नि म्हणून त्यांच्या विवाहाला पुढें आदर्शत्व आलें ! पण पुरे बाई, माझ्या मैत्रिणपुराणांत मी वाहूनच चाललें होतें कीं — "

" मग, मैत्रीचा प्रभाव असतोच तसा अजब ! गाढ मैत्रीनें निबद्ध झालेल्या दोन जीवांना परस्पर सहवासांत एकप्रकारची गोड समाधि लागते जगांत मैत्री इतकी सुंदर चीजच नाहीं ! " प्रकाश अगदीं अंतःकरणापासून बोलत होता. व कौमुदीनें ओळखलें कीं, तो हें त्याच्या व आपल्या मैत्रीला उद्देशून बोलत आहे. व म्हणून हा उल्लेख इतकाच पुरे, त्याला अधिक वैयक्तिक स्वरूप येण्यांत गंमत नाहीं हें दूरदर्शीपणानें ओळखून कौमुदी म्हणाली, " हं, हं, खरं आहे हें ! पण प्रकाश, तूं प्लॉट दिलास खरा, पण तेवढ्यानें नाहीं भागणार. नाटिका लिहावयाला तूं थोडी मदतहि केली पाहिजेस. "

" वा: ! उत्तम ! आतां उद्यां म्हणशील नाटिकेंतील नायकाचें कामहि तूंच केलं पाहिजेस ! " प्रकाश हंसून म्हणाला.

व कसा कोण जाणे, पण कौमुदीला आपल्या नेहमींच्या सावधगिरीचा विसर पडून प्रकाशच्या विनोदाला उत्तर म्हणून ती म्हणाली, " तूं नायक नि नायिका कोण ? "

" तूं. " त्याच विनोदाच्या भरांत प्रकाशनें उत्तर दिलें.

व दुसऱ्याच क्षणीं दोघांनाहि कसेंसेंच झालें. प्रकाश जात्याच फटकळ होता. तो वाटेल तें बडबडे. पण कौमुदी अगदीं संभाळून बोलत असे. नि आतां पहिला गैरसावध शब्द तिच्याच तोंडून गेला होता.

पण मग ती लगेच सांवरली व जणूं आतां झालेलें बोलणें मुळीं लक्षांत घेण्याजोगें नव्हतेंच अशा आविर्भावानें विषयाला सहजीं कलाटणी देत ती म्हणाली, " इंग्लिश सहावीच्या वर्गांत किनई प्रकाश, पुरुषपार्ट करणाऱ्या ५।६ मुली आहेत. अगदीं निर्भीडपणें छान काम करतात त्या. आणि तीन प्रवेशांची लिहावी, नाहीं नाटिका ? "

" तें आपलं तुझं तूं ठरव बुवा आमचं काम आम्ही केलं."

" तर तर! मीं पाहीन कीं नाटिका लिहिण्यांत तूं कसा भाग घेत नाहींस तें." मघां दूर सारलेल्या वह्या अतां जवळ ओढीत कौमुदी हंसून म्हणाली.

व तिनें किती चतुरतेनें आपल्याला घरीं जाण्याबद्दल सुचविलें त्याचें कौतुक वाटून हंसतच प्रकाश घरीं गेला.

पण घरीं आल्यावर किती वेळ तरी व नंतरहि कितीदां तरी त्याला मोठें आश्चर्य वाटलें कीं, कौमुदीच्या अंगांत कसली एवढी जादू आहे कीं, जिच्यामुळें तिच्याकडे हंसतां बोलतांना आपल्याला इतका मोठेपणा वाटतो!—त्याला काय ठाऊक कीं, कौमुदीच्या आपल्यावरील निःस्सीम प्रेमानें ही जादू निर्माण झाली आहे. तिच्या आपल्यावरील प्रीतीमध्यें स्फुरणाऱ्या मातृप्रेमाचा हा प्रभाव आहे. व त्या मातृप्रेमामुळेंच ती अशी वेळोवेळीं आपल्याला सांवरते, आपल्याला जणूं अंजारते, गोंजारते नि आपल्या जीवनांतील सुकलेलें स्वारस्य त्यामुळेंच ती ओलावते!—

# १६ मुद्दाम पाडलेलें गोड स्वप्न !

आपण कौमुदीशीं इतक्या मनमोकळ्या स्नेहभावानें वागणें योग्य आहे का असेंहि कधींकधीं प्रकाशच्या मनांत येई. पण रश्मीशीं विवाह ठरविल्यापासून तो कौमुदीशीं आजवर इतका संभाळून वागत आला होता कीं,आतां त्या वागण्याचा त्याला कंटाळा आला.त्याच्या बोलक्या स्वभावाला एकलकोंडेपणाची ही शिक्षा हल्लीं तर इतकी अगदीं असह्य वाटत होती कीं आतां कौमुदीबरोबर पूर्वीसारखे हंसून खेळून वागल्यानें मनाला होणारा आनंद नाहींसा करावा अशी इच्छाच त्याला होईना. त्या बाबतींत आतां विचारच न करण्याचें त्यानें ठरविलें.

नाहीं तरी काय ? प्रत्येक मनुष्य असेंच करितो. आपल्या आचारो-चारांची पारख करतेवेळीं त्या वेळच्या मनोवृत्तीनुसार तो नेगळ्या कसो-ट्याच लावीत असतो ! व कांहीं वेळीं तर एकादी कसोटी आंगलट येते असें वाटलें तर आपल्या त्या कृत्यांचें परीक्षण करण्याचा नादच तो सोडतो.

प्रकाशनें तसेंच केलें; तो अगदीं मोकळ्या मनानें कौमुदीशीं हंसूं खेळूं लागला. तें बरें कीं वाईट हा विचार त्यानें बाजूलाच सारला.

त्यानें सुचविलेल्या प्लॉटवर नाटिका लिहिण्यांत त्याचे व कौमुदीचे ते दोन दिवस मोठ्या मजेंत गेले.

नाटिका मनपसंत लिहून संपली व शाळेच्या प्रिन्सिपॉल बाईंना ती

इतकी आवडली कीं ती लिहिण्यांत प्रकाशनें मोठ्या हौसेनें भाग घेतला होता हें कौमुदीकडून कळल्यामुळें ती नाटिका बसवितेवेळीं प्रकाशनें स्वत: हजर राहून योग्य त्या सूचना द्याव्या असा बाईनीं कौमुदी-मार्फत निरोप पाठविला.

व कौमुदीनें तो मोठ्या आनंदानें प्रकाशला कळवितांच त्यालाहि मनांतून फार बरें वाटलें कारण एकतर हल्लीं त्याला कौमुदीच्या सह-वासाची फार गोडी लागली होती. बाकी त्याला या गोष्टीची अद्यापि पुरी जाणीव झालीच नव्हती. किंबहुना ती जाणीव तो करून घेऊं इच्छित नव्हता व म्हणूनच त्यानें ही मैत्री आतां इतकी वाढू दिली.

तेव्हां नाटिकेच्या तालमीच्या वेळीं शाळेंत हजर राहिल्यानें कौमुदीचा सहवास मिळेल व विशेष म्हणजे आपल्या शिष्यांशीं ती कशी प्रेमळ पण शिस्तखोर वागतें हेंहि दिसेल :हें एक प्रकाशला आनंद वाटण्याचें कारण होतें. व दुसरें कारण असे कीं, मनुष्याला नेहमींच आपला गतकाळ व विशेषत: आपली विद्यार्थीदशा फार प्रिय वाटत असते ! व तें योग्यच असते. कारण मानवी आयुष्यांत विद्यार्थी दशेचा काळ फार सुखाचा — कवींनीं वर्णिलेल्या बाळपणींच्या सुखाच्या काळाहूनहि अधिक सुखाचा असतो ! त्यामुळें अशी जी सुखमय विद्यार्थीदशा आपल्या आयुष्यांतून आतां कायमची गेली त्या दशेंत अद्यापि आनंदानें वावरणाऱ्या बालकबालिकामध्यें मिसळण्याचा मोह कुणाहि सहृदय व्यक्तीला होणारच !

आणि प्रकाशलाहि असा मोह पडलाच. व त्यामुळें कौमुदीनें प्रिन्सि-पालबाईचें आमंत्रण त्याला देतांच तो अगदीं खुलला.पण तसें उघड न दर्श-वितां आपल्या चेष्टेखोर स्वभावानुसार कौमुदीला जरा चिडविण्यासाठीं तो म्हणाला, " हो, तुझ्या प्रिन्सिपॉलबाई खूप बोलावतील पण आपण नाहीं बुवा त्या स्त्रीराज्यांत जाणार ! "

" ओहो ! अगदीं अर्जुनाचा अवतारच कीं नाहीं ! म्हणे, त्या स्त्री-राज्यांत नाहीं जाणार ! हूं ! माझ्यासाठीं म्हणून आमच्या बाईनीं तुला येण्याची परवानगी दिली तर त्याबद्दल आभार मानावयाचे सोडले नि—"

" आभार ? ते कां बुवा ? तुझ्या त्या प्रिन्सिपालबाईनें उपकाराची फेड अपकारानें केली एवढ मी म्हणेन हवं तर."

" म्हणजे ? ती कशी बाई ?"

" वा: ! अग, तुमच्या शाळेच्या संमेलनासाठीं इतकी सुंदर नाटिका त्यांना माझ्यामुळें मिळाली ! मग त्यांच्यावर हा माझा थोडा, थोडका कां उपकार आहे ?" प्रकाश हंसून म्हणाला.

त्यावर कृत्रीम गांभीर्यानें कौमुदी उत्तरली, " होय बाई ! नि हा उपकार स्मरून वास्तविक त्या नाटिकेची रंगीत तालीम इथें तुझ्या खोलींत येऊनच मुलींनीं केली पाहिजे. नाहीं कां ? पण काय करणार ? कलियुग ना हें ?"

कौमुदीच्या ह्या मिस्कीलपणावर खूष होऊन प्रकाश खदखदून हंसला. व हंसतां हंसतांच त्याच्या मनांत आलें, ही कौमुदी हल्लींच इतकी हंसरी, बोलकी, विनोदी कशी बनली ?

कशी बनली ? गाईला पान्हवण्यासाठीं तिच्या आचळांना जसें दूध लावावें लागतें तसें प्रकाशच्या मध्यंतरी सुकलेल्या हास्यविनोदप्रिय वृत्तीला पान्हा आणण्यासाठीं कौमुदीनें आपला हास्यविनोदाचा सारा सांठा हल्लीं बाहेर काढला होता ! पण प्रकाशला ज्याप्रमाणें हें ठाऊक नव्हतें त्याप्रमाणें आपल्या प्रयत्नाला यश येऊन प्रकाश पूर्वीसारखा हंसूं बोलूं लागलेला पाहून कौमुदीला कसें दुःखांत सुख वाटत आहे हेंहि त्याला ठाऊक नव्हतें. व त्याचमुळें तो इतका आनंदी बनूं शकला.

किती दिवसांत हंसला नव्हता इतका तो आतां हंसला व मग खूप हंसल्यानें दमल्यागत होऊन मोठ्यांदा श्वास घेत तो म्हणाला, "नाहीं, नाहीं कौमुदी, तुझ्या शिष्यांनीं इतकी तसदी नको घ्यायला. इथें येवून रंगीत तालीम नको बरं करायला. मींच येईन शाळेंत झालं."

" अंहं, इतकं जड वाटून नको कांहीं यावयाला." ही गंमत चालूं ठेविण्यासाठीं कौमुदीनें म्हटलें.

पण प्रकाश काय असा नें बधणार ? तो लगेच म्हणाला, " असूं दे झालं. उगीच कां दुसऱ्याची निराशा करा ? अं ?"

व हा हास्यविनोद निर्झर निरनिराळ्या वळणांनीं उपवळणांनीं असाच आणखी खळखळत राहिला असता पण ह्याच वेळीं प्रकाशच्या ऑफिसांतील शिपाई एक लखोटा घेऊन प्राप्त झाला.

लखोटा पोंचल्याची सही घेऊन शिपाई चालतां होतांच प्रकाशनें तो फोडून आंतील पत्र बाहेर काढलें – तर काय !

दुसऱ्या दिवशीं सकाळीं सीतागडला रवाना होऊन तेथील वाड्याचें काम बरेंचसें पुरें होईतोंवर सीतगडालाच तिथें रहाण्याबद्दलचा वरिष्ठाच्या सहीचा हुकूम ! —

तो वाचतांच प्रकाश भारी हिरमुसला झाला. व अगदीं नाराज स्वरांत त्यानें म्हटलें, "काय करणार बुवा आमच्या ह्या साहेबाला ! मला सीतागडला पाठवावयाला ह्याला उद्यांच मुहूर्त सांपडला ना ? मी चांगला बरा उद्यां संध्याकाळीं तुझ्या शाळेमध्यें नाटिकेची तालीम पहावयास येणार होतो. नि मध्येंच झाला कीं हा घोंटाळा !"

व प्रकाशचे हे शब्द ऐकून कौमुदीला फार गंमत वाटली. मघांपासून प्रकाशनें केलेली बतावणी आतां फुटली. नाटिकेची तालीम पहाण्याची – विद्यार्थी दशेचा आनंद लुटणाऱ्या त्या निष्पाप बालिकांच्या गोड सहवासांत तास, दोन तास घालविण्याची–प्रकाशला वास्तविक किती हौस वाटत होती तें आतां बाहेर पडलें.

पण प्रकाशच्या स्वभावाची कौमुदीला अगदीं उत्तम माहिती असल्यामुळें तिनें त्याला ह्यावरून मुळींसुद्धा चिडविलें नाहीं. कारण प्रकाश जेवढा हंसरा, बोलका, पोरकट होता तेवढाच चिडखोर होता. व विशेषतः आपल्या मर्मस्थानावर कुणी चेष्टेची फुंकर घातली तरी कुचेष्टेचा निखारा ठेविल्यागत अगदीं चवताळून जाई तो.व म्हणूनच त्याच्या ह्या कुरकुरण्यावर कौमुदीनें फक्त सहानुभूतीनिदर्शक खिन्न स्मित केलें !

नंतर सामानसुमानाची जरा आवराआवर करीत एकटाच आपल्या खोलींत असल्यावेळीं प्रकाशच्या एकदम ध्यानांत आलें कीं, मुलींच्या नाटिकेची तालीम पहाण्याची संधि चुकणार म्हणूनच केवळ आपल्याला

इतका खेद झालेला नाहीं — तर — तर — कौमुदीचा सहवास आतां कांहीं दिवस अंतरणार म्हणून आपलें मन इतकें खिन्न झालें आहे.

'कौमुदी !—किती प्रेमळ, किती गोड आहे बरं कौमुदी !— अगदीं नांवाप्रमाणेंच शीतल, सौम्य !—

आणि मग एकदम प्रकाशला रश्मीची आठवण आली.

रश्मि ! —हं !— रश्मि !— नि तिची आठवण येतांच प्रकाशला एकदम कसा धक्का बसल्यागत झालें.

शीतल रम्य चंद्रप्रकाशांतून तो जणूं एकाएकी तापदायक सूर्य प्रकाशांत आला !

असें काय व कां झालें तेंच त्याला कळेना ! आतांपर्यंत वाटणारा मोकळेपणा एकदम नाहींसा झाल्यागत वाटूं लागलें त्याला.

एक सकंप निःश्वास सोडून रश्मीचा निरोप घेण्यासाठीं तो तिच्या घरीं गेला.

जर तो ह्यावेळीं पुनः कौमुदीकडे गेला असतां तर त्याला तिथलें दृश्य पाहून मोठेंच आश्चर्य वाटलें असतें.

कारण गेले २।४ दिवस त्याला हंसविणारी, रिझविणारी कौमुदी आतां उशीत मान खुपसून असहाय्यपणें रडत होती.—

प्रकाश रश्मीचा आहे, रश्मीच्या पाशामध्यें अडकलेला आहे हें ठाऊक असूनहि कौमुदीनें गेले २—४ दिवस स्वतःला रश्मीच्या अस्तित्वाचा मुद्दामच विसर पाडला होता !

ती जणूं एका गोड स्वप्नांत वावरत होती. व त्या स्वप्नाच्या जगांत प्रकाश तिचा होता नि ती प्रकाशची होती !

पण आज एकाएकीं तें स्वप्न भंग पावलें !— तिला वस्तुस्थितीची निष्ठुर जाणीव झाली.

गेले २-४ दिवस निराशामय, निष्पाप आनंदांत बागडलेल्या तिच्या हृदयाला ही जाणीव असह्य झाली !—

आकाशांत स्वैर भरारी मारणारी, आपल्यापासून वस्तुतः कितीतरी दूरदूर रहाणारी चिमणी चुकून आपल्या हातीं लागली नि ती आतां

आपलीच आहे असा गोड आभास आपल्या मनाला वाटावा तोंच त्या चिमणीनें भुर्रकन् उडून जावं—तशी गत झाली कौमुदीच्या ह्या स्वप्नाची !

गेले २१४ दिवस तिनें विचाराला अजिबात फांटा दिला होता. नेहमीं बुद्धीच्या राजमार्गानें जाणारी ती – गेले २१४ दिवस हृदयाची पाऊलवाट चोखाळूं लागली होती.

प्रकाशशीं—रश्मीच्या प्रकाशशीं – इतक्या गोड आपुलकीनें आपण वागणें योग्य नव्हे हें कळत असूनही कौमुदी तिकडे दुर्लक्ष करीत होती.

इतकेंच नव्हे तर एक दिवस तिचे तात्यासुद्धां तिला ह्या बाबतींत रागे भरले. आपल्या लाडक्या, गुणी मुलीला कधीं एका शब्दानेंहि न दुखविणारा तो प्रेमळ पिता म्हणाला, " बाळ, तूं हल्लीं काय चालविलं आहेस हें ! प्रकाशचा विवाह ठरला आहे ना म्हणे. मग त्याच्याशीं असं एकसारखं हसणं, बोलणं बरं काय !"

पण तात्यांनीं असें म्हणतांच कौमुदीची मुद्रा इतकी विव्हल झाली कीं, ती पाहून तात्यांना गहिंवरून आलें व कौमुदीच्या पाठीवरून ममतेनें हात फिरवीत ते म्हणाले, "बाळ, तुझ्या हितासाठींच ना बोलतो मी !— बघ, प्रकाश किती लाघवी, गोड पोरगा आहे हें काय मला ठाऊक नाहीं ! शिवाय, तूंहि समंजस आहेस, तुला बरं, वाईट सगळं कळतं ! पण तुला इतकंच सांगतो मी कौमुदी, कीं, दैवाकडून दुःख मुद्दाम मागून घेऊं नकोस बरं."

खरंच ! तात्या किती सार्थ बोलले.

कौमुदी दैवाकडून दुःख मागूनच नव्हती का घेत ? हें सुखस्वप्न तिनें मुद्दाम नव्हतं काय पाडलं !— पण ती तरी काय करील बिचारी !—

आपल्या दैवीं सुख नाहीं. हें स्पष्ट कळून आल्यावर सुखाचा आभास उत्पन्न करणारे क्षण तरी मिळतील तितके मिळवावें असें वाटलें तिला !

शेंकडा नव्याण्णव टक्के माणसें सुखाच्या भावी आशेवर जगतात ! आणि कौमुदी ह्या एक टक्क्यापैकीं असल्यामुळें ह्या स्वप्नाच्या स्मृतीवर जगण्यासाठींच तिनें हें सुखस्वप्न मुद्दाम पाडलें होतें !—

# १७ प्रणयाचा दर्प !

रश्मीचा निरोप घ्यावयाला म्हणून प्रकाश तिच्या घरीं गेला खरा. पण त्या जाण्यामध्यें कांहींसुद्धां ओढ नव्हती ! मात्र प्रकाशनें हें स्वतःशीं देखील कबूल केलें नसतें. तर उलट, रश्मीशीं आपला विवाह ठरलेला आहे, रश्मीचें आपल्यावर प्रेम आहे, व आपलें रश्मीवर प्रेम आहे ह्या तीन घटनांची तो आपल्या हृदयाला एकसारखी आठवण देत होता.

वेडा बिचारा ! स्वतःशीं गाढ संबंध असणाऱ्या घटनांची हृदयाला कधीं अशी आठवण कां द्यावी लागते ? पण जिथे मुळापासूनच हृदयाशीं लपंडाव सुरू होता तिथें ह्या फसवाफसवीची काय तमा !–

प्रकाश रश्मीच्या घराकडे पोहोंचला– आणि त्याला चटकन् आठवण आली कीं, गेल्या दोन दिवसांत आपण इकडे आलोच नाहीं. असा कसा विसर पडला तरी !– हं, बरोबर ! नाट्यलेखनामध्यें कौमुदीला मदत करण्यांत व तिच्याशीं गप्पा मारण्यांत गुंतल्यामुळें रश्मीची भेट घेण्याच्या क्रमांत खंड पडला.— पण रश्मी काय म्हणेल ? तिला निमित्त काय सांगावयाचें?

आजारांचें ? – हो, प्रकृतीच्या अस्वास्थ्याचेंच निमित्त सांगावें.

प्रकृतीच्या अस्वास्थ्याचें ? – हं ! पुनः फसवाफसवी !

पण हल्लीं प्रकाशचें हृदय अस्वस्थ होतें ना ? मग त्यामुळें प्रकृतीहि अस्वस्थ होणारच. मग कारणाचा उल्लेख न करितां नुसत्या कार्याचा उल्लेख केला म्हणून बिघडलें कुठें ?

व प्रकृतीच्या अस्वास्थ्याचें निमित्त दाखल करण्याचें नक्की ठरवून प्रकाश रश्मीच्या खोलींत प्रविष्ट झाला.

नेहमींप्रमाणें नखशिखान्त नखरा करून समोरील आरशांत पडलेल्या आपल्या प्रतिबिंबाचें कौतुक करीत रश्मी कोंचावर ओठंगून बसली होती.

तिला पहातांच आपल्या गैरहजेरीचें कारण एकदां सांगून टाकण्याच्या उद्देशानें प्रकाश म्हणाला, " रश्मी —"

" थांबा जरा. प्रकाश, काल नि परवां संध्याकाळीं आपली भेट झाली नाहीं ह्याबद्दल विचारणार ना तुम्ही ? पण काय करूं ? दोन्ही दिवशीं अगदीं अचानकपणें सिनेमा 'शो' ला जाण्याचें ठरलें. तुम्हांला कळवावयाला जमलंच नाहीं. आलांत तसेच परत जातांना निराशा झाली असेल नाहीं तुमची ? "

वाः ! छान ! सुरेख ! ! एकूण गेल्या दोन संध्याकाळीं रश्मी घरीं नव्हतीच तर ? वाः ! सुरेख ! आणि आपण आलों होतों कीं नाहीं ह्याबद्दल नौकराकडे चौकशी करण्याची सुद्धां तिला आवश्यकता वाटली नाहीं ना ? —

हं !— तशा स्थितींतसुद्धां प्रकाशला किंचित् हंसूं आलें व त्याला वाटलें हें काय प्रेम कीं प्रेमाचें सोंग ?—

पण— पण— प्रकाशच्या लगेच लक्षांत आलें — रश्मी आपली वाङ्-निश्चित वधू आहे ना ! मग कर्तव्याची जाणीव नको कां बाळगावयाला ?—

हुं ! ही जाणीव बाळगूनच तर प्रकाश आज तिथें आला होता. नि आतां ही जाणीव बाळगूनच तो रश्मीच्या जवळ बसला व तिचा नाजुक डावा हात दोन्ही हातांत धरीत तो म्हणाला, " रश्मि, उद्यां सीतागडला जाणार मी. "

" होय ? नि किती दिवस रहाणार तिथें ?"

" कदाचित् महिना, दीड, दोन महिनेसुद्धां रहावें लागेल.—" प्रकाश म्हणाला व आपले हे शब्द ऐकतांच रश्मीनें मोठ्यांदा श्वास घेतला. जणुं आपण हे शब्द उच्चारीपर्यंत तिनें श्वास कोंडून धरला होता नि तो आतां

सोडला असें प्रकाशला वाटलें व त्याच्या मनांत आलें, "रश्मीचें आप-ल्यावर फार प्रेम आहे एकूण !"

व कांहींशा कुतूहलानें त्यानें तिच्या चर्येकडे पाहिलें. पण काय असेल तें असो ! रश्मीनें त्याच्या नजरेला नजर देण्याचें टाळलें व थोडेसें हंसल्या-सारखें करीत ती म्हणाली, "अस्स होय ! मग आज मी पांढरं पातळ नेसावयाला हवं होतं तर ! हें विरमिजी रंगाचें उगीच नेसलें !"

"म्हणजे ? पांढऱ्या पातळाचा काय बुवा संबंध ?" प्रकाशनें आश्चर्यानें विचारलें.

"पांढरा हा विरहसूचक रंग आहे ना ? म्हणून म्हणते, मी आज पांढरं पातळ नेसणंच योग्य होतं !"

रश्मीचे हे प्रलाप ऐकून हंसावें कीं खेद मानावा हेंच प्रकाशला कळेना—आपण जाणार म्हणून तिच्या तोंडून खेदाचा एक शब्दहि नाहीं—फक्त पांढरें वस्त्र परिधान करून संस्कृत नाटकांतील नायिकेला शोभेसा वेष परिधान करण्याची संधि गमावली ह्याबद्दलचा खेद मात्र तिनें व्यक्त करावा ना ?—

एरवीं झाल्या, प्रकाशनें सौम्य शब्दांत रश्मीची ह्याबद्दल हजेरी घेतली असती. पण आज त्याचें मन त्याला खात होतें. रश्मीच्या असल्या ह्या उथळ प्रेमाबद्दल तिला दोष द्यावयाला आपण कुठें निर्दोष आहों ? कौमुदीच्या स्नेहसंबंधांत अडकल्यामुळें आपल्याला रश्मीचा नव्हता काय विसर पडला ? आपण तो उघड केला नाहीं आणि भोळसट रश्मीनें आपण येतांक्षणींच स्वतःच्या चुकीचा गाजावाजा केला !— तेव्हां एकपरीनें तीच आपल्या-पेक्षां कमी दोषी ! मग तिच्या दोषाचे माप आपण कोण तिच्या पद-रांत घालणार ?—असें वाटून तिच्या ह्या पाचकळ प्रलापाकडे दुर्लक्ष करून व तिच्यावर आपलें प्रेम आहे ह्याबद्दल स्वतःला पुनः पुनः खात्री देत प्रकाश म्हणाला, "रश्मी, अशी दूर काय बसलीस ? उद्यां जाणार मी जवळ ये ना जरा.—"

व तिची हनुवटी वर उचलून प्रकाशनें तिचें चुंबन घेतलें, आणि आपलें कर्तव्य पार पाडल्याच्या समाधानानें तो निःश्वास सोडणार इतक्यांत

त्याला आठवण झाली, हें रोजचें कर्तव्य संपलें पण आतां कदाचित् एक महिनाभर आपली भेट होणार नाहीं. मग — मग काय तें प्रकाशच्या बुद्धीनें —हृदयानें नव्हे हं — त्याला सुचविलें व तदनुसार तो म्हणाला, " अं- अं - रश्मी, आज एवढ्यावरच कसं भागेल ! — आतां— आता महिनाभर आपली भेट होण र नाहीं!— तेव्हां तुझी ही सुंदर वेषभूषा जरा बिघडली तरी हरकत नाहीं पण आज मी तुला माझ्या हृदयाशीं धरणार —अन काय — बोलत कां नाहींस ! होय म्हण ना "

प्रकाशनें रश्मीकडून होकाराची अपेक्षा व्यक्त केली खरी, पण त्याबाबत आपल्या हृदयाचे मत जर त्यानें विचारलें असतें तर रश्मीनें आपल्या ह्या कर्तव्यनिष्ठ प्रश्नाला नकार द्यावा असेंच तें मिळालें असतें ! पण आज काश असा खोलांत शिरूं इच्छितच नव्हता ! — आपलें कर्तव्य पार पाडावयाचें इथेंच फक्त तो लक्ष देऊन होता.

व म्हणून एवढें बोलून तो रश्मीच्या खांद्याभोंवती आपला हात टाकूं लागला.

पण आपल्या कोरीव भिंवया उंचावीत रश्मि म्हणाली, " अंह, प्रकाश. तुम्ही नका इकडे सरकूं. मीच जरा तुमच्याजवळ येतें."

रश्मीचे हे अनपेक्षित व तितकेंच अजब वाटणारे शब्द ऐकून आपला हात आंखडून घेत प्रकाशनें आश्चर्यानें तिच्याकडे पाहिले.

त्यासरशीं मान मुरडीत रश्मि त्याच्या अगदीं जवळ येऊन बसली व समोरील मोठ्या आरशांत दिसणाऱ्या उभयतांच्या प्रतिबिंबाकडे बोट करून नाजूक रीतीनें हंसत ती म्हणाली, " तें पाहिलंत का ! ह्यासाठीं मी म्हटलं कीं, तुम्ही सरकूं नका म्हणून. आतां आरशांत आपलं दोघांचं प्रतिबिंब कसं सुंदर दिसतं, पाहिलंत !"

रश्मीचे हे शब्द ऐकतांच प्रकाशला विलक्षण शिसारी आली.

प्रीतीचा सुमधुर सुवास हुंगावयाला तो गेला तर प्रणयाचा हा उग्र दर्पच त्याच्या नाकांत शिरला. व त्यामुळें त्याला कसें भिरभिरल्यासारखें होऊं लागलें.

त्याच्या नसानसांतून वहाणारे रक्तच जणूं गोठून गेलें !— हं प्रीती-संबंधीं काय ही कल्पना ! -

स्वतःच्या नाजुक सौंदर्याशेजारी आपला मर्दानी देखणेपणा समोरील आरशांत छान शोभून दिसेल असें वाटलें म्हणून रश्मीनें आलिंगन घेण्याची परवानगी दिली तर ?

हं !— आतां रश्मीला आलिंगण्याची प्रकाशला इच्छाच होईना. व मग त्यानें तो फार्स कसा पार पाडला व नंतरहि तासभर रश्मीची नेहमींची अर्थशून्य बडबड ऐकत तो कसा बसला तें त्याचें त्यालाच ठाऊक !

तेथील तो श्रीमंती उपहार मात्र त्यानें उष्टवलासुद्धां नाहीं. फार काय, एरवीं अतिशय आवडणारा चहासुद्धां तिथें त्याच्या घशाखालीं उतरेना.

आणि निरोप घेतेवेळीं रश्मी जेव्हां लाडिकपणें त्याला म्हणाली, "उद्यां सकाळीं ११॥ च्या गाडीनें जाणार ना तुम्हीं ! मग ११ वाजतां मोटार घेऊन मी तुमच्या घरीं येईन नि मग आपण बरोबरच स्टेशनावर जाऊं अं —" तेव्हां तर त्याला कांहीं उत्तरहि देववेना.

रश्मीचा आजचा हा अनपेक्षित प्रेमौघ त्याला गुदमरून टाकीत होता. व त्यांत ती स्टेशनावर येणार ह्या बातमीनें तर त्याला आणखीच अव-घडल्यासारखें झालें.

रश्मी स्टेशनावर आपल्या प्रणयाचें असें प्रदर्शन करील अशी खरी भीति त्याला मुळींच वाटली नाहीं. रश्मि तशी शहाणी आहे. रीतीभातींची जाणती आहे. हें त्याला ठाऊक होतें. तरीहि रश्मि स्टेशनावर येणार हें कळतांच त्याला इतकें अवघडल्यासारखें वाटलें त्याचें कारण म्हणजे कौमुदी स्टेशनावर येईल, उद्यां शाळा असूनहि थोडी रजा. घेऊन आपल्याला पोंचवावयाला ती खास येईल अशी गोड आशा त्याच्या मनाला वाटत होती

पण आतां रश्मी स्टेशनावर येणार म्हणते म्हणजे कौमुदी न आली तरच उत्तम असें त्याला वाटलें व म्हणूनच त्याचें मन खट्टु झालें.

व मग घरीं आल्यानंतर सामानसुमान बांधीत असतां जेव्हां कौमुदी त्याला म्हणाली, " प्रकाश, उद्यां ताप येणार आहे हं मला. "

तेव्हां त्या निराशेनें मन व्याकुळ झालें असल्यामुळेंच प्रकाश रुक्ष स्वरांत म्हणाला, " म्हणजे ? "

" म्हणजे काय ? इतकं कळत नाहीं तुला ? उद्यां तुला पोंचवायला स्टेशनावर यायचं आहे मला नि म्हणून ताप आल्याचें निमित्त करून अर्ध्या दिवसाची रजा घेणार मीं. "

कौमुदीचे हे शब्द ऐकून प्रकाशला जेवढा आनंद झाला तेवढेंच दुःख झालें—किंबहुना, आनंद, झाला म्हणूनच दुःखहि झालें !

आपण गांवाला जातेवेळीं आपल्या माणसानें आपल्याला पोंचवावयाला यावें, गाडी सुटतेवेळीं त्या आपल्या माणसाच्या मुद्रेवर खेद दिसावा, आपण आज जाऊं नये असें दर्शविणारी उत्सुकता त्याच्या नेत्रांत प्रकट व्हावी नि मग तशा हुरहुरत्या मनःस्थितींत एकमेकांचा निरोप घ्यावा अशी आवड प्रकाशला फार वाटे. पण मागें सीतागडला गेल्यावेळीं त्यानें कौमुदीला आपल्या वाङ्निश्चयाबद्दल कळविलें नसल्यामुळें तिच्याशीं तो जरा अवघडूनच वागत होता. त्यामुळें त्यावेळीं कौमुदी त्याला पोंचवावयाला स्टेशनावर गेलीच नव्हती. व प्रकाशची ही आवड अद्यापि पुरली गेलीच नव्हती. बाकी, खरें म्हणजे, त्या वेळेपेक्षां हल्लींच त्याची ही आवड अधिक प्रकट झाली होती. नि आतां कौमुदीनें त्या आवडीला हवा तो दुजोराहि दिला.

पण—पण—रश्मीनें घोंटाळा केला ना ?—

कौमुदीनें स्टेशनावर पोंचवावयाला येण्यांत जी गंमत होती ती रश्मी असतांना तिनें येण्यांत मुळींच नव्हती.

मास्तरांची नजर चुकवून मधल्या सुटींत चिंचा व पेरू खाण्यांत जशी गंमत असते तशी रश्मी नसतांना कौमुदीनें येण्यांत गंमत होती !—तसा निर्व्याज खेळकर आनंद त्यांत होता !

पण आतां रश्मी येणार !

प्रकाशची भारी निराशा झाली. व मौज अशी कीं, त्या निराशेचा राग त्यानें कौमुदीवर काढला.

तुटक स्वरांत तो तिला म्हणाला, "स्टेशनावर पोंचवावयाला येण्याचं काय कारण आहे ? मीं कायमचा थोडाच जातो आहे !"

प्रकाशचे हे शब्द ऐकून कौमुदी स्तंभित झाली. प्रकाशला बरें वाटावें म्हणून आपल्या मनाला होणारें दुःख आंवरून ती पुनः इतकी हंसती, बोलती झाली नि प्रकाशनेंच असें तुटक बोलावें ?

कौमुदीला फार वाईट वाटलें, रागहि आला व त्या भरांत ती चटकन् म्हणाली, "कां ? रश्मी येणार आहे वाटतं स्टेशनवर ?"

आणि हे शब्द उच्चारल्यानंतर तिला कसेंतरीच झालें. जी गोष्ट अगदीं बोलावयाला नको होती ती अविचाराच्या भरांत आपण बोलून टाकली ह्याबद्दल तिला खेद वाटला. पण आतां काय इलाज ?

ती असा प्रश्न विचारील ही प्रकाशलाहि कल्पना नव्हती. तिच्या अनपेक्षित प्रश्नानें तर त्याचा राग अधिकच भडकला व त्यानें मोठ्या ऐटींत उत्तर दिलें, "होय, अर्थात्‌च रश्मी येणार आहे."

ह्यावर कौमुदी कांहीं बोलली नाहीं. आणि बोलणार तरी काय म्हणा! प्रकाशनें अकारण तुटक वागून आपल्याला दुखविलें म्हणून नको तो प्रश्न विचारून त्याला आपण डिवचावें कां बरें ?

पण तिला हें कळेना कीं, अवघ्या १॥–२ तासापूर्वीं आपल्याकडे किती प्रेमानें बोलणारा प्रकाश इतक्यांत असा कां बदलला ?—

हं ! तिला काय ठाऊक कीं, रश्मीच्या प्रणयाचा उग्र दर्प त्याच्या डोक्यांत भरला असल्यामुळें त्याला अद्यापि भिरभिरल्यासारखें वाटतें आहे !

तिला काय कल्पना कीं, त्या दर्पाच्या उग्रतेमुळें कौमुदीच्या मैत्रीचा सुवास आतां येऊंच शकत नाहीं ?

व ही कल्पना नसल्यामुळें किंबहुना त्या बाबतींत कांहीं विचार करण्याच्या मनःस्थितींतच ती नसल्यामुळें दुसऱ्या दिवशीं १०॥ वाजतां शाळेला जातांना तिनें प्रकाशचा निरोप घेतला. त्यावेळीं कौमुदीची ती उतरलेली चर्या पाहून प्रकाशला अतिशय खेद झाला. व त्याला एकदां वाटलें कीं, प्रांजळपणें कौमुदीला सर्व सांगून टाकावें—आपल्या हृदयाला रश्मीच्या सौंदर्याचा कसा मोह पडला होता तें तिला कळवावें.

पण—पुनः त्याच्या मनांत आलें, तें रहस्य आपलें एकट्याचें कुठें आहे? तें रश्मीचेंहि होतें ना?—मग?

म्हणजे रश्मीच्या सौंदर्याचा प्रकाशच्या हृदयाला पडलेला मोह कमी प्रमाणांत कां होईना, पण अद्यापि होता व त्यामुळेंच प्रकाशनें त्या बाबतींत मौन धरलें व कौमुदीकडे सर्व सांगून मोकळें होण्याची संधीहि आपल्याला मिळणें शक्य नाहीं हें कळून आल्यामुळें तो आतां सुद्धां कौमुदीकडे अगदीं तुटक वागला. व त्यामुळें अधिकच खिन्न होऊन कौमुदी शाळेला गेली व तें पाहून प्रकाश आणखीच अस्वस्थ झाला.

व नंतर अर्ध्या तासानें तशा अस्वस्थ मनानेंच तो रश्मीबरोबर स्टेशनवर गेला व अगदीं त्रयस्थासारखा तिचा निरोप घेऊन तो सीता-गडला रवाना झाला.

स्टेशनवर रश्मीशीं बोलतांना त्याला जर कुणी पाहिलें असतें तर रश्मी कांहीं त्याची वाङ्‌निश्चित वधू आहे असें कांहीं त्याला वाटलें नसतें!

वाङ्‌निश्चित वधू!—बरोबरच आहे म्हणा!—निव्वळ वाचेनेंच निश्चित केलेली नाहीं? हा निश्चय ओंठापासून निघालेला—पोटापासून नव्हे! म्हणजे तो करते वेळीं बुद्धीचें व हृदयाचें मतैक्य झालेलें नव्हतें. मग त्या वाङ्‌निश्चयांत संपूर्ण जिव्हाळा कुठला असणार? नि मग तोंडावाटे तरी जिव्हाळ्याची भाषा कशी निघणार?

पांचट दुधाचें दहींहि पांचटच लागावयाचें!

# १८ कर्तव्याची एक बाजू

सीतागडला गेल्यानंतर दुसऱ्याच दिवशीं प्रकाश कमलेला भेटला. दत्त-विधानाचे व पुढील 'तीर्थाटना'चे दिवस आतां जवळ जवळ आल्यामुळें कमलाताईंच्या मनःस्थितीची भारी चलबिचल झाली होती.

तिनें प्रकाशकडे त्याबद्दल प्रत्यक्ष बोलून मुळींच दाखविलें नाहीं. पण वसंत ऋतूमध्यें आनंदभरानें गाणारी आनंदी कोकिळा आपण गातों आहों असें थोडेंच सांगतें! तिच्या स्वैरालापावरून तें ओळखूं येतें!—

त्याप्रमाणें माधवराव समोर असल्यावेळीं सकारण, अकारण हंसणाऱ्या, लाजणाऱ्या कमलाताईंच्या बावऱ्या मनःस्थितीचें आकलन तिनें कांहींहि न सांगतांच होऊं शकत होतें!—

व त्यामुळें माधवरावाला प्रत्यक्ष व कमलाताईला अप्रत्यक्ष चिडविण्यांत प्रकाशला भारी गंमत वाटे. अशा वेळीं स्वतःच्या अवघडलेल्या मनः-स्थितीचा त्याला थोडाफार विसर पडे.

बाकी आपली मनःस्थिति हल्लीं पूर्ण ठिकाणावर नाहीं हें जरी प्रकाशला कळत होतें तरी कौमुदीवर आपलें अंतस्थ गूढ प्रेम असल्यामुळें आपण रश्मीबरोबर ठरविलेला विवाह विवाह आपल्याला इतका तापदायक होतो आहे हें कांहीं त्याला कळलें नाहीं—

आणि तें कळणार तरी कसें? त्याबद्दल त्यानें विचार केला तर ना!

तसा विचार करण्याची आवश्यकता आहे हें तरी आधीं त्याच्या कुठें डोक्यांत आलें होतें ? —

त्याची वृत्ति कमालीची प्रामाणिक होती. रश्मीबरोबर आपला विवाह ठरला असल्यामुळें तिच्यावरच आपलें प्रेम आहे असें तो गृहीत धरूनच चालला होता. व त्यामुळें कौमुदीविषयीं आपल्याला निव्वळ स्नेह वाटतो असेंच तो मानीत होता. व ह्या स्नेहाची हल्लीं फार चटक लागल्यामुळें रश्मीकडे आपलें दुर्लक्ष झालें अशी तो आपल्या ह्या मनःस्थितीची सरळ संगति लावीत होता. ह्यामध्यें तो कसलीहि लबाडी करीत नव्हता.

रश्मीबरोबर विवाह ठरला असतां कौमुदीवर आपलें प्रेम जडूं शकेल ही कल्पनाच: त्याच्या मनांत कधीं उद्भवली नाहीं. त्याची मनो-वृत्ति विलक्षण सरळ व निर्व्याज होती.

कौमुदीच्या मैत्रीची आपल्याला हल्लीं फार आवड झाली आहे हें त्याच्या लक्षांत आलें होतें तरी मैत्रीच्या ह्या शुभ्र पाण्यांत प्रीतीचा गुलाबी रंग मिसळला असेल अशी भावनाहि त्याच्या मनाला अद्यापि शिवली नव्हती !

मात्र रश्मीच्या त्या नटव्या, नाटकी प्रेमानें त्याला विटल्यासारखें होई. सीतागडला आल्यावर मनाला एक वेगळा विरंगुळा म्हणून माधव—कमले-च्या प्रेमरहस्यांत तो पूर्णपणें गुंगला.

पण मनुष्य रोज रोज इतरांच्या प्रेमरहस्यांत तरी किती गुंगणार ! शिवाय पहिले ५।६ दिवस ह्या विषयावर बोलून झाल्यावर कमला स्वतःच दुसऱ्या विषयाकडे वळली.

तो दुसरा विषय म्हणजे तिची आवडती कौमुदी व तिचें गुणवर्णन. कमलेनें काढलेल्या ह्या विषयांतहि प्रकाश खूप रंगूं लागला. पण नंतर लगेच त्याला आठवण आली कीं, कौमुदीचा आपल्याला इतका ध्यास लागणें योग्य नाहीं.

व म्हणून नंतर १।२ दिवसांनीं तो कमलेला म्हणाला, "काय हो कमलाताई, प्रीतीची बाधा झाली कीं माणसं अगदीं स्वार्थी बनतात वाटतं !

"म्हणजे ?" प्रकाशच्या ह्या प्रश्नाचा अर्थ न कळूनहि उगीचच एक

मुरका मारीत व समोर बसलेल्या माधवरावाकडे ओझरता कटाक्ष टाकीत कमलेनें विचारलें.

" अं – नाहीं म्हटलं, माधवाच्या व तुमच्या प्रेमरहस्यावर आपण इतके दिवस बोललों पण इतरांबाहि तशीं प्रेमरहस्यें असतील असा विचार कांहीं तुमच्या मनांत आला नाहीं – "

" अगबाई, म्हणजे ? हूं तुम्हीं आपल्या स्वतःविषयीं कां बोलतां आहां ? "

" होय – माझा – माझा – विवाह ठरला आहे. " एकादी सर्व-साधारण बातमी सांगावी तसें प्रकाश बोलला. व मग त्याचे त्यालाच ह्या-बद्दल आश्चर्य वाटलें कीं, माधवराव व कमला स्वतःच्या विवाहाच्या इतरां कडून होणाऱ्या उल्लेखानेंहि लाजतात मग आपल्या विवाहाचा आपणच उल्लेख करिते वेळीं आतां आपल्याला कां तसें वाटूं नये ? –

कां वाटूं नये ? – हं ! – प्रश्न तर खराच पण त्याचें उघड उत्तर हें कीं, लज्जा ही प्रीतीची धाकटी बहीण आहे व जिथें प्रीति असते तिथेंच लज्जा आढळते !

पण ह्या बाबतींत असा कांहीं विचार करावयास प्रकाशला आतां सवड मिळाली नाहीं. कारण त्याचें बोलणें ऐकतांच कमलेनें मोठ्या उत्सुकतेनें विचारलें, " खरंच ? कुणाबरोबर ? की — "

पण तिला पुरतें बोलूं न देतां प्रकाश उत्तरला " रश्मि पंडित हिच्याबरोबर — "

" होऽऽय ? – आणि रश्मि कोण ही ? " हा प्रश्न करितेवेळीं कमलेच्या स्वरांत उमटलेली निराशा प्रकाशलासुद्धां कळून आली. व कां तें न कळून, त्यानें एक मंद निःश्वास सोडला.

पण तेवढ्यांत माधवरावानें म्हटलें, " म्हणजे दिवाणबहादूर पंडितांची कन्या कीं काय ? "

व ह्या प्रश्नाला प्रकाशनें मानेनेंच होकार दिला. कारण त्याचें चित्त आतां ठिकाणावर नव्हतें —

त्याला हा विचार एकसारखा सतावीत होता कीं, आपला विवाह

ठरला आहे हें कळतांच तो कौमुदीबरोबर ठरला असणार असें कमलाताई कां समजली ? — छेः छेः ! कौमुदी आपली मैत्रीण आहे — तिचा व आपला खूप स्नेह आहे पण आपलें प्रेम रश्मीवर आहे.

होय — रश्मीवरच आहे – कारण तिच्याबरोबरच आपला विवाह ठरलेला आहे.

भोळा प्रकाश ! – जी गोष्ट खरोखरीच सत्य असते तिचें कधीं असें पुनः पुनः प्रतिपादन कां करावें लागतें !

आणि रश्मीवरील आपल्या प्रेमाची हल्लीं वारंवार आपल्या हृदयाला आठवण द्यावी लागते हें मात्र प्रकाशाच्या लक्षांत येऊन चुकलें होतें. पण रश्मीवर आपलें–हृदयाच्या खऱ्या जिव्हाळ्याचें प्रेम नसल्याचा हा परिणाम आहे असें बरीक त्याच्या ध्यानांत आलें नाहीं. त्यानें आपला असा सरळ हिशेब केला कीं, रश्मीवरील प्रेम आणि कौमुदीबद्दलचा स्नेह हीं आपल्या हृदय-तराजूचीं दोन पारडीं आहेत. व हल्लीं कौमुदीबरोबर ती नाटिका लिहिण्याच्या वगैरे धांदलींत आपला वेळ तिच्या सहवासांत अधिक गेला. व त्यामुळें तराजूचें तें पारडें अधिक जड झालें इतकेंच !

पण समवयस्कांमधील स्नेह कितीहि मधुर असला तरी तारुण्योद्भव प्रीतीपुढें तो फिका पडणारच ही साधी गोष्ट प्रकाशाच्या ध्यानांत आली नाहीं. कारण त्या खऱ्या प्रीतीची त्याला अद्यापि ओळख पटली नव्हती.

रश्मीबद्दल वाटणाऱ्या आकर्षणाला तो प्रीति हें नांव देऊं पहात होता आणि कौमुदीवरील प्रीतीला स्नेहाच्या नांवाखालीं ओळखीत होता. मग त्याची अशी दिशाभूल झाल्यास नवल काय ?

परंतु तरीहि कौमुदीबद्दल आपल्याला फार आपुलकी वाटते हें ओळखून कीं काय, तिच्याबरोबरच आपला विवाह ठरला असणार असें कमलाताईनें गृहीत धरलें हें मधां कळतांच त्याला चमत्कारिक वाटलें. त्याच्या प्रामाणिक हृदयाला तें गैर वाटलें.

प्रकाशाच्या मतें, मानवी हृदय हें जणूं चावीच्या मोटरसारखें असतें. चावी देऊन मोटर एका विवक्षित दिशेनें सोडली कीं, ती जशी तिथें गेलीच पाहिजे तसें एखाद्या तरुणानें अमुक एका तरुणीबरोबर विवाह

ठरविका कीं तिच्यावरच त्याचें प्रेम स्थिर राहिलें पाहिजे असें तो खरोखरीच समजत होता.

पण जमीन वेडीवांकडी लागली तर निर्जीव मोटर देखील जर पट्‌दिशीं वेगळ्या दिशेला वळते तर सजीव हृदयसुद्धां तसेंच कारण घडल्यास अमुक एका विवक्षित व्यक्तीपासून इतरत्र नाहीं कां वळणार !

पण छेः !—प्रकाशला ही कल्पना पटणें मुळीं शक्यच नव्हतें.

रश्मीवर आपलें प्रेम आहे, असलें पाहिजे या कल्पनेलाच तो कवटाळीत होता. त्यामुळें कौमुदीच्या स्नेहापायीं रश्मीकडे आपल्या हृदयाचें दुर्लक्ष होत आहे असें वाटतांच तो स्नेहच दूर सारला पाहिजे असें त्यानें ठरविलें व तदनुसार सीतागडला पक्का सव्वा महिना राहूनहि त्यानें कौमुदीला एक-सुद्धां पत्र घातलें नाहीं. जणूं कांहीं आपल्या विचारांना असें आचारांचें बंधन घालतां येतेंच !

पण त्यानें आपल्याकडून प्रयत्न तर केला. व त्या प्रयत्नाला बळकटी आणण्यासाठीं म्हणून तो दर चार, सहा दिवशीं रश्मीला पत्रें पाठवूं लागला.

हीं पत्रें बहुशः एकाच धर्तीचीं असत. वाड्याच्या कामाची थोडीशी हकीकत, परस्परांच्या प्रकृतीची औपचारिक खुशाली व हवापाण्याचा उल्लेख इतकाच मजकूर त्यांत असे. व रश्मीकडून ह्या पत्रांचीं उत्तरें क्वचित्‌च व तींहि घाईत खरडलेलीं अशींच येत तरी त्यामुळें प्रकाशच्या पत्रलेखनांत कांहीं खंड पडला नाहीं.

बरोबरच आहे !—तो कर्तव्य म्हणून रश्मीला पत्रें लिहीत होता ना ! मग ह्या कर्तव्यपालनांत हृदयाचा संबंध कुठें होता ! केवळ बुद्धीच्या शिकवणी बरहुकूम तो हें कर्तव्य बजावीत होता. झालं !

## १९ कर्तव्याची दुसरी बाजू !

आणि गंमत अशी कीं, कौमुदीचा स्नेह मुद्दाम असा कमी केल्यानें प्रकाशला खेद वाटत होता तरी कौमुदीला वाटत नव्हता. कारण प्रकाशच्या प्रामाणिक हृदयाची तिला प्रत्यक्ष प्रकाशहूनहि अधिक ओळख होती.

त्यामुळें सीतागडला जाण्याच्या वेळीं प्रकाशच्या अकारण तुटकपणानें तिचें मन जरी खिन्न झालें तरी थोड्या विचाराअंतीं ह्या तुटकपणाचा कार्यकारणभाव तिनें बरोबर शोधून काढला.

आपल्या व त्याच्या वाढत्या मैत्रीचें प्रकाशला भय वाटूं लागलें आहे व म्हणून तो ही मैत्री कमी करूं पहात आहे हें तिनें ओळखलें. व त्यामुळें तिला वाईट वाटलें तरी प्रकाशला आपल्याविषयीं नुसता स्नेह वाटत नाहीं हें कळून तिला आनंदहि वाटला !

पण—परिस्थिति अशी असूनहि, रश्मीवर त्याचें खरें प्रेम नसूनहि मोहवशतेपायीं तो हा विवाह करणार होता !

म्हणजे पोहावयाला येत नसतांना हातपाय बांधून घेऊन समुद्रांत उडी टाकण्यासारखेंच नाहीं कां हें कृत्य ?

केवढा हा आततायीपणा !

पण—पण—प्रकाशला तो कसा कळून येणार ?

रश्मीला दिलेलें विवाहाचें वचन तो कदापि मोडणार नाहीं.

मग पुढें काय होणार ?

कौमुदीनें ह्यावर कितीतरी विचार केला. रात्रींच्या रात्रीं जागून काढल्या व शेवटीं ठरविलें कीं, अशा स्थितींतहि जर प्रकाश रश्मीबरोबर विवाह करूं लागलाच तर त्याला वस्तुस्थिति नीट समजावून देण्याचा प्रयत्न करावयाचा !

आणि—प्रकाश आपलें सांगणें ऐकून घेईल ?

त्याप्रमाणें तो वागेल ?

हो—वागेल !

आपल्याबद्दल त्याला जर खरा निर्व्याज स्नेहच वाटत असला, आपल्या व त्याच्या मैत्रीमध्यें कुठेंतरी धोका आहे असें जर त्याला वाटत नसेल तर तो आपली मैत्री सुरूं ठेवील व आपल्या मैत्रीच्या मंत्रोच्चारानें त्याच्या मानगुटीवर बसलेलें हें मोहपिशाच्च दूर पळून जाईल !

पण—प्रकाशला हल्लीं आपल्याबद्दल नुसता स्नेहच वाटत होता काय ?

कौमुदीचें हृदय पुनः पुनः तिला 'नाहीं नाहीं' म्हणून सांगूं लागलें.

व तिनें पुष्कळ विचाराअंतीं असा आडाखा तयार केला कीं, प्रकाशला जर आपल्याविषयीं हल्लीं व पूर्वीं खरोखरीच निर्मळ मैत्री वाटत असेल तर सातारहून तो आपल्याला एकहि पत्र पाठविणार नाहीं.

त्याची अतिप्रामाणिक व लवचिक मनोवृत्ति त्याला पत्र लिहूं देणारच नाहीं !

व त्यानें स्वतःशीं सुद्धां जरी तें कबूल न केलें तरी त्याला आपल्याविषयीं साध्या मैत्रीपेक्षां विशेष कांहींतरी वाटत आहे असें ह्यावरून उघड होईल.

व मग तरीहि दिलेलें वचन पुरें करण्यासाठीं तो जर रश्मीबरोबर विवाह करावयास तयार झाला तर लाज, भीड दूर सारून आपण त्याला त्याच्या हृदयाची ओळख पटवून द्यावयाची !

मात्र त्याचें वस्तुतः आपल्यावर प्रेम आहे—असेल असा उल्लेखहि करावयाचा नाहीं !

फार काय, त्यानें आपल्याबरोबर लग्न न केलें तरी हरकत नाहीं पण रश्मीवर प्रेम नसतांना त्याला तिच्याशीं विवाह करूं द्यावयाचा नाहीं !

बस्स !— ह्या दिशेनें आपण शक्य ते प्रयत्न करावयाचे असें कौमुदीनें ठरविलें.

व आपण दर्शविलेला आडाखा बरोबर येतो कीं चुकतो हें कळण्याची ती मार्गप्रतीक्षा करूं लागली !

आणि आडाखा बरोबर आला !

एरवीं मोकळ्या मनानें तिला पत्रें पाठविणाऱ्या प्रकाशनें सीतागडहून तिला एकहि पत्र पाठविलें नाहीं.

व त्यावरून आपल्या व त्याच्या वाढत्या मैत्रीचें त्याला भय वाटत आ व म्हणून ती मैत्री कमी करावयाला तो पहातो आहे हें कौमुदीनें ओळ व तिला त्यांतल्या त्यांत बरें वाटलें.

आतां ह्याउप्पर प्रकाश जर रश्मीबरोबर विवाह करूं लागल, त्याला त्यापासून परावृत्त करण्याचा अधिकार आपल्याला आहे जाणीव तिच्या अंतःकरणांत उत्पन्न झाली !

किती मजेदार योगायोग हा !

कौमुदीशीं असणारा स्नेहभाव दूर सारल्यानें रश्मीशीं विवाह क आपल्या कर्तव्याचें पालन करणें सुलभ होईल असे वाटून तो दूर सारण्याची पहिली पायरी म्हणून प्रकाशनें कौमुदीला एव धाडलें नाहीं !

व त्यानें एकहि पत्र न पाठविल्यामुळें, त्याचें त्यालाहि कळ नसेल तरी वस्तुतः त्याचें आपल्यावर प्रेम आहे हें कौमुदीनें ओ म्हणून तो रश्मीशीं करूं पहात असलेल्या निष्प्रेम विवाहांत मोडा आपल्या कर्तव्याचें पालन करावयाचे असें कौमुदीनें ठरविलें.

म्हणजे एकाच वेळीं व एकाच घटनेमुळें प्रकाश व कौमुदी या अगदीं परस्पर विरुद्ध अशा कर्तव्याचे पालन करण्याचा निश्चय केला !

रश्मीशीं ठरलेला विवाह पार पाडणें हें आपलें कर्तव्य आहे व तें रीतीनें पालन करावयाचें असें प्रकाशनें ठरविलें व रश्मीशीं ठरलेले

प्रकाशाच्या विवाह पार पाडूं न देणें हें आपलें कर्तव्य आहे व तें आपण योग्य रीतीनें पालन करावयाचें असें कौमुदीनें ठरविलें !

एका वेळीं जन्मलेल्या बालकांची दैवरेषा जर परिस्थित्यनुरूप वेगवेगळी उमटते तर एकाच वेळीं ठरविलेल्या घटनांची रूपरेषा परिस्थित्यनुरूप वेगवेगळी घडणारच !

# २० "शाळेतुनी घराला येतां धरील पोटीं"

पुऱ्या सव्वा महिन्यानें प्रकाश मुंबईला परत आला. त्याच्याकडून एकहि पत्र आलें नसल्यामुळें तो केव्हां येईल ह्याबद्दल कौमुदीला कांहींच कल्पना नव्हती. तरीसुद्धां एक, दोन दिवशीं गड्याकडून प्रकाशची खोली ती झाडून घेत असे.

साधारणतः एका महिन्यानें आपण परत येऊं असें जाण्याच्या आदल्या दिवशीं प्रकाशनें तिला म्हटलें होतें परंतु ही मुदतच जेव्हां टळून गेली तेव्हां प्रकाश मुद्दामच तिथें जास्ती दिवस रहात आहे कीं काय अशी कल्पनाहि तिच्या मनांत येऊन गेली. पण त्याच वेळीं निदान रक्मीसाठीं तरी तो शक्य तों लौकर इथें येईल असा 'दुष्ट व खवचट' विचार तिच्या डोक्यांत उद्‌भवलाच.

कारण कौमुदी कितीहि विचारी असली तरी प्रकाशच्या तुटक वागण्यामुळें तिला कसेंतरीच वाटे. प्रकाशच्या प्रेमाचा आपल्याला लाभ होणार नसला म्हणजे त्याच्या मैत्रीलाही आपण अंतरलेंच पाहिजे काय असें वाटून तिला खेद होई !

पण लगेच प्रकाशच्या चंचल, भावनाप्रवण मनोवृत्तीची तिला आठवण येई व शिवाय असेंहि वाटे कीं आपला सहवास टाळण्याचा जरी तो प्रयत्न करीत असला तरी हरेक बाबतींत आपली मदत घेण्याची, आप-

त्याला प्रत्येक गोष्ट सांगण्याची इतक्या दिवसांची संवय त्याला काय अशी एकाएकीं सुटेल ?—

आज ना उद्यां, तो स्वतःचे सुखदुःख खात्रीनें आपल्याकडेच सादर करील.

आईवर अभिमानानें रागावून बसलेला मुलगा कांहीं वेळानें परत आईच्याच कुशींत नाहीं कां घुसत !

तसा प्रकाशहि आपल्याकडे परत येईल.

खरंच, कौमुदी प्रकाशला किती उत्तम ओळखीत होती.

सव्वा महिन्यानें प्रकाश मुंबईला परतला. पण त्यावेळी कौमुदी शाळेंत गेली होती. आणि ती शाळेंतून आल्यावेळीं तात्यांची भेटहि न घेतां प्रकाश बाहेर निघून गेला होता. त्यामुळें कौमुदीला त्याच्या आगमनाची जाणीव नव्हती.

शाळेंतून आल्यावर तिनें चहा घेतला, व तात्या फिरावयाला गेल्यानंतर ती आपल्या खोलींत खिडकीशीं बसून 'यशोधन' वाचूं लागली.

त्यांतील 'आई' ही कविता कौमुदीला अतिशय आवडत असे. त्यांत वर्णन केलेल्या आईच्या वात्सल्याचा वयाच्या तेरा वर्षपर्यंत तिनें अनुभव घेतला असल्यामुळें आपल्या प्रेमळ आईची स्मृति तिच्या अंतःकरणांत चांगलीच दृढ होती !—

आईच्या मृत्यूनंतर शाळेंतून घरीं आल्यावेळीं कौमुदीच्या बालहृदयाला मातृविरह अतिशय व्यथित करीत असे.

> "शाळेंतुनी घराला येतां धरील पोटीं,
> काढून ठेविलेला घालील घास ओठीं."—

अहा !— आईच्या मायेचें यशवंत कवीनें किती यथार्थ वर्णन केलें आहे.

कौमुदी शाळेंतून आल्यावर तिची प्रेमळ आई तिला अशीच पोटाशीं धरीत असे. व मग लगेच तिला ऊन चहा व कांहीं तरी फराळाचें ती खाऊं घालीत असे.

पण—पण आई गेल्यावर तें सारें संपलें !— व त्या बरोबरच कौमुदीचे बाल्यहि कायमचें संपलें !

तेरा वर्षांच्या कोंवळ्या वयांत कौमुदीवर घरसंसार व स्वयंपाकपाणी संभाळण्याची जबाबदारी पडली.

पुढें पुढें संवयीनें तिच्या तें अंगवळणी पडलें तरी—आतां ती तेवीस वर्षांची झाली होती तरीहि अद्यापि शाळेंत शिकवून, दमून भागून घरीं आल्यावेळीं तिला आईचा विरह तितकाच कधींकधीं जाणवें !

आई असती तर ?

तर — तर— घरीं दमून श्रमून आल्यावर आपणच चहा करून घ्याव-याचा व अतिशयच श्रमल्यावेळीं चहाला अजिबात फांटा द्यावयाचा हे त्रास चुकले असते !

आईनें किती आवडीनें, कौतुकानें आपल्याला चहा करून दिला असता ! आपण घरीं येण्याच्या वेळीं ती आपली वाट पहात दारांत उभीच राहिली असती !

आई — आई ग—

कौमुदीच्या डोळ्यांतून दोन चार अश्रूबिंदू ओघळले. ते पुसण्यासाठीं तिनें हात वर केला इतक्यांत दारांतून हांक ऐकूं आली.

" कौमुदी, कौमुदी—"

कौमुदीनें दचकून तिथें पाहिलें.

दारांत प्रकाश उभा होता—

हळूहळू पुढें येत तो म्हणाला, " कौमुदी, मी आलों आहे."

चटदिशीं डोळे पुसून कौमुदी खुर्चीवरून उठणार इतक्यांत प्रकाश तिच्या खुर्चीजवळ खालीं सतरंजीवर बसला व तिच्या गुडघ्यावर आपला हात ठेवीत मंद स्वरांत तो म्हणाला, " कौमुदी, मी आतां रश्मीकडून आलों— माझ्या गैरहजेरींत तिनें बाळासाहेब सरदाराबरोबर विवाह ठरवून टाकला. आमचा ठरलेला वाङ्निश्चय तिनें मोडला. नि म्हणून मी तुझ्या-कडे आलों आहे."

" नि म्हणून मी तुझ्याकडे आलों आहे —"

किती सरळ निर्व्याजतेनें प्रकाश बोलला.

मघां वाचीत असलेल्या कवितेंतील तो चरण कौमुदीला आठवला.

 " शाळेंतुनी घराला येतां धरील पोटीं ! "

" शाळेतुनी घराला येतां धरील पोटीं–"

–खरंच, जगाच्या शाळेंत आज नवा, कडु धडा शिकून प्रकाश घरीं आपल्यापाशीं आला आहे !

त्याला आतां आपणच नको कां पोटाशीं धरावयाला ?

रश्मीनें त्याचा स्वाभिमान दुखविला आहे व तें दुःख तो आपल्या पाशीं घेऊन आला आहे.

तें दुःख आतां आपणच निवारलें पाहिजे !

कौमुदीनें स्नेहभरानें त्याच्याकडे पाहिलें –

त्याची मुद्रा त्रासिक, रागीट व ओशाळी दिसत होती.

कौमुदीनें त्याच्याकडे पहातांच कांहींशा फुरंगटलेल्या स्वरांत तो म्हणाला "हूं ! रश्मीला माझी किंमत अगदीं कवडीमोलाची वाटते होय ? तर मग मलाहि तिची पर्वा नाहीं. कौमुदी तूं माझ्याबरोबर लग्न कर म्हणजे चांगला नक्षा उतरेल तिचा – अं ? "

प्रकाशच्या ह्या विक्षिप्त मागणीला काय उत्तर द्यावें तेंच कौमुदीला कळेना !–

प्रकाशवर तिचें दृढ प्रेम होतें. त्याच्याशीं आपलें लग्न व्हावें अशी तिची फार इच्छा होती. पण ती इच्छा अशा रीतीनें पुरी व्हावी असें मात्र तिला मुळींच वाटत नव्हतें.

रश्मीचा नक्षा उतरविण्यासाठीं – आपला दुखविलेला स्वाभिमान पुनः प्रस्थापित करण्यासाठीं – प्रकाशनें आपल्याबरोबर विवाह करण्याची इच्छा प्रकट करावी हें तिला कसें आवडेल ?–

प्रकाशच्या ह्या पोरकटपणाची तशा स्थितींतहि तिला मौज वाटली ! प्रकाशच्या स्वभावाशीं त्याची ही कृति अगदीं सुसंगतच होती !

आपल्याला हवेंसें वाटणारें खेळणें दुसऱ्या मुलानें विकत घेतलें म्हणजे त्याच्या नाकावर टिचण्यासाठीं ह्या चिडलेल्या मुलानें समोर दिसेल तें खेळणें विकत घ्यावें त्यांतलाच प्रकार हा !

वास्तविक रश्मीबद्दल प्रकाशला वाटणारें आकर्षण अद्यापि अगदीं दूर झालें नव्हतेंच–व मुख्य म्हणजे, आजवर प्रत्येक परीक्षेंत पहिला आलेल्या,

आपल्या मगदुरावर आज महिन्याला अडीचशें रुपये मिळविणाऱ्या प्रकाशाला रश्मीनें केलेला अपमान असह्य झाला होता. त्याचा अभिमान डिवंचला गेला होता.

कौमुदीला प्रकाशाची कींव आली.

लहान मुलाला थोंपटावें तसें तिनें प्रकाशला खांद्यावर थोपटलें.

त्याबरोबर तिच्याकडे पहात प्रकाशनें पुनः म्हटलें, "मग काय कौमुदी, तूं करणार ना माझ्याशीं लग्न?"

क्षणमात्र विचार करून स्निग्ध स्वरांत कौमुदी उत्तरली, "लग्न करण्याची एवढी काय घाई आहे? प्रकाश, मीं मैत्रीण आहे ना तुझी? आपण किनई पूर्वीप्रमाणें खूप गप्पा गोष्टी करूं, माधवकमलेचा विवाह निर्विघ्नपणें घडवून आणूं काय?"

कौमुदीचें हें उत्तर ऐकतांच प्रकाशची मुद्रा किती पण निवळली, त्याच्या चर्येवरील मघांचा तो कडवटपणा दूर झाला. तो थोडासा हसला सुद्धां व खेळकरपणानें म्हणाला, "कौमुदी, तूं मोठी जादूगारीण आहेस बघ. तुझ्याकडे जरा बोलल्याखवरल्यानेंच मनाला किती हलकं वाटतं ग?"

"मग? जह मनाला हलकेपणा आणणारी जादुगारिण अशी पाटी लावूं या काय माझ्या खोलीला?" संभाषणांत मोकळेपणा आणण्यासाठीं कौमुदीनें बळेंच विनोद केला.

पण ह्यावर प्रकाश हंसला नाहीं. तो कांहींतरी विचार करीत होता. २-३ मिनिटांनीं तो म्हणाला, "कौमुदी, तुला तें सांगावं कीं नाहीं असा प्रश्न पडला आहे मला. पण तुझ्यापासून कांहीं लपवावं असं मला वाटत नाहीं. म्हणून सांगतोच तुला. बघ कौमुदी, मघां माझ्याशीं लग्न करण्याबद्दल मी तुला विचारलं ना, त्याला तूं नकार दिलास त्यामुळें मला कसं बरं वाटलं. म्हणजे तूं होकार दिला असतास तर मी माघार घेतली असती असें नव्हें हं. पण नुसत्या रागाच्या भरांत तुला मी मागणी घातली होती! खरं म्हणजे मला मुळीं लग्न करण्याची इच्छाच नाहीं! मीं हें तुला स्पष्ट सांगितलं म्हणून रागावूं नकोस हं माझ्यावर!"

आणि प्रकाशच्या ह्या स्पष्टोक्तीचा कौमुदीला राग आला नाहीं तरी

तिला वाईट मात्र वाटलें. रश्मीबद्दल प्रकाशला अद्यापि आकर्षण वाटतें आहे हें त्याच्या ह्या शब्दावरून ध्वनित होत असतां तिला खेद झाल्याशिवाय राहील ? पण त्यांतल्यात्यांत तिला इतकेंच बरें वाटलें कीं, प्रकाशनें निव्वळ रश्मीवरील रागाच्या भरांत मघां आपल्याला मागणी घातली हें ओळखून आपण त्याला नकार दिला हेंच योग्य झालें.–

कारण कौमुदीचें प्रकाशवर एवढें प्रेम होतें कीं, त्याच्या नखालाहि धक्का लागू नये म्हणून तिनें केव्हांही आपल्या जिवाचा अगदीं आटापिटा केला असता !

पण ती नुसती भावनाप्रवण नव्हती. प्रसंगी भावनेला विचाराची मुरड घालावी लागते हें ती ओळखून होती. व त्यामुळें प्रकाशनें हृदयाच्या जिव्हाळ्यानें आपल्याला मागणी घातलेली नाहीं हें ओळखून तिनें त्याला मघां नकार दिला.

मात्र तो देण्यापूर्वी त्याला शब्दानें आपल्याशीं बांधून ठेविलें तर रश्मीच्या मोहपाशांत पुनः अडकण्याची त्याला मनाई होईल हें मनांत येऊन त्याच्या मागणीचा स्वीकार करण्याचा मोह तिला पडला होता.

पण हृदयाला– त्यांतून विकाराच्या आहारी गेलेल्या हृदयाला बंधनें कुठवर घालतां येणार असें वाटून प्रकाशला नकार देणेंच तिनें इष्ट ठरविलें. व आतां प्रकाशची ही स्पष्टोक्ति ऐकून तर आपण नकार दिला हें अतिशयच बरें झालें असें तिला वाटलें. तरी सुद्धां प्रकाशवरील आपल्या प्रेमाची त्याला अद्यापि जाणीव होत नाहीं असें मनांत येऊन तिचें हृदय व्यथित झालें.

पण तिनें लगेच स्वतःला सावरलें. प्रकाश वयानें मोठा असला, आपल्याहून त्यानें अधिक पावसाळे पाहिलेले असले तरी तो अजाण आहे, पोरकट आहे, खुळ्या दुरभिमानानें त्याची अद्यापि दिशाभूल होत आहे. तेव्हां त्याचें बोलणें काय मनाला लावून घ्यावयाचें ? – तो चुकला तरी आपण आपलें कर्तव्य नीट बजाविलें पाहिजे.

" शाळेतुनी घराला येतां धरील पोटीं " हें प्रेमळ आईचें वात्सल्य आपण त्याला दाखविलें पाहिजे – व असें मनांत येऊन कौमुदीनें वात्सल्य स्निग्ध प्रेमानें आपला हात प्रकाशच्या अवनत मस्तकावर ठेविला.

# २१ नाटकाची प्रस्तावना !

कौमुदीच्या ह्या मातृतुल्य ममतेनें केवढें तरी काम केलें. मघां रश्मीकडून आल्यावेळीं त्रासिक, रागीट दिसणारा प्रकाश किती चटकन् नेहमींसारखा हंसरा, बोलका बनला.

त्या रात्रीं अकरा वाजेपर्यंत तो कौमुदीला सीतागडची सर्व बारीक-सारीक हकीकत सांगत होता.

तेथील नव्या वाड्याचें काम बहुतेक संपत आलें आहे, वाडा किती सुंदर व नवीन पद्धतीचा बांधला आहे, त्यांत सर्व आधुनिक सोयी कशा केल्या आहेत, त्याच्या बांधकामावर देखरेख करीतांना आपल्याला किती त्रास पडला व परवां आपले साहेब तिथें आल्यावेळीं कामाचा उत्कृष्ट 'प्रोग्रेस' बघून आपल्यावर ते कसे खूष झाले व पुढील महिन्यापासून आपल्याला पन्नास रुपयांची बढती कशी मिळणार आहे वगैरे माहिती सांगून तो माधव– कमलेच्या विषयाकडे वळला.

व कांहींशा गंभीर आवाजांत तो म्हणाला, " कौमुदी, माधवकमलेचा विवाह घडवून आणण्यासाठीं आपण करणार असलेलें हें नाटक आतां लौकरच सुरूं होणार. आणखी आठ दिवसांनीं म्हणजे पुढल्या गुरुवारीं नाटकाची नांदी आहे हं—"

" नाटकाची नांदी ? म्हणजे काय ? "

" वा: ! अग, दत्तविधान ! दत्तविधान म्हणजे आपल्या नाटकाची

नांदीच नव्हे काय ? दत्तविधान आटोपलें कीं, प्रजेला नापसंत असलेला मुलगा दत्तक घेतल्यामुळें प्रजाजनांचा राणीसाहेबांवर होणारा रोष टाळण्यासाठीं कमलाताईला मथुरावृंदावनाला पाठवावयाचें नि मग पुढें नाटकाचे अंक पार पाडावयाचे. ''

'' अस्सं !—पण प्रकाश, ती वेळ आतां जवळ येऊं लागली तशी भीति वाटते बघ, मला. '' आपल्या कंठावर उजवा हात दाबीत कौमुदी घाबरल्या स्वरांत म्हणाली.

'' वाहवा:, तूंच एवढी भितेस. मग कमलाताईनें काय करावें ? त्या बिचाऱ्या हल्लीं ८।१० दिवस अगदीं भयभीत झाल्या आहेत. शक्यतों लौकर तूं सीतागडला आपल्याकडे निघून ये असा त्यांनीं तुला निरोप पाठविला आहे. आणि खरं सांगूं कौमुदी, त्या इतक्या भित्र्या आहेत कीं, ज्या प्रेमसौख्याला आपण आतां कायमची पारखी झालें आहे तें सुख माधवाशीं विवाह केल्यानें पूर्णांशानें आपल्याला लाभणार ही खात्री त्यांच्या हृदयाला असूनहि त्यांची बुद्धि आयत्या वेळीं त्यांच्या हृदयाला दगा देईल कीं, काय अशी शंका येते मला. आपण राणी असलें तरी सर्वसामान्य तरुणीप्रमाणें आपल्याला भावना आहेत, विकार आहेत हें त्यांच्या हृदयाला पटतें आहे पण बुद्धीला अद्यापि तितकें पटत नाहीं. कौमुदी, तूं एकदां म्हटलं होतंस त्याप्रमाणे त्यांच्या बुद्धिहृदयामध्यें रस्सीखेंच सुरू आहे नि अशावेळीं त्यांना धीर द्यावयाला जर तूं तिथें नसलीस तर आयत्यावेळीं त्या माघार घेतील नि स्वत: जन्माच्या दु:खी होऊन माधवालाहि दु:खी करतील ! त्यांनीं पुनर्लग्न केल्यानें वस्तुत: कुणाचेंहि नुकसान होणार नाहीं. सीतागड संस्थानांत त्या आजन्म कुजत पडल्यानें प्रजेचा काय फायदा होणार आहे ! प्रजेचें हित साधावयाचें थोडें तरी सामर्थ्य त्यांना आहे काय ! प्रजेला हवा असणारा मुलगा दत्तक घेण्याचा अधिकारहि त्यांना नाहीं. मग एकाद्या कळसूत्री बाहुलीप्रमाणें नाचण्यापेक्षां आमच्या माधवाच्या संसाराचीं सूत्रें स्वत: हातीं घेऊन त्यांनीं तीं नाचविणेंच इष्ट नाहीं काय ? ''

'' केव्हांहि इष्टच आहे ! प्रकाश, एकादी निर्जीव वस्तु कुसलेली आप-

त्याला पहावत नाहीं. मग तरुण विधवेचें सजीव हृदय कुसतांना आपण उघड्या डोळ्यांनीं कसं रे पहातों ? ”

“ कसं आणि काय ? हें बघ कौमुदी, पहाण्याची इच्छा नसली म्हणजे डोळ्यांवर कातडें ओढून सोईस्कर आंधळेपणा आणण्याची युक्ति आपल्या समाजाला अगदीं छान साधली आहे !– बरं, मग तूं येणार ना सीतागडला ? ”

“ होय. यावयालाच पाहिजे नाहीं ? ”

“ तर ग– कमलाताई तुझ्या वाटेकडे डोळे लावून बसल्या आहेत ना. ”

“ आणि तूं तर येणार असशीलच ? ”

“ हो, हो– दत्तविधानाला उपस्थित होण्याबद्दल दिवाणसाहेबांनीं मला आमंत्रण दिलं आहेच पण शिवाय, त्याच दिवशीं संध्याकाळीं व्हाइसरॉयच्या हस्तें त्या नव्या वाड्याचा उद्घाटन समारंभ होणार आहे ना ? ”

“ पण प्रकाश, त्या उद्घाटन समारंभापेक्षां दत्तविधानाचें महत्त्वच तुला अधिक वाटणार, नाहीं कां ? कारण दत्तविधान म्हणजे तुझ्या नाटकाची नांदी नि तूं तर नाटकाचा सूत्रधार. ”

“ हं, हं, खरं आहे.—नि हो खरं, कौमुदी, मग तुझ्या शाळेच्या वार्षिक समारंभाच्या वेळीं तें नाटक कसं काय झालं ग ? ”

“ फारच छान झालं रे– प्रेक्षकांना तें फारच आवडलं. नि त्यामुळें आमच्या प्रिन्सिपॉल्बाई भारीच खूष झाल्या माझ्यावर– नि तूं न आल्यानें त्या तितक्याच हळहळल्या नि––”

पण कौमुदीनें वाक्य अर्धेंच सोडलें. कारण बाई नुसत्या हळहळूनच थांबल्या नव्हत्या. त्यांनीं प्रकाशवरून कौमुदीची प्रच्छन्न चेष्टाहि केली होती. प्रकाशची व आपली नुसती खूप मैत्री आहे असें कौमुदीनें त्यांना सांगितलें तरी ह्या मैत्रीच्या भुंग्याच्या आंवर्तीभोंवतीं प्रीतीचा मध असणारच असा बाईंनीं दृढ तर्क केला होता व त्यामुळें प्रकाशला पहावयाला त्या फार उतावीळ झाल्या होत्या. व आतां बोलतांना भान न राहून कौमुदी ह्याबद्दल थोडासा उल्लेख करूं जात होती पण तेवढ्यांत तिनें सांवरलें.

ती एकदम बोलावयाची थांबतांच प्रकाश म्हणाला, "हं--बोल कीं पुढें."

" अं- काय बोलूं ? "

" अग, वाक्य पुरं तरी कर. 'नि तूं न आल्यानें त्या तितक्याच हळहळल्या नि--' असं बोलत होतीस आणि मध्येंच थांबलीस कां ? "

" अं-अं- छेः ! तसं नव्हतें मीं बोलत- 'नि तूं न आल्यानें त्या तितक्याच हळहळल्या ना' असं म्हटलं मी--" कौमुदीनें किती चट्दिशीं शब्द फिरविला- कशी झट्कन् सारवासारव केली !--

बाकी ह्यांत काय आश्चर्य म्हणा ? जिथें ती आपल्या हृदयांत नाचणाऱ्या नाजूक भावनांची प्रसंगानुसार सारवासारव करीत होती तिथें एकाद्या वेलांटी कान्ह्याची काय मात्रा ?--

एवढेंच नव्हे तर तिनें मग पट्दिशीं तो विषयसुद्धां बदलला. ती घाईघाईनें म्हणाली, " नि प्रकाश, कमलच्या माहेरच्या माणसांना दत्तविधानाला नाहीं ना बोलविलेलं ? "

" नाहीं बुवा ! त्या बाबतींत स्वतः कमलाताईनींच हेका धरला व दुसरी मौजहि अशी झाली अनायासें कीं, दत्तविधानाची कुणकुण थोडी ऐकून मागेंच कमलाताईच्या भावानें त्यांना पत्र धाडून आपल्या मुलाला दत्तक घेण्याचें सुचविलें होतें. व कमलाताईनीं तावडतोब तें पत्र दिवाणसाहेबांना दाखवून त्यांच्या करवीं आपल्या भावाला एक चांगलें खरमरीत पत्र धाडलें होतें. त्या प्रसंगापासून दिवाणसाहेबहि कमलाताईच्या माहेरच्या माणसांवर जरा नाराजच आहेत. कमलाताईच्या ऐश्वर्यावर त्या माणसांचा डोळा आहे असें वाटून दिवाणसाहेब त्या कुणाला संस्थानांत येण्याचीसुद्धां सलगी करूं देत नाहींत. त्यामुळें त्या घटनेविषयीं दिवाणसाहेबांना आतां आठवण देऊन त्या माणसाला दत्तविधानाच्या निश्चित दिवसाबद्दल माग मूसहि लागूं न देण्याची कमलाताईनीं सूचना केली व दिवाणसाहेबानांहि ती फार पटली. "

" अस्सं होय ? म्हणजे सुंठीवांचून खोंकला गेला म्हणावयाचा. सुरेख ! --" कौमुदी हंसून, आतां मनमोकळं हंसून, " म्हणाली.

व मग अशाच गप्पा गोष्टींत ते ५।६ दिवस गेले. व मौज अशी कीं,

आजपर्यंत, म्हणजे रश्मीशीं त्याचा विवाह ठरल्यापासून आजपर्यंत प्रकाशनें एकदांहि कौमुदीकडे रश्मीचा उल्लेख केला नव्हता. पण ह्या ५।६ दिवसांत त्यानें बऱ्याच वेळां तिचा उल्लेख केला.

सिंहगडला कमलाबाईला पाहिल्यावेळीं त्यांच्या सौंदर्याशीं आपण रश्मीच्या सौंदर्याची तुलना कशी केली ह्याबद्दल एक दिवस कौमुदीला सांगून त्यानें म्हटलें, " कौमुदी, तुझी कमलबाई फार सुंदर आहे पण रश्मीचें सौंदर्य तिच्यापेक्षां अधिक झगझगीत आहे. अगदीं सूर्यप्रकाशा-सारखेंच तेजस्वी आहे. "

ह्यावर कौमुदीनें मनांतल्या मनांत म्हटलें, " हं, तरीच ह्या सौंदर्याच्या सूर्यप्रकाशानें तुझे डोळे अद्यापि दिपलेले आहेत ते—"

उघड मात्र मात्र ती एवढेंच म्हणाली, " म्हणजे रश्मि हें तिचें नांव सार्थ आहे तर—"

" हो, अगदीं सार्थ ! नि ती अशी अव्यंग सुंदर आहे म्हणून तिच्या मुखकमलाभोंवतीं अनेक भुंगे गुंजत राहिले तर काय नवल ! नि मग त्यामुळें तिची वृत्ति कांहींशी चढेल झाली तरी काय नवल ! "

कौमुदीनें ओळखलें कीं, स्वारी अद्यापि विकाराच्या तडाक्यांत सांपड-लेलीच आहे. एवढयांत त्याला विचार सुचणार नाहीं.

तेव्हां रश्मीविषयीं चार दोन उपदेशाचे शब्द त्याला ह्यावेळीं सांगून उपयोग नाहीं. रश्मीचें सौंदर्य कितीहि जरी विलोभनीय असलें, कितीहि तरुण तिच्या नादीं असले तरी एकाद्या तरुणाला विवाहाचें वचन दिल्यावर तें मोडण्याचा तिचा हा चंचलपणा मुळींच क्षम्य नाहीं हें प्रकाशला आपण सध्यां सांगितलेलें रुचणार नाहीं हें ओळखून कौमुदी कांहीं बोलली नाहीं.

बाकी, कौमुदी रश्मीला चंचलपणाचा दोष लावीत होती व रश्मीनें केलेला अपमान इतक्या लौकर विसरणाऱ्या प्रकाशलाही चंचल ठरवीत होती आणि ती स्वतः काय कमी चंचल होती !—

रश्मीशीं ठरलेला प्रकाशचा विवाह मोडला जावा अशी तिची इच्छाच होती. पण आतां रश्मीनें तो मोडला तर तिला त्याबद्दल दोष द्यावया-लाहि कौमुदी तयार झाली हा चंचळपणाच नव्हे काय !

पण कौमुदीच्या ह्या बाह्यतः चंचलपणाला तसेंच कारण होतें.

ठरलेला विवाह रश्मीनें मोडला तरी त्यामुळें तिच्याविषयींच्या मोहांतून प्रकाशची सुटका होईल असें कौमुदीला वाटत नव्हते. प्रकाशचा नाद अशानें सुटणार नाहीं असा तिचा तर्क होता.

व तो तर्क अगदी खरा ठरला !– प्रकाश अद्यापि रश्मीविषयींच्या मोहांत गुरफटलेलाच होता. व त्यामुळेंच हा विवाह मोडला तरी कौमुदीला तितकासा आनंद झाला नाहीं.

एवढेंच नव्हे तर तिच्याशी बोलतांना प्रकाश जरी कधीं कधीं रश्मीला दोष देई व कधीं कधीं तिची बाजू घेई तरी कौमुदी ह्या निंदास्तुतींत थोडासुद्धां भाग घेत नसे !—

प्रकाशची वृत्ति अति प्रामाणिक व कमालीची अस्थिर आहे हें ठाऊक असल्यामुळेंच ती ह्या भानगडींत पडत नसे.

समजा, प्रकाशनें रश्मीला दोष दिल्यावेळीं कौमुदीनें जर तिची बाजू घेतली असती तर प्रकाशला लगेच तें पटलें असतें व झाल्या घटनेंत रश्मि सर्वस्वीं निर्दोषी आहे असें पक्कें ठरवून तो आणखीच तिच्या आहारीं गेला असता !

बरं, कौमुदीनें जर रश्मीची निंदा केली असती तर त्याच्या खुळ्या प्रामाणिक हृदयाला व निःसीम विश्वासू वृत्तीला तें आवडलें तर नसतेंच पण कौमुदीच्या ह्या उद्गारावर प्रतिक्रिया म्हणून रश्मीच्या अंगांत वास्तविक असलेल्या दोषाकडे तर त्यानें पूर्ण डोळेझांक केली असतीच पण तिच्या अंगांत नसलेले गुणहि त्यानें तिला बहाल केले असते व तिला निर्दोष व अखिल गुणसंपन्न समजून तिच्या ह्या काल्पनिक मूर्तीच्या पूजेंतच तो गुंगून राहिला असता ! –

असा कांहीं विचित्रच स्वभाव त्याचा होता.

व तो पुरा ओळखीत असल्यामुळेंच रश्मीच्या बाबतींत कौमुदीनें त्याच्याकडे मौनाचें धोरण स्वीकारलें होतें व ज्या ज्या वेळीं तो होऊन तिचा विषय काढी त्या त्या वेळीं शक्य तों ती विषयांतरच करी व लौकरच घडून येणाऱ्या नाटकाची प्रस्तावनाच ती बहुतकरून सुरूं करी !–

# २२

## नांदी !

व मग कौमुदी सीतागडला गेल्यावर आपल्या महालाच्या एकांतांत कमलेनें जेव्हां कौमुदीकडे प्रकाशचा विवाह रश्मीशीं ठरल्याबद्दल उल्लेख केला तेव्हां कौमुदीनें त्यावर नुसता हुंकार दिला.

रश्मीशीं ठरलेला प्रकाशचा विवाह मोडल्याचा तिनें उल्लेखहि केला नाहीं. कारण मग आपल्याबरोबर प्रकाशचा विवाह घडून यावा म्हणून कमल कदाचित् खटपट करूं पाहील असें भय तर तिला वाटलेंच. पण शिवाय ह्या मोडलेल्या विवाहाची चारचौघांत अशी चर्चा झालेली प्रकाशला मुळीं आवडणार नाहीं. ह्या झाल्या घटनेबद्दल कमलनें किंवा माधवरावानें हळहळ, सहानुभूति वगैरे दर्शविलेलीहि त्याला आवडणार नाहीं हें सारें दूरदर्शीपणानें ध्यानांत आणून कौमुदीनें ह्या बाबतींत अधिक बोलणेंच टाळलें ! —

व मग अर्थात्च कमला तरी अधिक काय बोलणार ? शिवाय असें इतर विषयांवर बोलावयाला कमलेचें चित्त तरी ठिकाणावर कुठें होतें ?—

दुसऱ्या दिवशीं सकाळीं दत्तविधान.

संध्याकाळीं उद्धाटन समारंभ.

व तिसऱ्या दिवशीं तीर्थाटनाला गमन.

व मग — मग — माधवरावाशीं मीलन —

ह्या चार घटना कमलेच्या डोळ्यांत सारख्या घोळत होत्या ना ! त्या —बुधवारीं—रात्रीं तिला झोंपहि नव्हती. इतकी ती ह्या विचारांत गुरफटली होती.

आणि कौमुदीलाहि तें बरेंच वाटलें —

अशा स्थितींत गुरुवार उजाडला.

सकाळीं सव्वा दहा वाजतां दत्तविधानाचा मुहूर्त होता. नऊच्या सुमाराला कमलेच्या चुलत, चुलत सासूबाई आपल्या पतिराजांना आपल्या नजरेच्या धाकानें राजवाड्यांत घेऊन आल्या. व मग तिथेंच तळमजल्यावरील एका दालनांत पुण्याहवाचनाला सुरुवात झाली.

कमलेचे चुलत, चुलत सासरे हल्लीं ५१८ वर्षे वेडसर झाले होते. ते /अगदीं शब्दशः आपल्या पत्नीच्या कुंकवाला निव्वळ आधार होते. पण त्यांच्या कर्तृत्वशाली पत्नीनें त्यांना तसल्या वेडसर स्थितींतहि त्या प्रसंगाचें महत्त्व पटवून दिलें होतें.

त्यामुळें मानेला झटके देत व तोंड वेडेंवाकडें करीत कां होईना पण त्यांनीं वेळ निभावून नेली. शिवाय वेळोवेळीं त्यांची पत्नी त्यांना डोळ्यांनीं व कोंपरखळ्यांनीं धाक देत होतीच ना.

पण असल्या वेडसर पित्याचा मुलगासुद्धां कमलेच्या सख्या नणंदेच्या मुलापेक्षां दिवाणसाहेबांना दत्तक म्हणून अधिक योग्य वाटला ! कारण तो गोत्रांतला ! —

शास्त्र शिकवितें, रूढि सांगते कीं, तोच योग्य वारस नि हे असले लोक डोळे झांकून शास्त्राची व रूढीची शिकवण अंगिकारतात.

आज संस्थानांतील प्रजाजनांनीं घरोघर पताका लावून व गोडधोड करून हा आनंदाचा दिवस साजरा करावा असें दिवाणसाहेबांनीं जाहीर केलें होतें !

पण आपल्या मृत राजेसाहेबांच्या सख्ख्या भाच्याला दूर सारून हा एक गोत्रांतील उपटसुंभ मुलगा दिवाणसाहेबांनीं पुढें आणला व ह्या गोष्टीला व्हाइसरॉयचीहि संमति घेतली ह्यामुळें सारे प्रजाजन फार नाराज झाले

होते. व बहुतेक लोकांनीं दिवाणसाहेबांचा हा जाहीरनामा अमान्य करून आपली नाखुषी व्यक्त केली.

अर्थात् प्रजेचें मताधिक्य झाल्यामुळें दिवाणसाहेबांनीं तिकडे मुद्दामच डोळेझांक केली.

प्रकाशला व कौमुदीला मात्र प्रजाजनांच्या ह्या स्वमताभिमानाचें कौतुक वाटलें ! सारीच प्रजा निव्वळ 'सत्तेचे गुलाम' बनलेली नाहीं हें पाहून त्यांना आनंद वाटला !

हाच कमलाताईंच्या नणंदेच्या मुलाला दत्तक घेण्याचा प्रसंग जर असता तर सबंध संस्थान तो पहावयाला लोटलें असतें. पण आज सर्वत्र शुकशुकाट होता ! —

फक्त संस्थानांतील अधिकारी लोक मात्र कर्तव्य म्हणून हजर होते ! —

प्रजेचा हा असंतोष पाहून प्रकाशला बरेंच वाटलें. आपलें 'नाटक' तितकेंच अधिक सुलभतेनें पार पडूं शकेल असा त्याला दृढ विश्वास वाटला!

पुण्याहवाचन झाल्यानंतर उपाध्यायांनीं दत्तक मुलगा व त्याचे आई-वडील ह्या त्रिवर्गाला त्या दालनाचा उंबरठा ओलांडून पलीकडील कमलाराणी-साहेबांच्या दालनांत आणलें. व तिथें होमाचा विधि केल्यानंतर उपाध्यायांनीं मुलाला राणीसाहेबांच्या मांडीवर बसविलें. व मग मृत राजेसाहेबांच्या वडिलांचें यशवंतराव हें नांव त्याला ठेविल्यावर दत्तविधान पुरें झालें.

आपल्या वडिलांशी यत्किंचितूहि रक्ताचा संबंध नसलेल्या त्या मुलाला आपल्या पूज्य वडिलांचे नांव तरी निदान ठेऊं नये असें कमलाताईंच्या नणंदेनें दिवाणसाहेबांना परोपरीनें विनविलें. पण जुन्याला धरून बसणारे ना तें ? — मग वंशाची परंपरा राखतांना नांवाचीहि परंपरा राखण्याचा हट्ट ते धरणारच !—

कमलाताईंची नणंद दत्तविधानाच्या समारंभाला अर्थातूच हजर राहिली नाहीं.

प्रकाश व कौमुदी मात्र हजर होतीं. दिवाणसाहेबांच्या डोळ्यांत धूळ फेंकण्याच्या हेतूनें एका आठवड्यापूर्वीच कमलाताईनें माधवरावाला मास्त-

राच्या नोकरीवरून दूर केले होतें, व आधीं ठरल्याप्रमाणें ते लगेच आम्याला रवानाहि झाले होते.

प्रत्येक बारीक सारीक गोष्टही प्रकाशनें किती शिस्तीत जमविली होती. राहून राहून कौमुदीला ह्याचेंच आश्चर्य वाटत होतें. इतरांच्या बाबतींत लहानसहान तपशीलाकडेहि एवढें लक्ष पुरविणारा प्रकाश स्वतःच्या बाबतींत इतका पोरकट, अविचारी आंधळा कसा ?

माधव कमलेच्या हृदयाची पारख त्याला झाली, मग स्वतःच्या व कौमुदीच्या हृदयाची पारख त्याला कां होऊं नये ?

माधव कमलेची प्रीति विशुद्ध, विमल आहे हें त्यानें ओळखलें मग स्वतःला रश्मीविषयीं वाटणाऱ्या आकर्षणाला प्रीति समजण्याचा खुळेपणा त्यानें कसा केला ?

उत्तम वकील आपल्या अशीलाची केस मुद्देसूदरीतीनें व अस्खलित वाणीनें कोर्टांत विशद करूं शकतो पण स्वतःच्या बाबतींत त्याचे मुद्दे विस्कळीत होतात— जीभ अडखळूं लागते !

हुषार डॉक्टर आपल्या पेशटवर अगदीं हळुवार हातानें व शांत डोक्यानें यशस्वी शस्त्रक्रिया करितो पण स्वतःवर किंवा स्वतःच्या अगदीं निकट जिव्हाळ्याच्या माणसांवर ती करितेवेळीं त्याचा हात कांपूं लागतो, डोळ्या-पुढें अंधारी येते !

प्रकाशची स्थिती अशीच होती. तो फार हुषार होता. त्रयस्थांच्या बाबतींत त्याच्या बुद्धीचें व हृदयाचें चटूदिशीं मतैक्य होऊन तो समतोल निर्णय देऊं शके.

पऽण !— स्वतःच्या बाबतींत — अहं —त्यावेळीं त्याच्या बुद्धीहृदयामध्यें सारखी रस्सीखेंच होत राही व मग कधीं तरी विकारावर विचाराची मात होई किंवा रश्मीच्या बाबतीत झालें तसें विचारावर विकाराचें प्राबल्य होई व त्यामुळें चुकीचा निर्णय ठरला जाई !

पण हें आपलें दौर्बल्य त्यांचें त्याला कळणार केव्हां ?—

केव्हां ? — हा केव्हां कधींकधीं कौमुदीला भारी व्यथित करी !

आज दत्तविधान—समारंभ होत असतांना हा समारंभ म्हणजे आपण

पुढें करणाऱ्या नाटकाची नांदी—व ही नांदी पार पडल्यावर आतां नाटकाचे अंक भराभर पार पडतील वगैरे आशादायी, आनंदकारी विचार कमलाताईच्या मनांत एकसारखे नाचत असल्यामुळें तिची मुद्रा किती हंसरी प्रफुल्लित दिसत होती व मधूनच कौमुदीची व तिची नजरानजर झाल्यावेळीं हास्यांत लज्जेची नाजूक छटा हळूंच चमकून जाई.

व त्या त्या वेळीं कौमुदीला तिचा हेवा वाटे. कारण त्या त्या वेळीं कौमुदीच्या मनांत असें येई कीं, संसारांतील खरी माधुरी अनुभविण्याची दैवानें कमलेला बंदी केली असतांहि अचानक रीतीनें माधवरावाची व तिची ओळख होऊन तो मार्ग कमलेला मोकळा झाला.

आणि तो मार्ग आपल्याला पूर्ण मोकळा असून व शिवाय प्रीतिविवाहाला आवश्यक असणारा सहवास प्रकाशचा व आपला इतकीं वर्षे असूनहि त्या मार्गावर अद्यापि आपलें एकहि पाऊल पडलें नाहीं !

पुष्कळ साधनें अनुकूल असतांहि इच्छित साध्य प्राप्त होईलच असें नाहीं एकूण !

प्रयत्नांना अगोचर असलेली अशी दैव म्हणून वा योगायोग म्हणून एकादी शक्ति अस्तित्वांत असते तर !—

बाकी कौमुदीला ह्या असल्या शक्तीचें अस्तित्व कांहीं ह्याचमुळें पटलें असें नव्हे. चार दिवस साधा ताप आल्याचें निमित्त होऊन तिची आई एकाएकीं वारल्यापासून कौमुदी दैववादी बनलीच होती. तेव्हां तिची ही दैववादी वृत्ति आतां आणखी दृढ झाली इतकेंच !

व त्याच बरोबर तिच्या हेंहि मनांत आलें कीं, पैशाकडे पैसा जातो म्हणतात त्याप्रमाणें ज्याला पुष्कळ सुखें अनुकूल असतात त्याच्याकडेच उरलेलीं सुखेंहि जात असावींत !

रश्मीकडे सौंदर्य आहे, संपत्ति आहे, सत्ता आहे व म्हणूनच तिला प्रकाशच्या अमूल्य प्रीतिवैभवाचा लाभ झाला.

आपल्याकडे कांहीं नाहीं म्हणून आपल्याला कांहींच मिळणार नाहीं !

कांहींच मिळणार नाहीं ! — खरंच कां कांहींच मिळणार नाहीं आपल्याला ?

प्रकाश नाहीं मिळणार आपल्याला ?—प्रकाश आतां रश्मीचा नाहीं—मग केव्हां तरी तो आपला कशावरून होणार नाहीं ?

आणि 'केव्हां' – प्रकाश आपला 'केव्हां' होईल. ह्या विचारानें विव्हळ होणारी कौमुदी तो 'केव्हां तरी' आपला होईल ह्या दुसऱ्या विचारांत सुख मानण्याचा प्रयत्न करी.

व मग तिच्या मनांतील निराशावादी विचार दूर होत. तिला पुनः वाटे, ज्याच्याकडे पुष्कळ आहे त्यालाच सर्व मिळावें हा न्याय जर खरा असता तर जगांतील सारे श्रीमंत पुरुष व साऱ्या श्रीमंत सुंदर स्त्रिया सुखी झाल्या असत्या !

पण तसें कुठें असतें ? तेव्हां आपण श्रीमंत नसून, सुंदर व सत्ताधिकारी नसूनहि आपल्याला हवें असणारे सुख, प्रकाशच्या प्रीतिचा लाभ आपल्याला मिळेलहि—

असे अनेक उलटसुलट विचार कौमुदीला भारी सतावून सोडीत !

# २३ भरतवाक्य !

सकाळीं दत्तविधान पार पडलें व संध्याकाळीं व्हाइसरॉयच्या हस्तें नव्या वाड्याचा उद्‌घाटन समारंभ पार पडला.

दत्तक प्रकरणाच्या बाबतींत व्हाइसरॉयनें दिवाणसाहेबांसारखें मत दिल्यामुळें संस्थानांतील प्रजेचा त्यांच्यावरहि थोडाफार राग झाला होता. पण सकाळच्या समारंभाला न गेल्याची प्रतिक्रिया म्हणून आमंत्रित, अनामंत्रित खूप लोक संध्याकाळच्या समारंभाला जमले होते.

संस्थानांतील सर्वसाधारण माणसांना ह्या समारंभाचे आमंत्रण नव्हतें. पण असा नवीन धर्तीचा वाडा संस्थानांत हा पहिलाच झाल्यामुळें सर्वांना त्याबद्दल मोठें कौतुक व कुतूहल वाटत होतें. त्यामुळें वाड्याचें बांधकाम सुरू असतांनाच गांवांतील हलकेसलके लोकसुद्धां उत्सुकतेनें तिथें पहात उभे रहात. व पुष्कळ वेळां त्यांच्या उत्सुकतेचें कौतुक वाटून प्रकाशनें त्यांना आंत बोलावून वाड्याचा अंतर्भाग स्वतः दाखविला होता. त्यामुळें ह्या वाड्याबद्दल बहुतेक जणांना बरीच आपुलकी वाटत होती. व ती आपुलकी आणि सुस्वभावी प्रकाशबद्दल वाटणारा अभिमान दाखविण्यासाठींहि बरेच लोक बाहेर गर्दी करून जमले होते.

ह्या समारंभाला कौमुदी अर्थातच हजर होती व आपल्याला पोरकट वाटणाऱ्या आणि कांहीं बाबतींत खरोखरीच पोरकट असणाऱ्या प्रकाशच्या

कर्तृत्वाचें हें आणखी एक प्रत्यंतर पाहतांना कौमुदीला आणखीच गंमत वाटली.

विटा व चुना ह्यांचे यथायोग्य ऐक्य बनवून असा सुंदर बंगला निर्माण करविणाऱ्या प्रकाशला स्वतःची बुद्धि व हृदय ह्यांमध्यें योग्य ऐक्य बनवून खऱ्या सुखानंदाचा बंगला निर्माण करितां येऊं नये ना!

जीवनाच्या ह्या समरभूमीवर अर्थोत्पादनाची लढाई जिंकणाऱ्या प्रकाशला आपल्या विचारा विकारामधील लढा तोडतां येऊं नये ना!

बलवान् प्रकाशचें हें दुर्बलत्व कौमुदीच्या हृदयांतील प्रसुप्त मातृस्नेहाला रम्य वाटलें. प्रकाशला अद्यापि तें कळून न आलें तरी स्वतःच्या दुःखाच्या तक्रारी नेहमीं आपल्याकडे आणून दाखल करणारा प्रकाश खरोखरी आपलाच आहे अशी तिच्या हृदयानें तिला ग्वाही दिली.

व मग तो दिवसभर ती स्वतःच्या तंद्रीत होती.

त्या रात्रीं प्रकाश मुंबईला म्हणून रवाना झाला. पण मुंबईच्या रस्त्यांत मध्येंच गाडी बदलून त्यानें आग्र्याचा रस्ता सुधारला.

नंतर दुसऱ्या दिवशीं एक वृद्ध कारकून व दोन दासी ह्यांना बरोबर घेऊन कमला आग्र्याला व तिथून पुढें मथुरा वृंदावनाला निघाली.

मथुरेमध्यें दिवाणसाहेबांच्या ओळखीचे एक गृहस्थ म्हणजे तिथलाच एक पंड्या कमलाताईसाठीं घराची वगैरे व्यवस्था करून मथुरेच्या स्टेशनावर त्यांना उतरविण्यासाठीं सुद्धां येणार होते.

व ही सर्व माहिती कमलाताईला देतेवेळीं कौमुदी जवळ असल्यामुळें दिवाणसाहेबांनीं म्हटलें, "म्हणजे! ह्यासुद्धां आपल्याबरोबर जाणार काय?"

"छेः! मला शाळा सांभाळावयाची आहे ना! मी रात्रीच्या गाडीनें मुंबईला जाणार. शाळेचा जंजाळ नसता तर अनायासे उत्तर हिंदुस्थानचा प्रवास करावयाला सांपडता. आणि म्हणून मी अवश्य कमलाताई बरोबर गेले असतें." कौमुदी हंसून म्हणाली.

ह्यावर "खरं तें, खरं तें" असें दिवाणसाहेबांनी मान हालवीत म्हटलें तरी कौमुदी बरोबर जात नाही हें कळल्यानें त्यांना बरें वाटलें हें कौमुदीनें तेव्हांच ओळखलें.

वास्तविक कौमुदीला शाळेसाठीं त्या दिवशीं सकाळींच मुंबईला जाणें अवश्य होतें. पण कमलाताईच्या हातून जातानांचा फार्स नीटपणें पार पडेल कीं नाहीं असें भय वाटल्यामुळें ती मुद्दाम एक दिवस अधिक राहिली.

आणि तें बरेंच झालें. कारण जावयाला निघतेवेळीं तिच्या सूचनेवरून कमलाताईनें गहिंवरल्या स्वरांत दिवाणसाहेबांना म्हटलें, "पांच सहा महिन्यासाठीं म्हणून मी जाते आहे खरी, पण मला तिथें करमलेंच नाहीं तर मी त्याहून लौकर परतलें तर चालेल ना ?"

आणि कमलाताईच्या ह्या केंविलवाण्या प्रश्नानें खूपच काम केलें.

कमलाताईच्या असहाय्य स्थितीबद्दल दिवाणसाहेबांना निःसीम सहानुभूती वाटली व ते म्हणाले, "हें काय बरं विचारणं ! आपण म्हणजे आमच्या संस्थानाची शोभा ! आपण इथें परत आल्यानें आम्हांला केव्हांहि आनंदच वाटेल ! पण सध्यां लोक अंमळ हे झाले आहेत म्हणून आपल्याला तीर्थाटनाला पाठविण्याचें ठरविलें."

म्हणे आपण ह्या संस्थानाची शोभा !— हं किती, गोड मनाचे शब्द ! शोभा ! — हो, बाकी, कमलाताई राणीपदाला शोभणारी व शोभविणारी होती खरीच ! आणि एखाद्या शोभेच्या वस्तूइतकीच तिला किंमत होती तेव्हां दिवाणसाहेबांचे शब्द रास्तच होते त्या दृष्टीनें — असो !—

रात्रीं कमळाताई तिघां नौकरांसह आग्ऱ्याला रवाना झाल्या व कौमुदी मुंबईला गेली.

कमलाताईबरोबर आलेला कारकून जोशीराव वयानें पोक्त असून व्यवहाराला हुषार व अनुभवसंपन्न असला तरी बऱ्याच पोक्त माणसाप्रमाणें तो प्रवासाला भारी बाचकत असे. विशेषतः ह्या प्रवासांतील सारें नवखें उत्तर हिंदुस्थानी वातावरण पाहून तर तो अगदींच गडबडला.

आग्ऱ्याहून लगेच पुढें मथुरेला जाण्याबद्दल दिवाणसाहेबांनीं त्यांना सुचविलें होतें व तशा सोईच्या गाडीच्या वेळीं मथुरेच्या स्टेशनावर तो पंड्याहि त्यांना न्यावयास येणार होता. पण तरीसुद्धां बिचाऱ्या जोशीरावाला आपल्यावरील जबाबदारीनें धाकधूक होत होतें.

त्यामुळें आम्याच्या भव्य स्टेशनावर प्रकाशला पाहून जोशीरावाला विलक्षण आनद झाला.

परक्या प्रांतांत आपला माणूस भेटल्यानें नेहमींच आनंद वाटतो, पण आतां जोशीरावाला झालेला आनंद असल्या आनंदापेक्षां किती तरी अधिक होता.

जत्रेंतील गर्दीत चुकलेल्या लहान मुलाला अगदीं घाबरून गेल्यावेळीं एकाएकीं आपला नातलग भेटला म्हणजे जो अनिर्बंध हर्ष होतो तसा आतां प्रकाशच्या भेटीनें जोशीरावाला झाला !

व त्याला संशय येऊन नये म्हणून कमलातानेंहि योग्य तें आश्चर्य व आनंद दर्शविला.

जोशीराव तर एकसारखा उगीचच हंसत होता. व हंसत हंसत आणि थंडीनें कांकडणारे आपलें सुकडें शरीर अधिकच संकुचित करीत त्यानें म्हटलें, " ह्यः ह्यः म्हटलं, साहेब, आपण इथं कुठें ? "

" अहो, सीतागडहून मी मुंबईला म्हणून निघालों नि वाटेंत साहेबांची तार मिळाली कीं, तावडतोब आम्याला जा - करणार काय ? सेवा धर्म आहे ना हा ?" प्रकाशनें अगदीं बेमालून बात ठेवून दिली.

" वाः वाः ! पण आपली ही सेवाधर्माची तामिली आम्हांला उपयोगी पडली ना ! आतां तेवढ आम्हांला मथुरेच्या गाडींत बसवून द्यायचं, काय ?"

जोशीरावाच्या ह्या शब्दावर प्रकाश म्हणाला, " हो, हो, अगदीं अवश्य ! पण जोशीराव, आयती तुम्ही मडळी आम्याला आला आहांत मग जगप्रसिद्ध ताजमहाल तरी पाहून घ्या. मी सगळी चोख व्यवस्था करतो. शिवाय प्रवासाचा शीणहि जरा उतरेल. इथल्या स्टेशनजवळच्याच ह्या ' निवासा 'त जेवणाची वगैरे सुरेख सोय आहे. ताजमहाल पाहून व ऊन ऊन जेवण जेवून मग दोन प्रहरीं चला मथुरेला."

" अ— अं—पण—पण मथुरेचा तो पंडया —" प्रकाशनें केलेल्या वर्णनानें तोंडाला पाणी सुटून जोशीराव चांचरत म्हणाला.

" अहो, त्याला करतो कीं मी तार, तुम्ही दोन प्रहरीं येतां म्हणून — मग ?"

" मग होय ? माझं काय विचारतां साहेब ? राणीसरकार सांगतील ते ह्या कारकुनाला शिरसामान्य ! हो, आपला सेवाधर्मच तो — काय ?" नुक्ता बावरून गेलेला कारकून आतां अगदीं खुषींत प्रकाशनें मघां उच्चारले-लाच मुद्दा उच्चारून हंसत म्हणाला.

त्यावर ह्या नाटकांतील आपल्या भूमिकेच्या अनुरोधानें कमलाताई खोट्या अनिच्छेनें म्हणाली, " थांबायचं म्हणतां इकडे ? नको बाई, एकदां आपलं ठिकाणीं जाऊन पडलं म्हणजे बरं. नि शिवाय, रात्री गाडींत एक क्षणभरहि झोंप न आल्यामुळें माझा जीव कसा उबून गेलाय्— भारी, भारीच दमले आहे हो मी — तेव्हां —"

" तेव्हां इथें थोडी विश्रांति घेऊनच मथुरेला जाणं अधिक इष्ट नाहीं कां ?" प्रकाशनें म्हटलें.

व मग दोन्ही हातांनीं डोकं दाबीत कमलाताई मंद स्वरांत उत्त-रल्या, ' होय बाई, इथें अंमळ थांबलेलंच बरं ! पुनः लगेच गाडीची ती कटकट नाहीं झेंपणार मला. अगदींच मोडल्यासारखं कसं होतं हो जोशीराव ?"

" सरकार, ह्या ऐन थंडीच्या दिवसांत आपण आला. तें चुकलं बघा. अरे बापरे ! कोण विलक्षण थंडी ही ! मध्यरात्रीपासूनच माझ्या संधि-वातानें जोर केला आहे. हरे राम ! अहो साहेब, जरा सावकाश चालू या हो. माझे सांधे धरलेत बघा सगळे — आई ग— " बिचारा जोशीराव ह्याप्रमाणें आरडत ओरडत व लंगडत एकदांचा ' निवासां ' त पोहोंचला.

मंडळीच्या चहापाण्याची व्यवस्था करून प्रकाश मथुरेच्या पंड्याला तार करून आला. मात्र दोन प्रहरीं पाहुणे मथुरेला येतील अशी तार करण्याचें त्यानें जोशीरावाला अभिवचन दिलें असलें तरी चार दिवसानंतर मंडळी तिथें जाणार असा मजकूर त्यानें तारेंत घातला होता.

रात्रीचें जागरण थोडें तरी निवळावयाला सांपडावें म्हणून प्रकाशनें जेवणाचा बेत मुद्दाम दहा वाजतांचा करविला. त्याच्या ह्या कृतीचें जोशी

रावाला सकृतदर्श कौतुक वाटलें. कारण मार्गशीर्ष महिन्यांतील त्या कडक थंडीमुळें म्हाताऱ्याचा संधिवात विलक्षणच बळावला होता व त्यांत थंडीनें कुडकुडून सांधे अधिकच खिळखिळे होत होते. त्यामुळें घाबळी गुरफटून व हातपाय पोटाशीं घेऊन ' निवासां'तील त्या स्वच्छ, प्रशस्त पलंगावर जरा लवंडावयाला मिळणार ह्या कल्पनेनें त्याला अतिशय आनंद झाला.

पण काय ! बिचारा अर्धा पाऊण तास झोंपला असेल नसेल तोंच प्रकाशनें घाईघाईनें त्याला जागें केलें.

नुकी कुठें आरामशीर झोंप लागते तों दचकून जागा झाल्यामुळें जोशीराव अगदींच भैरभैर बनला. त्याला धड मोठ्यानें बोलावयालाहि सुचेना. दातांच्या अभावीं बोळकें झालेलें आपलें तोंड तो नुसतेंच हालवूं लागला; प्रकाशच्या मुद्रेवरील भीति मात्र कितीतरी पटीनें वाढून त्याच्या मुद्रेवर ती उमटली होती.

त्याची ही स्थिति पाहून प्रकाश म्हणाला, " इतके घाबरूं नका जोशीराव —पण बघा, राणीसाहेब एकाएकी फार आजारी झाल्या आहेत."

" आ— आ— आजारी ! रा — रा — रा — राणी — सा..."

" होय— होय — त्यांच्या छातींत कळा येताहेत — नि म्हणून मी आतां डॉक्टराकडे चाललों आहे. तेव्हां तुम्ही जरा राणीसाहेबाजवळ बसा, चला —"

ह्यावर कांहींएक न बोलतां, तोंडाची नुसतीच उघडझांप करीत जोशीराव प्रकाशबरोबर कमलाताईच्या खोलींत गेला.

तर काय ! ती पलंगावर पडून नुसती तडफडत होती, दोन्ही दासी आपापल्यापरी कुठें गरम पाण्याच्या पिशवीनें शेकत होत्या तर मध्येंच हातपाय दाबीत होत्या.वारा घालीत होत्या. नि राणीसाहेब धाप लागल्याप्रमाणें कासावीस होत होत्या.

हें दृश्य पाहून म्हातारा जोशीराव रडकुंडीलाच आला.तरी त्याला तसाच तिथें बसवून अर्ध्या तासाच्या आंत प्रकाश डॉक्टरांना घेऊन आला.

डॉक्टरांनी तपासणी केली, औषधपत्रिका लिहिली, व ती घेऊन त्यांचा मदतनीस दवाखान्यांतून औषध आणण्यासाठीं रवाना झाला.

कमलाताईची तळमळ सारखी वाढत असल्यामुळें डॉक्टर मात्र बाहेरील खोलींत बसून राहिले.

व मग जोशीरावाच्या समक्ष प्रकाशनें हलक्या स्वरांत दुखण्याच्या निदानाबद्दल चौकशी केली.

मानेला हळूहळू झटके देत डॉक्टर गंभीर स्वरांत म्हणाले, "अँजायना पेक्टोरिस आहे हा — नि झटकाहि फार जोराचा आला आहे."

" अरे बापरे ! अँजायना ? म्हणजे— म्हणजे— फार धोक्याचं आहे तर हें दुखणं ?" प्रकाश उद्गारला.

" होय, फारच. नि बिचाऱ्या राणीसाहेब किती तरुण आहेत अं ?"

डॉक्टर व प्रकाश ह्यांचे हें संभाषण ऐकून जोशीराव थरथर कांपूं लागला.

जरा वेळानें डॉक्टर म्हणाले; " राणीसाहेबांच्या मनाला धक्का बसण्यासारखी एखादी घटना नुक्तीच घडली होती काय ?"

ह्यावर प्रकाश जोशीरावाला हळूच म्हणाला. " जोशीराव, दत्तकविधानासंबंधींची हकीकत डॉक्टरांना सांगावयालाच पाहिजे ! सांगूं ना ?" व जोशीरावानें संमति देतांच प्रकाशनें त्याबद्दल थोडक्यात सांगून म्हटलें, " दत्तविधानाच्या वेळीं राणीसाहेब तशा शांत होत्या. पण कदाचित् त्यांना त्यावेळीं आपल्या परिस्थितीच्या जाणीवेनें आतून दुःख होत असेल ! कुणी सांगावं ? कारण आज जर त्यांना पोटचा मुलगा असता तर हें उसनं वाण कशाला घ्यावं लागलं असतं ? मग हक्कानेंच त्या राजमाता असत्या ! त्यामुळें ही जाणीव व आपल्या अकाल वैधव्याची स्मृति या दोन्हींचा त्या वेळेपासून त्यांच्या मनावर कदाचित् विपरीत परिणाम झाला असेल !"

" झाला असेल कां ? झाला आहेच ! खास त्यांच्या दुखण्याला हेंच कारण आहे ! इतक्या अल्प वयांत त्यांना किती दुःख सोसावं लागलं हें ! अरेरे !"

इतक्यांत राणीसाहेब घाबऱ्या झाल्या असें कळवायला आंतून दासी तिथें आली व घाईघाईनें डॉक्टर खोलींत गेले !

त्याबरोबर जोशीराव कांपऱ्या स्वरांत प्रकाशला म्हणाला, " आधीं दिवाणसाहेबांना तार करा बरं. ते स्वतः येऊं द्या इथें."

" तें खरं, पण जोशीराव तारेनें सगळा उलगडा नीट कसा होणार ? मी तार तर करतोच पण मला असं वाटतं कीं, आज रात्रींच्या गाडीनें तुम्हीं सीतागडला परत जाऊन दिवाणसाहेबांना समक्षच सर्व सांगावं नि त्यांना इकडे पाठवून द्यावं. कारण ह्या थंडीमुळें तुम्हींहि असे गोळा होऊन पडलां आहांत."

" हो, हेंच ठीक होईल. कारण माझा कांहींच उपयोग होत नाहीं. तेव्हां मीं जातोंच. पण बघा साहेब, तुम्हीं आहांत म्हणूनच जातो हं मीं नाहींतर ह्या थंडीमुळें अगदीं मरावयाला टेंकलों असतों तरी आमच्या सद्‌गुणी, सुशील राणीसाहेबांना सोडून मीं गेलों नसतों बरं." जोशीराव कळवळून म्हणाला.

" तें काय मला ठाऊक नाहीं ? मीं अगदीं एकूणएक काळजी घेईन. पण जोशीराव, मीं तुम्हां मंडळींना आग्र्याला थोडा मुक्काम करण्याचा कुठुन आग्रह केला असं झालंय मला."

" अंह, तें मात्र मीं नाहीं मान्य करणार. अहो, सर्व कांहीं आपल्या बऱ्यासाठींच होतं ! राणीसाहेब जर कां मथुरेमध्यें अशा आजारी झाल्या असत्या तर आम्हीं काय हो करणार होतों ? छेः छेः, साहेब, तुम्हीं आम्हांला इथें ठेवून घेतलंत हा आमच्यावर मोठा उपकारच केलांत बरं. हं ! बिचाऱ्या राणीसाहेब ! खरंच हो, दत्तविधानाच्या त्या समारंभामुळें स्वतःच्या दुःस्थितीची त्यांना विशेषच जाणीव होणं साहजिकच होतं नि मनाच्या असल्या नाजूक स्थितींत ह्या ऐन थंडीतला इतक्या दूरचा प्रवास त्यांना मग कसा झेपावा ? हरे राम !"

दिवसभर जोशीराव राणीसाहेबांबद्दल अशी सहानुभूति व्यक्त करीत व मधूनच त्यांना जोराची कळ आल्यावेळीं डोळे पुशीत इथून तिथें लडबडत होता. व त्यांतच सांधे अगदींच धरले कीं बसल्याबसल्याच चौकशी करीत होता.

शेवटीं प्रकाशला राणीसाहेबांची नीट काळजी घेण्याबद्दल तीनतीनदां बजावून तो रात्रीच्या गाडीनें सीतागडला रवाना झाला.

व आपल्या 'नाटका'चा प्रयोग पूर्णपणें यशस्वी वठण्यांत कांहीसा

अडथळा असणारें हें एक व्यवधान दूर झालें अशा समाधानानें प्रकाशनें एक निःश्वास सोडला !

राणीसाहेबांच्या दुखण्याचें मान तसेंच कमीजास्त होत होतें.

जोशीराव गेल्यानंतर सुमारें अर्ध्या तासानें कमळाताईला स्ट्रेचरवरून 'हॉस्पिटल' मध्यें नेण्यांत आलें. त्यावेळीं दासींनीं रडून एकच गोंधळ केला व आपणहि बरोबर येतो म्हणून हट्ट धरला. पण अशा रोग्याची शुश्रूषा शिक्षित परिचारकांकडून होणेंच अवश्य आहे असें डॉक्टरांनीं सांगितल्यामुळें नाइलाजास्तव त्या 'निवासां' तच राहिल्या.

आपण वारंवार त्यांना राणीसाहेबांच्या प्रकृतीची खबर कळवूं अशी प्रकाशनें त्याच वेळीं हमी दिली. व कमलाताईला तिथून हाल-विण्यांत आलें.

अर्थात्‌च जिथें मुळांत कमळाताईला 'अँजायना' च नव्हता तिथें हॉस्पिटलची आवश्यकता तरी कुठची ?

पण प्रकाशनें आपल्या 'नाटका' ची तयारी उगीच नव्हती इतकी पायाशुद्ध केली ? आग्र्याला त्याचा एक डॉक्टर मित्र तर होताच पण त्याशिवाय इतरहि चार, पांच, मित्र असल्यामुळें 'नाटक' बेमालुम वठविणें सुलभ होतें.

व म्हणूनच कमळाताईला तीर्थाटनाला पाठविण्याचें सुचवितेवेळीं दिवाणसाहेबांचें काशीबनारस युक्तिप्रयुक्तीनें फेटाळून लावून प्रकाशनें मथुरावृंदावन निश्चित करविलें होतें !

आतां कमळाताईला हॉस्पिटलमध्यें म्हणजे ज्या मित्राच्या घरांत माधवराव रहात होता त्या ह्या प्रसंगासाठीं भाडोत्री काढून मोकळ्या केलेल्या घरांत आणलें.

व मग 'नाटका' चे अंक भराभर सुरूं झाले.

पुढल्या अंकांत कमळाताईचा आजार बळावला. अगदीं हाताबाहेर गेला. व मध्यरात्रींच्या सुमाराला प्रकाश तिच्या दासींना ही बातमी कळविण्यास गेला.

दासी बिचाऱ्या भयभीत झाल्या व आपल्याला राणीसाहेबांकडे नेण्या-बद्दल त्यांनीं प्रकाशला रडत रडत विनविलें.

प्रकाशला तेंच हवें होतें. आतां त्या दासींना आपण होऊन असें म्हटलें नसतें तर तो स्वतःच त्यांना ' हॉस्पिटलां 'त घेऊन जाणार होता. कारण कमलाराणीसाहेबांच्या मृत्यूची सत्यता शाबीत करावयाला त्याला साक्षीदार म्हणून त्या हव्याच होत्या.

तशा मध्यरात्रीं त्या दोघींना घेऊन तो पायींच निघाला. कारण गांव नवखें असल्यामुळें गाडी मिळण्याची अडचण होती ना ? पण खरें म्हणजे प्रकाशला असा थोडा वेळ काढावयाचा होता. कारण त्या अंकासाठीं नायिकेला जरा विशेषच ' रंगवावयाची ' होती ना !

त्यामुळें प्रकाश मुद्दामच आडवळणांनीं गल्लयागल्लयांतून चालला होता. ऐन थंडीची, काळोखी मध्यरात्र ती. नि त्यांत प्रसंग असा विचित्र. त्यामुळें त्या दासींची विलक्षण त्रेधा उडाली होती.

प्रकाशनें आपल्याला कुठें आणलें नि काय त्यांना कांहीं कळेना.

फक्त एका मोठ्याशा घरापाशीं आपण आतां आलों एवढेंच त्यांना दिसलें. पण त्या घरांत बहुतेक अंधारच होता. पायऱ्यांवर मात्र एक दिवा मिणमिणत होता.

तिथेंच त्या दोघींना उभ्या करून प्रकाश आंत गेला. व सरासरीं पांच मिनिटांनीं तो परत आला.

तेवढ्या वेळांत दासींची बोबडी वळली अगदीं. नि त्यांत प्रकाश परत आला तो नुसता गप्प गप्पच.

" का—का—य झा—लं— हो—ओ ! " एका दासीनें आंत ओढणाऱ्या आवाजांत प्रश्न केला.

त्याबरोबर कपाळाला हात लावीत प्रकाश म्हणाला, " काय सांगूं ! सारा कारभार आटोपला ! "

हे शब्द ऐकतांच त्या दासी मटकन् खालीं बसल्या व सूर काढून रडूं लागल्या.

तेव्हां प्रकाश म्हणाला, " हें हॉस्पिटल आहे, बाकीच्या रोग्यांना त्रास होईलना असानें—चला बरं तुम्ही परत."

" अहो, पण आम्हांला त्यांचें—शेवटचें—दर्शन—तरी घेऊं द्या हो."

प्रकाशला तेंच हवें होतें.

" हं, मग चला तर माझ्याबरोबर" असें म्हणून त्यानें त्या दोघींना मागल्या बाजूच्या एका खोलींत नेलें.

त्या खोलींत एकच हिरव्या, अंधुक प्रकाशाचा दिवा होता. त्या अपुऱ्या प्रकाशाची डोळ्यांना जरा संवय झाल्यावर पलीकडे एका खाटेवर निजविलेल्या राणीसाहेब—राणीसाहेबांचा देह त्यांना दिसला.

गळ्यापर्यंत पांढरी चादर गुरफटली असून चेहरा तेवढा उघडा होता. पण तो चेहरा किती बदलला होता!

राणीसाहेबांचा वर्ण मूळचा उज्ज्वल गौर. पण आतां पांढुरका राखाडी दिसत होता नि डोळ्यांखालीं काळींच वर्तुळें पडलीं होतीं. नि त्यांचे नेहमींचे लालबुंद ओंठ किती पांढरट दिसत होते.

राणीसाहेबांच्या मनोहर सौंदर्याचा आतां मागमूसहि दिसत नव्हता त्यांच्या चर्येवर!

त्यामुळें त्यांच्या दर्शनानें त्या दासींना रडूंच कोसळलें. व इथें रडण्याची बंदी आहे ही प्रकाशनें त्यांना हलक्या आवाजांत पुनः आठवण दिल्यामुळें त्या मुकाट्यानें डॉक्टरांच्या मदतनिसाबरोबर—प्रकाशच्याच एका मित्राबरोबर निवासांत परतल्या.

जोशीराव सीतागडला रवाना झाले त्या सुमाराला राणीसाहेबांच्या आजाराबद्दल व जोशीराव निघाल्याबद्दल प्रकाशनें तार केली होतीच.

नंतर पुढल्या अंकांत राणीसाहेब अत्यवस्थ असल्याबद्दल त्यानें मध्यरात्रीच्या सुमाराला दुसरी तार केली.

व आतां ह्या अंकांत त्यांच्या मृत्यूची बातमी तिसऱ्या तारेनें कळविली. व हॉस्पिटलच्या नियमानुसार पुढील विधि नाइलाजास्तव आपणच उरकीत असून दासींसह नंतर लगेच सीतागडला येत आहे असाहि मजकूर त्यांत घातला होता. व त्याप्रमाणें दोन प्रहरच्या गाडीनें तो निघालाहि.

अर्थात्‌च त्यापूर्वीं सकाळच्या गाडीनें कमलाताई व माधवराव कान-पूरच्या रस्त्याला लागलीं होतीं. आर्यसमाजाच्या पद्धतीनें अगदीं पहांटेच त्यांचा विवाह उरकण्यांत आला होता. व स्टेशनावर त्यांना निरोप देतांना प्रकाश मुद्दाम हंसून कमलाताईला म्हणाला होता, "आज तुमच्या राशी-पदाचा मृत्यू झाला बरं कां. आतां ह्यापुढें तुम्हीं ह्या माधवाची राणी!— अं!— कीं, माधवाची मालती रे बुवा!"

"हो, हो, प्रकाश, मालतीच ही आतांपासून. कारण हिचं कमला हें नांव बदलणंच श्रेयस्कर आहे. तेव्हां आपण तर मालतीच म्हणणार." माधवराव अगदीं आनंदानें म्हणाले.

"होय तर. 'नाटका'च्या ह्या सूत्रधाराचा इतका तरी मान नको कां राखावयाला? मी सुचविलेलं नांव पसंत पडलंच पाहिजे आतां. काय असंच ना?" प्रकाशच्या ह्या बोलण्यावर तिघेंहि हंसलीं. व तितक्यांत गाडी सुरूं होण्याची शिटी झाल्यामुळें प्रकाश कमलाताईला म्हणाला, "चला, आपल्या ह्या 'नाटका'चें भरतवाक्य तर निर्विघ्नपणें पार पडलें. आतां, 'नांदा सौख्यभरें, शोभो कुल तव सत्कुमरें,' बरं कां कमलाताई, अं— नव्हे, मालतीवहिनी—"

आणि प्रकाशची ही प्रेमळ चेष्टा ऐकून व त्यांतील अर्थामुळें हृदयाला सुखद संवेदना होऊन कमलाताईचे डोळे पाण्यानें भरले.

तिच्या सुंदर मुखमंडलावर ह्यावेळीं आनंद, कृतज्ञता, लज्जा, प्रीति, समाधान इत्यादि कोमल भावनांची सजावट इतकी सुंदर दिसत होती, व विशेषत: तिच्या विशाल, गौर भालपट्टलावर नुकताच लाविलेला कुंकुम-तिलक बालसूर्याप्रमाणें इतका शोभिवंत दिसत होता कीं, तिच्याकडे पहातां पहातां हल्लीं कांहीं दिवस मुद्दाम दूर सारलेली रश्मीची स्मृति त्याला आतां झाली—

व त्याच्या मनांत आलें, रश्मि सुंदर आहेच पण कमलाताई—आतां माधवाची मालती बनलेली कमलाताई—तिच्याहून केव्हांहि अधिक सुंदर!—

पॅरिसच्या डब्बल रीडच्या सुंदर परंतु मोजके सुटे स्वर काढणाऱ्या हात-पेटीसारखें रश्मीचें सौंदर्य गोड व मधुर परंतु मर्यादित!— आणि कमलेचें

सौंदर्य म्हणजे एकांत एक मिसळणारे मंजुळ, कोमल स्वर उमटविणारी सुरेल सतार !—

रश्मि सुंदर खरी, परंतु आतां कमलाताई तिच्याहूनहि सुंदर दिसली !

आणि— आणि कौमुदी !— कौमुदी ह्या दोघीसारखी, ह्या दोघीइतकी सुंदर नाहीं !— पण - पण कौमुदीचे सुंदर, सौम्य डोळे आणि प्रेमळ हृदय !—

अहा !— कौमुदी सुंदर नाहीं कशी !— तिच्या सुंदर हृदयाचें प्रतिबिंब तिच्या चेहऱ्यावर उमटत असतां तिचा चेहरा सुंदर नाहीं ?—

आजपर्यंत कधींहि वाटली नाहीं इतकी आपुलकी प्रकाशला कौमुदी-विषयीं आतां वाटूं लागली !—

कमलाताईच्या 'अस्थि' घेऊन सीतागडला जात असतांना प्रकाशच्या मनांत एकसारखी कौमुदी घोळत होती. त्याच्या कानांत कौमुदीचा मंजुळ, प्रसन्न आवाज घुमत होता. त्याच्या डोळ्यांना कौमुदीची हंसरी मुद्रा दिसत होती.

सीतागडला जाऊन माधव— कमलेच्या सुखान्त नाटकावर शेवटला पडदा पाडण्याची ही महत्त्वाची कामगिरी करणें जर प्रकाशला भाग पडलें नसतें तर तो थेट मुंबईला धांवला असता व इतक्या कौशल्यानें पार पाडलेल्या नाटकाबद्दल कौमुदीला सर्व हकीकत सांगून त्यानें तिच्याकडून कौतुकमिश्र प्रेमळ शाबासकी मिळविली असती !— इतकी त्याला कौमुदीची तहान लागली होती.

कौमुदीची तहान !— विचारी, शांत, शहाण्या, प्रेमळ कौमुदीला मानवी जीवनाला अत्यावश्यक असणाऱ्या पाण्याची उपमा खरोखरीच फार सुरेख शोभत होती !—

पैशाच्या जोरावर व जिभेची चटक भागविण्यासाठीं माणसांनीं उंची, उंची पेयें प्राशन केलीं तरी पाण्यावांचून खरी तहान भागत नसते !—

तेव्हां कौमुदी म्हणजे खरोखरीच विशुद्ध थंड पाणी !— आणि कमला !— कमलेला चहाची उपमाच योग्य ! ज्याला चहाचीच तलफ आलेली असते त्यालाच पाण्यापेक्षांहि तो प्रिय वाटतो !—

आणि मग रश्मि कोण ?— रश्मि !— रश्मि म्हणजे मादक मद्य !- होय !- ह्या मद्याची चटक ज्याला एकवार लागलेली असते त्याला ती सुटणें अशक्य !—

रश्मीच्या सौंदर्यमद्याची आपल्याला लागलेली चटक आतां सुटली आहे असें प्रकाशला वाटत होतें व त्यामुळें कौमुदीची शुद्ध, स्वच्छ पाण्यासारख्या शुद्ध मधूर असणाऱ्या कौमुदीची आपल्याला तहान लागली आहे असें तो समजत होता. पण एकदां मद्याची चटक लागलेल्या माणसाला तसाच चांगला फटका बसल्यावांचून तें मद्य पुनः समोर दिसल्यावर प्राशन केल्या-शिवाय रहावेल !—

मद्याचा पेला समोर आल्यावर मद्यप्याला सुमधुर जलाची किंमत वाटेल !—

मोह प्रत्यक्ष पडल्यावांचून त्याचा प्रतिकार खरोखरी करितां येतो कीं नाहीं हें कसें कळणार !—

अगदीं अशिक्षित माणसाला इतरांची उघडीं पत्रें वाचण्याचा मोह होत नसल्याबद्दल त्याची स्तुति करणें जेवढें हास्यास्पद आहे तेवढेंच मोहाची संधि येण्याआधींच त्या मोहपाशांत न पडल्याबद्दल कौतुक करणेंहि हास्या-स्पद आहे !—

रश्मीच्या मादक सौंदर्यमद्याचा पेला सध्यां प्रकाशपासून दूर होता. पण दैवानें तो पुनः जर जवळ आणला तर प्रकाश तो दूर सारील ?— कीं— कीं— त्या मद्याची पूर्वींची चव अद्यापि तोंडांत कायम असल्यामुळें समोर असलेला कौमुदीच्या प्रेमजलानें कांठोकांठ भरलेला पेला बेचव वाटून तो त्या मद्यावरच झडप घालील ?—

पण अशी कठीण कोडीं कल्पनेनें कां सुटतात ?—

लांबलचक, दहा, बारा आंकड्यांचे गुणाकार जसें कागदावरच करावे लागतात त्याप्रमाणें असलीं कठीण कोडीं प्रत्यक्ष अनुभवानेंच सोडवावीं लागतात !—

# २४ मद्याची चटक !

आणि आग्र्याहून सीतागडला जातांना प्रकाशची मनःस्थिति कौमुदीला भेटण्यासाठीं उत्सुक झाली होती तर सीतागडहून मुंबईला येतांना ती दुसऱ्याच कारणासाठीं त्याहिपेक्षां अधिक उत्सुक झाली.

सीतागडला दिवाणसाहेबांकडे त्यानें उत्तम बतावणी केली. कमलाताईंच्या 'अस्थि' ठेविलेली चंदनी पेटी व डॉक्टरांचें सर्टिफिकेट वगैरे सारें त्यानें अगदीं कष्टी मुद्रेनें दिवाणसाहेबांच्या स्वाधीन करून मृत्यूसमयींच्या तिच्या यातनांचें कळवळून वर्णन केलें.

तें ऐकून दिवाणसाहेबांनीं एक लांबलचक निःश्वास सोडला. व 'अस्थि' असलेल्या पेटीचा आदरपूर्वक स्वीकार करीत ते म्हणाले, " अरेरे ! एवढ्या तरुण वयांत आणि अशा प्रकाएकीं जाव्या ना त्या !– शिवाय, इथें असे तोंवर त्यांची प्रकृति किती निकोप होती !—"

" होय. पण दत्तविधानामुळें त्यांच्या भावनांना खूप ताण पडला व त्यांतच दूरच्या प्रवासाची दगदग झाली. नि त्यामुळें हा असा चमत्कारिक शेवट झाला ! "

" हुं ! संस्थानांतील आमच्यासारखे नोकर दीर्घायुषी असावे नि राणीसाहेबांना अल्पवयांत मृत्यू यावा ना ! हं ! कांहीं माणसें अशी अल्पायुषी

होतात तर कांहीं दीर्घायुषी असूनहि जिवंत असून मेल्यासारखीं असतात !" दिवाणसाहेब म्हणाले.

त्यांच्या ह्या शेवटल्या वाक्यानें प्रकाश फार दचकला.

जगाचा बरावाईट अनुभव भरपूर घेतलेल्या ह्या म्हातारेबुवानें वस्तुस्थिति ताडली कीं काय असें भय वाटलें त्याला.

कमलाताई वस्तुतः जिवंत असून आतां जगाला मेल्यासारखी आहे हें ओळखून तो असें बोलला असेल काय अशी शंकाहि प्रकाशच्या मनांत आली.

व त्यानें म्हटलें, " दिवाणसाहेब, आपल्या शेवटल्या वाक्याचा अर्थ नाहीं कळला मला. कांहीं माणसं दीर्घायुषी असूनहि जिवंत असून मेल्यासारखीं असतात म्हणजे काय ? "

" अ ?– म्हणजे ?– म्हणजे होय ? " क्षणमात्र घुटमळून दिवाणसाहेब उत्तरले, " म्हणजे त्याचा अर्थ असा कीं– कीं– आतां आमच्या ह्या नव्या छोट्या राजांचे वडील आहेत ना, ते जिवंत असून मेल्यासारखेच नाहींत काय ? अं ?– म्हणून मीं म्हटलं तें. "

दिवाणसाहेबांच्या ह्या स्पष्टीकरणानें प्रकाशचें कांहीं नीटसें समाधान झालें नाहीं. त्यांना ह्याबद्दल पुनः कांहीं विचारावें कीं न विचारावें अशा विचारांत तो होता, इतक्यांत तें ओळखूनच कीं काय, दिवाणसाहेबांनीं म्हटलें, " चला बुवा, मला वेळ नाहीं आतां. आज ह्या अस्थींची पालखींतून मिरवणूक काढून नंतर बालराजांना बरोबर नेऊन त्या विधीपूर्वक गंगेंत टाकावयाच्या !– हं !– हो खरं, आमचे जोशीराव म्हणत होते कीं, राणीसाहेबांसाठीं तुम्हीं फार मेहनत घेतलीत म्हणून. त्याबद्दल मीं तुमचा अत्यंत आभारी आहे बरं ! आणि तुम्हीं देवानें धाडल्यासारखें अगदीं नेमके तिथें होता म्हणून किती चांगलं झालं !– असो ! झालं तें भारीच वाईट झालं. पण औरस वारसाच्या अभावीं आमचं हें सीतागड संस्थान खालसा होणार कीं काय अशी मोठी भीति वाटे मला. पण संस्थानाचं भाग्य थोर ! राणीसाहेबांनीं वारस दत्तक घेऊन आपलं कर्तव्य तर बजावलं ! त्यापुढें इतर

गोष्टींची किंमत काय वाटणार ? बरं— राणीसाहेबांच्या मृत्यूची बातमी टाइम्स वर्तमानपत्रांत तुम्हींच दिलीत काय ? "

" नाहीं बुवा. कदाचित् दिल्लीच्या डॉक्टरांनीं दिली असेल. "

" कोणीं दिली तरी काय म्हणा ! बातमी ही नेहमींच कशी ना कशी बाहेर फुटत असते. मग ती खरी असो कीं खोटी असो !— बरं— मी रजा घेतों हं आतां तुमची. "

आणि बाह्यतः अगदीं सौजन्यपूर्वक स्नेहानें दिवाणसाहेबांनीं जरी प्रकाशला निरोप दिला तरी त्यांच्या भाषणांतील कांहीं कांहीं वाक्यें प्रकाशला कशीतरीच वाटलीं.

दिवाणसाहेबांना वस्तुस्थितीबद्दल कांहींतरी संशय आला असणार हें त्यानें ओळखलें. पण तरीहि संस्थानच्या अब्रूला ते विलक्षण जपत असल्यामुळें संशय आलाच तरी ते त्याची वाच्यता करणार नाहींत व त्या संशयाची निवृत्ति करण्याचाहि प्रयत्न करणार नाहींत अशी प्रकाशला खात्री वाटली !—

डोळे असून आंधळा, कान असून बहिरा व वाचा असून मुका अस णाऱ्या जातिवत संस्थानी सेवकाच्या वर्गांतील ते आहेत हें प्रकाश जून होता—

परंतु तरीहि त्यांच्या भाषणांतील ते वेंचक, मार्मिक शब्द- माणसं दीर्घायुषी असूनहि जिवंत असून मेल्यासारखीं —" राणीसाहेबांनीं वारस दत्तक घेऊन आपलें कर्तव्य इतर गोष्टींची किंमत काय वाटणार ? "— " बातमी ना कशी बाहेर फुटत असते. मग ती खरी असो कीं ३।४ विवक्षित वाक्यें कधीं एकदां कौमुदीला सांग प्राय ऐकतो असें प्रकाशला झालें होतें.

त्यामुळें मुंबईला पोंचेपर्यंत त्याची उ होती !—

आपण आज येणार हें त्यानें कौमुदीला निमित्त शाळा बंद होण्याचे दिवस जवळ

होऊं शकणार नाहीं हें प्रकाशला ठाऊकच होतें. पण तरीहि बोरीबंदर स्टेशनावर गाडी उभी रहातांच त्यानें उत्सुकतेनें कौमुदीला प्लॅटफॉर्मवर उगीचच शोधलें. व मग आपल्या ह्या खुळेपणाची मौज वाटून स्वतःशींच हसत तो टॅक्सीनें घरीं आला.

नंतर 'मालती– माधव' नाटकाचा विषय गाळून त्यानें तात्यांबरोबर थोड्या गप्पा मारल्या व कौमुदी संध्याकाळीं तरी निदान तासभर आधीं घरीं येईल अशी अपेक्षा करीत तो बसला!—

आणि प्रकाशची ही अपेक्षा खरी ठरली.

कौमुदी पावणेपांचाच्या ऐवजीं पावणेचारालाच घरीं आली.

पण प्रकाश घरीं कुठें होता!—

कौमुदीनें तात्यांना घाईघाईनें विचारलें, "तात्या, प्रकाश आलाच नाहीं आज!"

"आला कीं– पण मघां दोन वाजतां त्या रश्मिकडून त्याला न्यावयाला मोटार आली नि तो तिकडे गेला."

रश्मीकडे गेला!— प्रकाश रश्मीकडे गेला!—

'ाची मद्याची चटक पुनः बळावली एकूण!—

'दीचें विशुद्ध प्रीतिजल रश्मीच्या सौंदर्यमद्यापुढें त्याला अद्यापि बेचव

°—

शब्द ऐकतांच कौमुदीला विलक्षण दुःख झालें.

ाडला २।३ दिवस प्रकाश किती आनंदांत होता. रश्मीनें

सरदार बालासाहेबाबरोबर विवाह ठरविला हें अपमान

पार विसरून गेला होता. एवढेंच नव्हे तर आतां

हि विसर पडतो आहे अशी आशा कौमुदीला वाटूं

ाची चटक ती!– ती अशी एकदम: कशी

व करावयाचें नाहीं असें कौमुदी आपल्या मनाला

पण मन ही निर्जीव कां चीज आहे!—

विस्तवाची आंच बेताची असली तर दूध जागच्या जागीं उकळत राहील पण आंच अधिक झाली कीं तें उतू जाणारच !—

त्याप्रमाणें प्रतिकूल परिस्थितीची आंच फार नसली तर मनांतील भावना बुद्धीच्या आवांक्यात राहूं शकतात !– पण ही आंच अतिशय लागूं लागली कीं मग भावना बुद्धीला जुमानीत नाहींशा होतात !— त्या उतूं जातात !—

तशा कौमुदीच्या भावना आतां उतू जाऊं लागल्या !— तिला दुःखाचे अनावर कढ येऊं लागले !—

किती परिश्रम घेऊन प्रकाशला लागलेला रश्मीचा नाद तिनें कमी करीत आणला– नि एका क्षणांत तो नाद पुनः बेताल झाला ना ?—

अगदीं अधीर, अस्थिर हृदयानें ती प्रकाश घरीं येण्याची वाट पहात राहिली.

जणूं कांहीं दारू पिऊन घरीं येणाऱ्या माणसाच्या अवस्थेवरून तो कितीशी दारू प्याला आहे हें जसें अजमावितां येतें तसें रश्मीकडून प्रकाश परत आल्यावर त्याच्या बोलण्याचालण्यावरून रश्मीच्या मोहांत तो किती अडकला आहे तें ती अजमाविणारच होती !—

# २५ प्रकाशच्या बेताल बुद्धीचा उपदेश!

आणि मग रात्रीं आठाच्या सुमाराला प्रकाश घरीं येतांच तो आपल्याकडे येण्याची वाटहि न पाहतां कौमुदी त्याच्या खोलींत गेली व तिनें त्याला सरळ प्रश्न केला, " प्रकाश, रश्मीच्या घरीं गेला होतास तूं ? "

कौमुदीच्या नजरेला नजर देण्याचें टाळीत प्रकाश म्हणाला, " होय, तिनें मोटार धाडली होती मला बोलवावयाला."

" अं ! – हें कसं काय ! " हृदयांत उसळणाऱ्या भावनावर पूर्ण दाब ठेवीत कौमुदीनें निःसंकोच स्वरांत विचारलें.

ती असा स्पष्ट सवाल विचारील अशी प्रकाशलाहि कल्पना नव्हती. त्यामुळें क्षणभर तो स्तब्धच राहिला. पण नंतर त्याची मुद्रा बदलली.

आज रश्मीशीं झालेल्या मुलाखतीची हकीकत कौमुदीला सांगून टाकावी असें त्याला मनांतून वाटतच होतें पण कौमुदीला तें कितपत रुचेल अशा विचारानें तो जरा बिचकत होता. त्यामुळें आतां कौमुदीनें आयताच हा संकोच दूर सारला हें पाहून त्याला किती मोकळें वाटलें.

व कौमुदीला प्रिय असलेल्या आपल्या निर्व्याज वृत्तीला अनुसरून तो म्हणाला, " कौमुदी, मला नेण्यासाठीं रश्मीनें मोटार पाठविलेली पाहून मलाहि दोन प्रहरीं फार आश्चर्य वाटलं नि तशा चकित मनःस्थितींतच मीं तिच्याकडे गेलों. नि तिथें रश्मीनें अगदीं मोकळ्या मनानें माझ्यापाशीं

कबूल केलें कीं, बाळासाहेबांच्या श्रीमंतीला व सरदारकीला भुलून तिनें जरी त्यांच्याबरोबर विवाह ठरविला तरी तिचें माझ्यावरील प्रेम पूर्ववत् कायम आहे ! —"

आतां मात्र कौमुदीला गप्प रहावेना. आजवर कधींहि ती मुद्दामच रश्मीच्या विरुद्ध बोलली नव्हती. पण आतां तिनें चटकन् म्हटलें, " काय ? रश्मीचें तुझ्यावर प्रेम आहे ? हुं ! — तुझ्यावर नव्हे बरं प्रकाश, 'प्रेम' ह्या शब्दावर तिचं प्रेम आहे इतकेंच ! "

कौमुदीच्या ह्या शब्दांनीं प्रकाशच्या अहंकाराला चांगलाच धक्का बसला.

'प्रेम' ह्या शब्दावरच रश्मीचें प्रेम आहे ! — खरें असेल हें ! — अं — अं — आपल्यालाहि दोन चार वेळां तशी शंका नव्हती कां आली ? आपल्या देखणेपणानें ती आकर्षित झाली असल्याचा दाखलाहि तिच्या बोलण्यांत नव्हता कां दिसला ? —

देखणेपणा ! — पण — पण आपणहि रश्मीच्या नाजुक, नखरेल सौंदर्यावरच नाहीं कां मोहित झालों ! —

मघां, रश्मीनें आपल्यावरील तिच्या प्रेमाचा निर्वाळा दिल्यावेळीं तिच्या त्या शब्दांपेक्षां ते उच्चारतांना झालेल्या तिच्या मोहक, लाघवी अभिनयाकडेच आपलें चित्त नाहीं कां अधिक वेधलें ? —

प्रीति हृदयांत वसत असली तरी नेत्रांच्या वाटेंच ती आधीं हृदयांत शिरते ना ? मग आपली प्रियव्यक्ति आपल्या नेत्रांना नेहमीं सुंदर वाटणेंच योग्य नाहीं काय ? —

पण पुरुषाला आपली प्रेयसी अशी सुंदर वाटावी हें योग्य असलें तरी स्त्रीला काय आपल्या प्रियकराच्या सौंदर्याचेंच आकर्षण वाटावें ? —

छेः छेः ! — स्त्रीला आपल्या प्रियकराच्या पराक्रमाचेंच आकर्षण वाटलें पाहिजे ! —

पण — रश्मीला आपल्या पराक्रमाची जराहि किंमत वाटत नाहीं ना ! —

सीतागडला अल्पावधींत बांधून तयार केलेल्या वाड्याची व पर्यायानें आपली व्हाइसरॉयनीं किती मनःपूर्वक स्तुति केली व आपल्या साहेबांनींहि

आपल्याला एकदम पन्नास रुपये बढती कशी दिली हें मघां रश्मीला आपण सांगत असतां तिनें तिथें पूर्ण दुर्लक्षच नाहीं कां केलें ? — नि उत्तरादाखल तिनें म्हटलें काय — तर म्हणे, " हं, हं, तरीच बरं कां, वाड्याच्या बांधकामावर नजर ठेवण्यासाठीं दिवसचे दिवस उन्हातान्हांत राहिल्यानें तुमचा वर्ण असा तांबूस पिंगट दिसूं लागला आहे ! — बाकी, तुम्हाला तो अगदीं शोभूनच दिसतो हो."

नि तिच्या ह्या स्तुतीनें आपल्याला किती लाज वाटली !

मग — मग — कौमुदी म्हणते त्याप्रमाणें रश्मीचें ' प्रेम ' ह्या शब्दावरच प्रेम आहे तर ! —

पण ' प्रेम ' ह्या शब्दावर कीं आपल्या देखणेपणावर ? — एकूण एकच म्हणा ! — बाह्यांगावर असणारें प्रेम हें खरें प्रेमच नव्हे ! — पण मघां रश्मि किती करुणवाणीनें आर्जवून बोलत होती तें काय आपल्यावर तिचें खरें प्रेम असल्याशिवाय ?

बिचारा प्रकाश ! — त्याला बढ कांहींच कळेना ! — घाबरट विद्यार्थी गणिताचा पेपर सोडवितांना एक उदाहरण अर्धवट सोडवून दुसऱ्या उदाहरणाकडे वळतो — नि त्याचें पुरतें उत्तरहि न काढितां तिसऱ्यावर प्रयत्न करितो. नि मग हेंहि नाहीं नि तेंहि नाहीं अशा त्याचा साराच गोंधळ उडतो तसा प्रकाशचा गोंधळ उडाला होता !

रश्मीचें प्रेम आपल्या देखणेपणावर व आपलें तिच्या सुंदरतेवर जडलें असल्यामुळें तें खरें प्रेम नव्हे असें त्याला पटत होतें नि पटत नव्हतेंहि ! — त्याला नक्की कांहींच कळत नव्हतें !

मध्यंतरीं त्याला झिडकारून रश्मीनें बाळासाहेबांबरोबर विवाह ठरवितांच प्रकाशचा अहंकार दुखविला गेला तरी त्याला वस्तुतः फारसें दुःख झालें नाहीं. व त्यामुळें गेलें वर्षभर त्याचें विकारी हृदय व विचारी बुद्धि ह्यामध्यें चाललेली रस्सीखेच किंचित् थांबली होती व आतां हळुहळूं ती पुरती थांबून त्याच्या बुद्धिहृदयाचें मतैक्य होणार असें सुचिन्ह दिसूं लागलें !

नि इतक्यांत रश्मीनें आज पुनः त्याला आपल्या पाशांत अडकविलें. तो मुंबईला कधीं परत येतो त्यावर जशी पाळत राखूनच तिनें तो आल्या

दिवशीं त्याला गांठलें. व त्यासरशीं त्याच्या बुद्धिहृदयामध्यें पुनः रस्सीखेंच सुरू झाली. पण फरक इतकाच कीं, मागें त्याच्या हृदयाला रश्मीच्या सौंदर्याचा फारच मोह पडला होता त्यामुळें त्याचें हृदय पुनः पुनः त्याच्या बुद्धीवर विजय मिळवीत होतें, आणि आतां हा मोह बराच कमी झाला असूनहि आपला दुखावलेला अहंकार पुनः प्रस्थापित करावयाला ही बरी संधि आहे असें वाटून त्याची बुद्धीच त्याला पुनः रश्मीच्या पाशांत अडकवीत होती.

व बुद्धिहृदयाच्या ह्या परस्पर ओढाताणीनें प्रकाश अगदीं भांबावून गेलेला असतांच कौमुदीनें त्याला म्हटलें, "पण प्रकाश, रश्मीचा बाळा-साहेबांबरोबर विवाह ठरला आहे त्याची वाट काय ?"

कौमुदीच्या ह्या प्रश्नानें फार खराबी झाली. प्रकाशचा अहंकार पुनः डिवचला गेला ! —

बाळासाहेब ! — हुंः ! कोण एवढा मोठा लागून गेला आहे तो ! — अं ? आपला त्याग करून रश्मीनें त्याच्याशीं लग्न ठरविलें होतें नाहीं ? - बस्स ! आतां त्याला झिडकारून तिला पुनः आपल्याबरोबर लग्न ठरवाव यास लावावयाचें !

झाला निश्चय ! — हं ! कसला निश्चय नि कसलं काय ? भलत्या अभिमानाला बळी पडून प्रकाशची बुद्धि सध्या मुळीं अगदींच बेताल झाली होती — मग ती त्याला असलाच निश्चय करावयाला लावणार ! —

साराच पोरकटपणा ! — निसरड्या रस्त्यावर पाय घसरून पडतांना आपल्याला एकाद्या शाळासोबत्यानें पाहिलें ह्याबद्दल लाज वाटून त्या सोबत्याचा पाय मुद्दाम ओढून त्याला रस्त्यांत पाडावयाला एकादा शाळकरी मुलगा जसा पोरकटपणानें उद्युक्त होतो तसाच प्रकार हा !

लग्नासारखी गंभीर महत्त्वाची घटना अशी एकाद्या पळपुट्या भावनेच्या सांगण्यानें कां कुणी ठरवितात ? पण योग्य उपदेश देणारी बुद्धीच जर चळली तर असा पोरखेळच होणार सारा !

कौमुदीच्या प्रश्नाचा प्रकाशला फार राग आला. फुरंगटलेल्या स्वरांत तो उत्तरला, "बाळासाहेबाशीं ठरलेल्या विवाहाची काय वाट म्हणजे ? एः !

मोडून टाकावयाचा तो विवाह!" व आपला उजवा तळहात हवेंत वरदिशीं फिरवीत प्रकाशनें तो विवाह मोडण्याचा आविर्भावहि त्यानें करून दाखविला.

त्याच्या ह्या पोरकट कृतीनें व उक्तीनें कौमुदीला क्षणभर हंसूं आलें तरी भारी भय वाटलें मग तिला त्याचे!

आपल्या सौंदर्याच्या व श्रीमंतीच्या जोरावर रश्मि प्रकाशला हवीतशी नाचविते नि तोहि खुशाल नाचतो! पण ह्याचा परिणाम काय होणार?

एकदिलानें एकमेकांच्या पावलावर पाऊल टाकून चालणारी प्रेमळ पतिपत्नी किंवा प्रियकर प्रेयसी आपल्या जीवनामध्यें एक सुंदर, तालबद्ध द्वंद्व नाच उमटवितात खरा! पण तो नाच तालबद्ध असतो ह्यांतच त्यांच्या सुखाचें सार सांठविलेलें असतें!

पण आतां हा रश्मीचा व प्रकाशचा नाच अगदीं मूळापासूनच बेताल आहे! नाच कसला हा? नुसता धुमाकूळ — धांगडधिंगा!

(स्त्रीपुरुषांच्या जीवनांतील द्वंद्व नृत्य समतोल बुद्धीच्या तालावर नि परस्परानुरक्त हृदयाच्या सुरेल संगीताच्या नादावर होत असतें.) पण रश्मि व प्रकाश ह्या दोघांनीं चालविलेल्या ह्या नाचवजा धांगडधिंग्यांत बुद्धीचा तोल चुकला होता व हृदयाचें संगीत बेसूर झालें होतें! मग त्याची निष्पत्ति अशीच, नाहीं कां होणार?

# २६ —व हृदयाची तळमळ

त्यानंतर प्रकाशशीं कमीअधिक कांहींच न बोलतां कौमुदी आपल्या खोलींत परतली तरी विचारांअंती तिनें ठरविलें कीं, यापुढें प्रकाशकडे रश्मीचा केव्हांहि उल्लेख करावयाचा नाहीं परंतु इकडल्या तिकडल्या विषयांवर एकसारखें खूप बोलत राहून त्याची व आपली मैत्री पूर्ववत् दृढ करावयाची —

प्रकाश संवयीचा गुलाम आहे. कसलीहि बरी वा वाईट संवय त्याला एकदां जडली कीं लगेच तो सर्वस्वीं तिच्या आहारीं जातो हें कौमुदी ओळखून होती. व म्हणूनच त्याला आतां पुनः रश्मीचा नाद जडूं पहात असतांनाच आपल्या मैत्रीची संवयहि त्याला लावावयाची म्हणजे या दोन संवयामध्यें ओढाताण होऊन तो सर्वस्वीं रश्मीच्या आधीन तरी होणार नाहीं असा दूरवर विचार करूनच कौमुदीनें हा निश्चय केला.

व मग त्या निश्चयानुसार दुसऱ्या दिवशीं सकाळींच उठल्याबरोबर प्रकाशसाठीं ऊन चहाचा पेला घेऊन ती त्याच्या खोलींत गेली.

प्रकाश आळसानें बिछान्यावर उगीच लोळत पडला होता. कौमुदीच्या हातांतील चहाचा पेला पाहून, गडयाकडून हॉटेलांतील चहा आणविण्याची कटकट चुकली असें वाटून स्वारी खूष झाली व हंसत हंसत तोंड धुवावयास गेली.

चहाचा पेला त्याच्या हातीं दिल्यावर कौमुदी नेहमींच्या सस्नेह प्रसन्नतेनें म्हणाली, ? " अहो सूत्रधार महाराज, आपल्या नाटकाचा शेवटला अंक कसा काय वठला, नाटकाचें भरतवाक्य निर्विघ्नतेने पार पडले किंवा कसें ह्याबद्दल सांगा कीं आम्हांला."

कौमुदीचे हे शब्द ऐकून प्रकाशला आतां आठवण आली कीं, जी गोष्ट कौमुदीला सांगावयाची असें योजीत आपण सीतागडहून आलों ती तिला सांगावयाची राहूनच गेली होती. नि—नि—त्याबद्दल कांहीं विचारावयाला कौमुदीहि कशी काल विसरली ?

पण मग ह्याविषयीं अधिक काथ्याकूट न करीत बसतां तो म्हणाला, वा: ! तें काय विचारतेस शेवटला अंक सुंदरच वठला ! त्या उभयतांना 'नांदा सौख्यभरें' इत्यादि आशीर्वादसुद्धां मी दिला. कौमुदी, तुझ्या कमलेची, अं, माझ्या मालती वहिनींची त्यावेळची आनंदी, प्रसन्न मुद्रा पाहून केल्या श्रमाचें सार्थक झालें असें वाटलें बघ मला. खरंच कौमुदी, आपल्या प्रीतीचें साफल्य झाल्यानें कुमारिकेला जेवढा आनंद होत असेल त्यापेक्षां कितीतरी पटीने अधिक आनंद अशावेळीं कमलाताई-सारख्या विधवेला होत असेल, नाहीं ! कारण प्रीतिसाफल्य होण्याची कुमारिकांना आशा असते, अधिकार असतो ! पण आपल्या समाजांत अद्यापिहि विधवा ह्या अधिकाराचा सर्रास उपयोग करीत नाहींत ! अद्यापि त्यांना पुनर्विवाह प्रशस्त वाटत नाहीं ! त्यांतून कमलाताई राणी असल्यामुळें तिच्या प्रीतिसाफल्याच्या मार्गांत कितीतरी अडचणी होत्या. नि तरीहि तिचें इच्छित तिला प्राप्त झालें ! मग किती आनंद झाला असेल बरं तिला ? कौमुदी, माधवाला व कमलाताईला स्टेशनावर पोचवावयाला मी गेलों त्यावेळची कमलाताईची ती विलक्षण प्रसन्न व उज्ज्वल मुद्रा मी कधींच विसरणार नाहीं.त्यांच्या त्या विशाल भालपटावर लालबुंद कुंकुमतिलक तर किती शोभत होता म्हणून सांगू ! अतिपरिचयामुळें सुंदर वस्तूंच्या सौंदर्याविषयीं आपल्याला योग्य तो आदर वाटत नसतो हेंच खरं ! आजवर कितीतरी स्त्रियांच्या कपाळीं मी कुंकुमतिलक पाहिले होते. व त्यामुळें ह्या तिलकानें स्त्रीचें सौंदर्य वाढतें ह्याची मला अणू जाणीवहि

नव्हती ! पण कमलाताईच्या कपाळावर तो विराजमान झालेला पहातांच त्या तिलकाची खरी योग्यता व खरें सौंदर्य मला कळून आलें ! त्यावेळीं त्यांच्या मुद्रेवर आनंद जसा कांहीं ओसंडत होता !– कौमुदी, दुष्काळांतून आलेल्या माणसाला इच्छाभोजन मिळाल्यानें किंवा वांझेला पुत्रप्राप्ति झाल्यानें होणारा आनंद काय स्वरूपाचा असेल त्याची त्यावेळीं मला बरो-बर कल्पना आली !—"

" खरंच प्रकाश, माझ्या कमलवर केवढे उपकार केलेस तूं हे !— प्रकाश, उमलत्या वेलीला पाणी घालून तिची जोपासना करण्यापेक्षा अशा वठलेल्या वेलीची जोपासना करणें अधिक पुण्यदायक, अधिक कौतुकास्पद आहे ! " कौमुदी, मनापासून उद्गारली.

" वठलेली वेल !– खरंच कौमुदी, कमलाताईचं किती सार्थ वर्णन केलंस तूं –"

" आणि प्रकाश, तुझ्या ह्या प्रयत्नांनी ती वठलेली वेल आतां फुलेल बरं –"

"कौमुदी अशा घटना पाहिल्या कीं जगांत देव आहे असं वाटूं लागतं बघ." प्रकाश गंभीर स्वरांत म्हणाला.

त्याच्या ह्या उद्गारानें कौमुदी चकित झाली. तारुण्यामध्यें मनुष्यप्राण्याला स्वतःच्या सुखपूर्तीमुळेंच ईश्वराच्या अस्तित्वाची प्रतीति येत असतें ! मग आतां रश्मीशीं झालेल्या समेटामुळेंच वास्तविक प्रकाशला ईश्वराचे अस्तित्व पटावयाला हवें होतें ! माधवकमलेच्या सुखपूर्तीचा आधार त्याला कां हवासा झाला ?—

कां हवा झाला ? –कारण रश्मीशीं समेट झाल्यानें आपला स्वाभिमान आतां पुनः प्रस्थापित झाला आहे असें वाटून प्रकाशच्या बुद्धीला जरी आनंद झाला तरी रश्मीबद्दल त्याच्या हृदयाला वाटणारा मोह आतां पुष्कळ ओसरला असल्यामुळें त्याच्या हृदयाला आतां हुरहूर लागली होती. व त्यामुळें त्याच्या बुद्धिहृदयामध्यें आतां वेगळ्या तऱ्हेची रस्सीखेंच सुरू झाली होती !—

रश्मीशीं विवाह केल्यानें आपण सुखी होणार नाहीं अशी शंका त्याला

मधूनमधून व्यथित करीत असल्यामुळेंच त्याच्या तोंडून माधवकमलेच्या सुखपूर्तीबद्दल आतां असा कौतुकाचा उद्गार उमटला!—

कौमुदीला हें बरोबर कळून चुकलें, पण तसें उघड न दर्शवितां ती मृदु स्वरांत म्हणाली, "प्रकाश, आपल्या माणसांना त्यांचें ईप्सित लाभलें म्हणजे मला नेहमींच आनंद वाटतो!—"

कौमुदीच्या ह्या शब्दांत अहंकार मुळींहि नव्हता. तिनें फक्त वस्तुस्थितीच निवेदन केली. व आज इतके दिवस तिला ओळखणाऱ्या प्रकाशला तिचे हे शब्द फार पटले.

प्रेमळ, सुस्वभावी कौमुदीला इतरांच्या आनंदानें नेहमीं आनंदच वाटतो! — 'जो दुसऱ्याचिया दुःखें दुखावला' असें साधूपुरुषाचें वर्णन आहे. पण दुसऱ्याच्या दुःखानें दुखावणें एकपरीनें सोपें आहे परंतु दुसऱ्याच्या सुखानें सुखावणें महाकठीण आहे!—

विशेषतः आपल्याला दुरावलेलें सुख दुसऱ्याला मिळालेलें पाहूनहि सुखावणें हे एक मोठेंच दिव्य आहे! — आणि कौमुदी हें दिव्य करून दाखविते. दुसऱ्याच्या आनंदानें ती आनंदित होते!—

पण — पण— कौमुदी हें कुणाला उद्देशून बोलली असेल?— माधव-कमलेच्या सुखपूर्तीला?— कीं—कीं—रश्मीच्या व आपल्या समेटाला?

होय — होय — कौमुदी खास हें आपल्यालाच उद्देशून बोलली!

आपल्या माणसांचे ईप्सित!

आणि — कौमुदीचें ईप्सित?

हा विचार मनांत येतांच आजवर जी कल्पना प्रकाशच्या डोक्यांत बऱ्याच वेळां डोकाऊन गेली ती आतां चटृदिशीं ठळक झाली! कौमु-दीचें खास आपल्यावर प्रेम आहे!

त्या रात्री बिछान्यावर पडल्या पडल्या विचार करितांना प्रकाशनें हा पल्ला गांठला.

कौमुदीचें आपल्यावर प्रेम आहे! — आणि आपलें प्रेम?— कौमुदीवर आपलें प्रेम आहे काय?

ह्या प्रश्नाचें उत्तर प्रकाश स्वतःशींहि देऊं शकला नाहीं, कारण त्यांचा खुळसट प्रामाणिकपणा पुनः आडवा आला !

रश्मीनें बाळासाहेबांशीं ठरलेला विवाह मोडून आपल्याशीं समेट केला असल्यामुळें आतां इतर कुणा तरुणीच्या प्रेमाबद्दल आपण विचार करणें गैर होईल असें वाटून त्या प्रश्नाचे उत्तर मिळविण्याच्या भरीला तो पडलाच नाहीं !

तरीहि कौमुदीचें आपल्यावर प्रेम आहे हा विचार त्याच्या हृदयाला मधूनमधून अस्वस्थ करीत होता.

एवढेंच नव्हे तर त्यानंतर रोज चार दिवस संध्याकाळीं रश्मीनें पाठविलेल्या मोटारमधून तो तिच्याकडे जात होता तरी तिच्याशीं बोलतां सवरतांनासुद्धां त्याला ह्या विचाराचा विसर पडूं शकत नव्हता !

परंतु आपलेंहि कौमुदीवर तसेंच प्रेम आहे ह्या विचाराचा उत्तरार्ध तो मनांतहि आणूं शकत नसल्यामुळें आपल्याला सहज सुटण्यासारखें उदाहरण अर्धे सोडवून झालें नाहीं तोंच सुपरवायझरनें पेपर काढून घेतला म्हणजे त्या हुषार विद्यार्थ्यांची जी तळमळ होते तशी प्रकाशच्या हृदयाची आतां तळमळ होऊं लागली होती !

आपल्याला तहान लागली आहे हें कळत असून व थंडगार पाणी कुठें मिळेल हेंहि ठाऊक असून तें पाणी आपल्याला मिळूं मात्र नये अशी प्रकाशची स्थिति झाली होती !

त्यामुळें आपल्या बुद्धीचें व हृदयाचे चलनवलन जणूं बंद ठेऊनच तो वांवरत होता !

आणि पांचव्या दिवशीं संध्याकाळीं रश्मीकडून जेव्हां चिठ्ठी आली कीं, आज बाळासाहेब गांवाहून आलें असल्यामुळें तुम्हांला आणावयाला मोटार पाठविली नाहीं तव्हां मात्र प्रकाशची ही सुप्तावस्था क्षणार्धांत नष्ट झाली !

बाळासाहेब गांवाहून आले आहेत म्हणून आज आपण तिच्याकडे जातां नये ?—अर्थ काय ह्याचा ?

बस्स ! काय तो अर्थ आतांच शोधून काढावयाचा असें प्रकाशनें ताबडतोब ठरविलें व त्याच पावलीं तो रश्मीकडे निघाला.

# २७ ऐक्य !

रश्मीकडे जाऊन काय बोलावयाचें, कसें बोलावयाचें ह्याबद्दल प्रकाशनें आधीं कांहींच विचार केला नव्हता ! नाहीं तरी कोणत्याहि गोष्टीबद्दल आधीं नीट ठरवून मगच काय तें बोलावयाचें असा प्रकाशचा स्वभावच नव्हता. तो अतिशय भावनाप्रवण असल्यामुळें ज्यावेळीं जी भावना जें सुचवील तें तो बोलत असे !

व आपल्या ह्या स्वभाव विशेषानुसार तो रश्मीच्या घरीं तर गेलाच पण तडक तिच्या खोलींतच घुसला.

तिथें बाळासाहेबांच्या शेजारी कोंचावर बसून लाडकें लाडकें बोलत रश्मी चहापान करीत होती.

प्रकाशला पहातांच ती दचकली.

पण लगेच स्वतःला सांवरीत ती म्हणाली, "या या, पण आज कसे बाई आलांत ? हो, किती किती आमंत्रणं धाडावीं तेव्हां एकदां हजर होणारे तुम्ही आज आपण होऊन कसे आलांत ?"

रश्मीच्या ह्या मानभावी बोलण्यांतील खोल अर्थ कळून प्रकाशला मोठी गंमत वाटली. पण तिनें आतां संपादणी करण्याचा कितीहि प्रयत्न केला तरी तिथें लक्ष द्यावयाचें नाहीं असें नक्की ठरवून तो सरळ म्हणाला,

" मला न्यावयाला तू आज मोटार पाठविली नाहींस म्हणून मीच होऊन आलों."

प्रकाशच्या ह्या स्पष्टोत्तरानें बाळासाहेब फार चकित झालेले दिसले.

रश्मीकडे वळून त्यांनी म्हटलें, " रश्मी, कोण हे ?"

" हे– हे– प्रकाश–"

" अस्सं ? म्हणजे आधीं तुझं यांच्याबरोबर लग्न ठरलं होतं तर! आणि, काय हो प्रकाश, रश्मी तुम्हांला इथें आणावयाला मोटार पाठवित होती होय ! किती वेळां पाठविली बरं तिनें मोटार ?"

बाळासाहेबांच्या ओबडधोबड परंतु सुस्वभावी दिसणाऱ्या चर्येकडे पहात प्रकाश उत्तरला,"गेले चार दिवस संध्याकाळीं आली की तिच्याकडून मोटार – "

"अस्सं !" फक्त एकदांच उच्चारलेला शद्बाचा पेला तसाच खालीं ठेवीत बाळासाहेब रश्मीकडे वळून म्हणाले. " रश्मि, मी समजलों ह्याचा अर्थ ! पण हें बघ, मी कितीहि उदारमतवादी असलों तरी माझी वाङ्निश्चित वधू झाल्यानंतर इतर तरुणांबरोबर तू प्रेमाचे खेळ खेळलेलं मला चालणार नाहीं. म्हणून सांगतो, आतां ह्या क्षणालाच नक्की काय तें ठरव. हे प्रकाश व मी ह्या दोघांमधून कुणातरी एकाची निवड तूं कर. बोल, तुला प्रकाश हवे आहेत कीं मी ?"

क्षणभर – एकच क्षण – रश्मि घोंटाळली.

बाळासाहेबांच्या श्रीमंतीला भाळलेली तिची बुद्धि व प्रकाशच्या देखण्या उमदेपणाला भुकेलेलें तिचें हृदय ह्यांमध्यें एकच क्षण रस्सीखेंच झाली !

व मग एक अगदीं सूक्ष्म निश्वास सोडीत ती बाळासाहेबांना आर्जवी लाडिक स्वरांत म्हणाली, " हें काय बरं असलं बोलणं ! प्रकाशबरोबर ठरलेला विवाह मी तुमच्यासाठींच ना मोडला. मग ! आतां प्रश्नच कुठें उरला आहे ? प्रकाश माझे मित्र आहेत इतकंच ! पण तुम्हांला ही मैत्री पसंत नसली तर सोडून देईन मी – त्यांत काय मोठंसं !"

रश्मीचें हें उत्तर ऐकून प्रकाशला गंमत वाटली – काय ! रश्मीला

आपल्याविषयीं निव्वळ स्नेहभावच वाटत होता ! तिचें आपल्यावर प्रेम नव्हतें !—

नसेलहि कदाचित् — परंतु आपलें मात्र तिच्यावर कधींहि प्रेम नव्हतें हें आतां प्रकाशला एकदम कळून आलें !

रश्मीवर आपलें प्रेम नव्हतें — नाहीं !— आपलें प्रेम — आपलें प्रेम कौमुदीवर आहे ! आणि — आणि — कौमुदीचेंहि आपल्यावर प्रेम आहे !

अहा !— एकूण रश्मीनें आतां बाळासाहेबांना जी बरीचशी खोटीनाटी जबानी दिली ती आपल्या लेखीं अगदीं इष्टापत्तीच ठरली तर !

छान ! प्रकाशची मुद्रा चतूर्दिशीं किती प्रफुल्लित झाली ! व रश्मीचा अगर बाळासाहेबांचा निरोप घेण्याचा सर्वसाधारण शिष्टाचारहि न पाळतां तो तिथून सटकला.

त्यावेळीं त्याची मुद्रा आनंदोज्ज्वल दिसत असूनहि बिचाऱ्या रश्मीनें आपल्या धडपडणाऱ्या हृदयाला फसविण्याचा प्रयत्न केला कीं, आपल्या पुनर्नकारानें फार दुःख झाल्यामुळेंच प्रकाश असा एकाएकीं निघून गेला !

पण बाळासाहेबांनीं सत्यस्थिति बरोबर ताडली होती. दैवयोगानें रश्मीच्या गळाला अडकलेला तो मत्स्य गळावेगळा होतांच ह्या स्वातंत्र्यानंदाचा उपभोग घेण्यासाठीं आपल्या मत्स्यीकडे धांवत गेला आहे अशीच बाळासाहेबांची कल्पना झाली.

व अर्थातच ती अगदीं खरी होती ! प्रकाश विलक्षण गडबडीनें कौमुदीकडे निघाला होता !

कौमुदीचें आपल्यावर प्रेम आहे व आपलें कौमुदीवर प्रेम आहे ह्या विचारांत तो अगदीं रमला होता !

आणि रस्त्यानें चालतांना एकाएकीं त्याच्या मनांत आलें, मघां बाळासाहेबांनीं रश्मीला तें व आपण ह्यांमधून एकाची निवड करावयाला सांगितलें त्यावेळीं जर कां रश्मीनें आपली निवड केली असती तर ?

अरे बापरे ! तर — तर —

आ वासून बावळटासारखा रस्त्याच्या मध्यावर उभ्या राहिलेल्या प्रकाशला एका भल्या माणसानें ओढून रस्त्याच्या कडेला नेलें म्हणून ठीक !

रस्त्याच्या कडेला पोंचल्यावर प्रकाश भानावर आला. त्यानें आपलें वासलेलें तोंड मिटलें व एक लांबलचक श्वास घेतला !

त्याला वाटलें, वेळ आली होती पण काळ आला नव्हता म्हणून निभावलें.—

पण खुळसटासारखा तो रस्त्याच्या मध्यावर थबकून राहिल्यामुळें चांगलाच अपघात झाला असतां तो आतां टळला ह्या घटनेला उद्देशून कांहीं त्याला असें वाटलें नाहीं.

रश्मीनें कदाचित् बाळासाहेबांऐवजीं आपली निवड केली असती तें संकट टळलें म्हणून त्यानें हा कृतज्ञतेचा उद्गार काढला !

ह्या संकटापुढें मोटारच्या अपघाताच्या संकटाची त्याला तमा वाटली नाहीं.

असला मजेदार होता प्रकाशचा स्वभाव !— त्यामुळें त्याच्या ह्या स्वभावाला सांवरून धरणारी जोडीदारीण त्याला मिळाली तर ठीक !— नाहींतर योग्य कर्णधाराच्या अभावीं दिशा चुकून कुठेंतरी तरंगत जाणाऱ्या नौकेप्रमाणें प्रकाशची जीवननौका कुठेंतरी भडकेल अशी सभय काळजी कौमुदीला नेहमीं वाटे.

व आतांहि ती आपल्या खोलींत हीच काळजी वहात बसली होती.

रश्मीकडून मोटार आली नसतांहि प्रकाश रोजच्या वेळीं बाहेर पडला तो बहुतकरून तिथेंच गेला असणार हें कौमुदीनें ओळखलें.

म्हणजे दारूडे सोबती बरोबर नसल्यामुळें गुत्याच्या रस्त्यानें न गेलेल्या दारूड्यानें मुद्दाम उलट फिरून परत गुत्याकडे जावें त्यांतलाच प्रकार हा !—

आणि प्रकाशला रश्मीचा मोह पुनः जर इतका पडला आहे तर आतां त्यापासून तो परावृत्त तरी कसला होणार असें वाटून कौमुदी भारी कष्टी झाली.

आपल्याला अमूल्य वाटणारी वस्तु त्या वस्तूला कवडीमोल मानणाऱ्या माणसाच्या हातीं गेलेली पाहून जसें सखेद दुःख वाटतें तसें सखेद दुःख कौमुदीला वाटलें !—

एकदां केलेली चूक आयती निस्तरली गेली असतां प्रकाश आतां पुनः तीच चूक करूं पहात आहे हें पाहून कौमुदीला भारी वैताग आला !—

तिला वाटलें, पुनः पुनः कितीदां प्रकाशला आपण सांवरणार ?— नाहीं !— आतां आपल्या अंगांत तेवढी उमेद नाहीं, शक्ति नाहीं, उत्साहहि नाहीं !—

आतां प्रकाशचें काय होईल तें खरें !— हं !— आपल्याला हवी असलेली वस्तु वा व्यक्ति इच्छाशक्तीच्या जोरावर प्राप्त होऊं शकली असती तर ?—

तर काय ? जगांतील दुःखें कमी झाली असतीं परंतु सुखाची किंमत पार उतरली असती !—

सहजप्राप्य वस्तु माणसाला तितकी हवीशी वाटत नसते ! दुष्प्राप्य वस्तूच वांछनीय वाटते !

रश्मीला प्रकाश सहजीं मिळूं शकला म्हणूनच ती त्याच्या हृदयाशीं असे नाचरे खेळ खेळूं शकली !—

आणि आपण ?— प्रकाश जर आपल्याला मिळाला तर— तर त्याच्यावर पत्नीची प्रीति, मातेची ममता, भगिनीची माया व मैत्रिणीचा स्नेह ह्या सर्वांची आपण सतत वृष्टि करूं—

पण— पण— प्रकाशला आपल्या प्रेमळ हृदयाची पर्वा कुठें आहे ? प्रकाश देखणा— तेव्हां त्याला आपली जोडीदारीणहि देखणी, सुंदरच हवी असणार !—

हंऽ ! प्रकाश— प्रकाश—

" कौमुदी, कौमुदी— " प्रकाशनें मारलेल्या ह्या हांका कानीं येतांच कौमुदीनें केवढ्यांदा दचकून डोळे उघडले.

एकच क्षण तिनें प्रकाशकडे पाहिलें. आणि तिला वस्तुस्थितीचें अचूक आकलन झालें !—

जादूची कसली कांडी फिरली. असेल ती असो !— पण आपलें जसें प्रकाशवर प्रेम आहे तसें आतां त्याचें आपल्यावर प्रेम जडलें आहे हें तिला कळून आलें !—

प्रकाशचें— आपल्यावर— प्रेम !—–

" कौमुदी, कौमुदी, माझा— माझ्या प्रीतीचा तूं स्वीकार करशील ना ? " किती मृदु, प्रेमळ स्वरांत प्रकाश बोलत होता.

प्रकाशचा स्वीकार ?— प्रकाशच्या प्रीतीचा स्वीकार ?— पृथ्वीवरील अमृताचा स्वीकार !—–

कौमुदी वेड्यासारखी प्रकाशकडे पहातच राहिली.

" कौमुदी, बोल ना. सांग ना, माझा तूं स्वीकार करशील ना ? "

एक खोल उसासा टाकून कौमुदी म्हणाली, " पण— पण— रश्मि ! प्रकाश, तूं सौंदर्याचा चहाता आहेस— तूं स्वतः केवढा देखणा आहेस— नि— नि— मी—– "

" कौमुदी, तूं सुंदर नाहींस असं कोण म्हणेल ? रश्मीच्या सौंदर्या-प्रमाणें तुझं सौंदर्य डोळे दिपविणारं नाहीं— पण डोळे निवविणारं आहे ! कौमुदी, मागें एकदां मी तुला सांगितलं होतं कीं, रश्मीचं सौंदर्य सूर्य-प्रकाशासारखं जळजळीत आहे नि कमलाताईचं सौंदर्य विजेच्या दिव्याच्या प्रकाशासारखं तेजस्वी आहे ! आणि— आणि— कौमुदी, तुझं सौंदर्य समईच्या प्रशांत प्रकाशासारखं सौम्य, शांत आहे ! कौमुदी, या तिन्ही प्रकाशाचं सौंदर्य वेगवेगळ्या तऱ्हेचं असलं तरी हे तीनहि प्रकाश आपापल्या परीनें सुंदरच आहेत !— आणि कौमुदी, रश्मीच्या सूर्यरश्मीसारख्या प्रखर सौंदर्यानें दिपलेले माझे डोळे आज उघडले आहेत ! तुझी किंमत नि माझ्या हृदयाला तुझ्या प्रेमाची किती तहान लागली होती हें मला आज एकाएकीं कळून आलें !— कौमुदी, भलत्या अभिमानाला बळी पडून मी केवढी घोडचूक करीत होतों. मला वाटलं, माझा भंगलेला स्वाभिमान सांधणं हेंच खरं महत्त्वाचं आहे ! पण नाहीं— त्यापेक्षां आपलं हृदय अभंग ठेवणं हेंच अधिक महत्त्वाचं आहे ! मला आज हें पटलं. नि म्हणून कौमुदी, माझा भंगलेला स्वाभिमान नि माझं तुझ्याविषयींच्या प्रीतीनें उचंबळणारं हृदय घेऊन मी तुझ्याकडे आलों आहे. सांग, तूं त्याचा स्वीकार करशील ना ? तूं मला आपला म्हणशील ना ? "

प्रकाश किती कळवळून बोलत होता. प्रत्येक शब्द कसा [illegible]
करणाला भेदून निघत होता.

कौमुदीच्या सौम्य, शांत सौंदर्याची प्रकाशला आजवर जाणीव हो
पण ती त्याची त्यालाच अद्यापि कळून आली नव्हती. आतां कौमुदीव
आपल्या प्रेमाची त्याला ओळख पटतांच— त्याच्या बुद्धिहृदयांमध्यें आज
चालू असलेली रस्सीखेंच बंद होऊन त्याच्या बुद्धिहृदयाचें ऐक्य होतांच
जाणीव त्याला झाली व ती त्यानें आतां अगदीं सहजीं उघड केली!

पण अर्थात्च त्याच्या हृदयांत आजवर सुप्त असलेल्या ह्या भावनां
कौमुदीला कांहींच कल्पना नसल्यामुळें प्रकाशचें हें बोलणें ऐक
तिला फार आश्चर्य वाटलें. परंतु त्याच्या शब्द न् शब्दांत प्रतिबिंबि
होणारी आपल्यावरील त्याची प्रीति तिला लगेच ओळखूं आली.

त्यामुळें प्रेमकंपित स्वरांत तिनें म्हटलें, "प्रकाश— प्रकाश—"

तिला पुढें बोलवेना व तिनें पुढें बोलण्याची प्रकाशलाहि आतां आ
श्यकता वाटेना!—

हृदयाची भाषा हृदयाला कळली!—

प्रकाश कौमुदीच्या खुर्चीपाशीं बसला व त्यानें आपलें मस्तक कौ
दीच्या मांडीवर टेकलें.

अत्यंत प्रेमानें पुढें वांकून कौमुदीनें प्रकाशचें मस्तक आपल्या हृ
याशीं धरलें!—

रश्मीनें मागें वाङ्निश्चय मोडला त्यावेळीं प्रकाश फक्त आपला दुख
विलेला स्वाभिमान घेऊन असाच कौमुदीकडे आला होता. तेव्हांची कौमु
दीला आतां आठवण झाली.

पण त्यावेळीं प्रकाश तिचा नव्हता! आतांप्रमाणें त्यावेळीं त्यानें आप
हृदय तिच्या स्वाधीन केलें नव्हतें!—

आतां— आतां— प्रकाश सर्वस्वीं तिचा होता.

कौमुदीच्या नेत्रांतून दोन चार अश्रू— आनंदाश्रू— प्रकाशच्या गाल
वर पडले.

त्या आनंदाश्रूंचा कढतपणा प्रकाशला अतिशय विलोभनीय वाटला!—